


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे मुखपत्र

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति-मंडळ पुरस्कृत )






प्रकाशन-दिनांक
१० डिसेंबर १९६९

वर्ष ४४ : अंक १६९–१७०
एप्रिल–आक्टोबर १९६९

संपादक :
के. नारायण काळे

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद : पुणे २



# महाराष्ट्र साहित्य परिषद
# प्रकाशने

१ मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभावअखेर )
● कै. बा. अ. भिडे ●

२ महाराष्ट्र साहित्य-परिषद इतिहास
● द. वा. पोतदार ●

३ संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुती ( द्वितीयावृत्ती ) ३ रु.
● गं. बा. सरदार ●

४ द्रौपदी स्वयंवर ( अवाचितसुतकाशीकृत ) ५ रु.
● कै. वा. दा. गोखले ●

५ शास्त्रीय परिभाषा कोश ५ रु.
● आपटे–जोशी ●

६ साहित्य समीर ( गद्य-पद्यवेचे ) २॥ रु.

७ साहित्य-प्रासाद ( गद्यवेचे ) २॥ रु.

८ साहित्य-कलश ( पद्यवेचे ) ३ रु.

९ साहित्य-चिंतामणी ( गद्यवेचे ) ३ रु.

१० साहित्य-पराग ( पद्यवेचे ) २॥ रु.

११ लेखनविषयक नियम ( महामंडळाचे ) २० पैसे

१२ मराठी वाङ्मयाचा इतिहास ( खंड ४ ) १५ रु.
● संपादक : रा. श्री. जोग ●

# *अनुक्रमणिका*

महाराष्ट्र साहित्य पत्रिका

[ महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृतिमंडळ पुरस्कृत ]

वर्ष ४४ अंक १६९–१७० १९६९

# संपादकीय –

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा प्रस्तुत १६९–१७० वा जोड अंक वाचकांना सादर करताना त्यांची प्रथम सखेद क्षमा मागणे माझे कर्तव्य होय. शक्यतो जोड अंक काढावयाचा नाही, असा पत्रिकेचे संपादनकार्य स्वीकारताना मी मनाशी संकल्प केला होता: आणि तो तडीला नेण्याचा हा वेळपावेतो मी करता येईल तेवढा प्रयत्नही केला. हे करताना अंक निघण्याला होणारा विलंब मी टाळू शकलो नव्हतो हे खरे; पण आता तशा विलंबाची परिसीमा झाल्याकारणाने प्रस्तुतचा हा अंक जोड अंक म्हणून काढण्याखेरीज गत्यंतरच राहिले नाही.

कोणत्याही नियतकालिकाच्या अंकाच्या प्रकाशनाच्या विलंबाला अनेक कारणे असू शकतात. त्यातील काही अटळ आणि परस्वाधीन स्वरूपाची असणेही संभवनीय असते. लेखकांच्या सहकार्याचा अभाव हे त्यातील एक महत्त्वाचे कारण संभवते, आणि द्रव्याभाव हेही दुसरे तितकेच बिनतोड कारण असू शकते. पत्रिकेच्या अंकांना विलंब होण्याला या दोहोंपैकी कोणतेही कारण जबाबदार आहे असा दावा करण्याचा मला तरी काही अधिकार नाही.

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेला लेखकांकडून इतक्या मनोभावाने भरपूर साहाय्य लाभले आहे की, अनेकवार हाती आलेलेल्या लेखांतीलही कित्येक जागेच्या अभावी पुढील अंकासाठी मागे ठेवावे लागलेले आहेत. पत्रिकेची आर्थिक परिस्थितीही आता तिला महाराष्ट्रराज्य साहित्य संस्कृति मंडळाकडून भरघोस अनुदान मिळत असल्याकारणाने पूर्वीसारखी दुबळी राहिलेली नाही, आणि असे असतानाही तिच्या प्रत्येक अंकाला न चुकता विलंब होत आला आहे, ही वस्तुस्थिती अत्यंत शोचनीय आहे.

ही परिस्थिती अत्यंत खेदजनक आहे खरी; परंतु दुर्दैवाने पत्रिकेच्या प्रकाशकसंपादकांचा तिच्यावर काहीच ताबा नसल्याकारणाने तिच्या संबंधात काहीही उपाय-योजना करता येणे त्यांच्या शक्तीबाहेरचे आहे. म. सा. परिषदेला तिचे स्वतःचे मुद्रणालय नसल्याकारणाने पत्रिकेच्या मुद्रणकार्यासाठी तिला व्यावसायिक मुद्रकांच्या मर्जीवर विसंबून राहावे लागते; व त्यामुळे त्यांची सोय व सवड यावर तिच्या अंकाची प्रसिद्धी सर्वस्वी अवलंबून राहते: आणि नाइलाजाने फिरून फिरून विलंबाचा दोष पत्करण्यावाचून अन्य गती उरत नाही. परिषदेचा स्वतःचा छापखाना असल्याखेरीज ही अडचण दूर होणे सुतराम असंभवनीय आहे, अशी आतापर्यंतच्या अनुभवाने माझी पूर्ण खात्री झाली असून परिषदेच्या आगामी षष्ठ्यब्द महोत्सवाच्या निमित्ताने योजावयाच्या भावी कार्यात मुद्रणालयाच्या योजनेच्या प्रश्नाला अग्रस्थान मिळावे, अशी पत्रिकेचा विद्यमान संपादक या नात्याने माझी परिषदेच्या भावी कार्यकर्त्यांना आग्रहाची शिफारस आहे.

* *

मराठीच्या साहित्यजीवनातील गेले काही महिने अत्यंत दुःखाचे गुजरले. या कालात एकेक मान्यवर साहित्यिक आकस्मिक रीतीने दिवंगत झाल्याच्या वातम्या सारख्या कानावर येत होत्या. त्या तीन-चार महिन्यांच्या कालात, आचार्य प्र. के. अत्रे ( ता. १३ जून ), न्यायरत्न धुण्डिराजशास्त्री विनोद ( ता. १३ जुलै ), अण्णाभाऊ साठे ( ता. १८ जुलै ), द. के. केळकर ( ता. ८ ऑगस्ट ), ह. रा. महाजनी ( ता १७ ऑगस्ट ), रावसाहेब पटवर्धन ( ता २८ ऑगस्ट ), शाहीर अमरशेख ( ता. २९ ऑगस्ट ), यांच्या निधन-वार्तांनी अखिल मराठी जनता दिङ्मूढ होऊन गेली. यातील प्रत्येकाने मराठी भाषा, साहित्य आणि जीवन यांच्या क्षेत्रांत फार मोठी आणि संस्मरणीय कामगिरी केलेली असल्याकारणाने त्यांच्या अवतारसमाप्तीच्या जाणिवेने मराठी रसिकांची मने आत्यंतिक दुःखाने भारावून जाणे अपरिहार्य होय.

अनुक्रमणिका

दुःख ही परिमाणगण्य भावना नाही. पण इतक्या थोरथोर आणि प्रतिभासंपन्न व्यक्ती अत्यंत अल्पावधीत एकामागून एक मृत्युमुखी पडण्यात, ही घटना जितकी दुर्दैवी तितकीच हृदयविदारक आहे. १९१९-२० सालानंतर उण्यापुऱ्या अर्धशतकाने झालेली संकुल साहित्यिक मृत्युयोगाची ही पुनरावृत्तीच होय. बालकवी, टिळक, गोविंदाग्रज इत्यादींच्या निधनाने तेव्हा एका मराठी साहित्यपर्वाचा शेवट झाला; आणि आता या वेळीही आचार्य अत्रे, रावसाहेब पटवर्धन, अण्णाभाऊ साठे इत्यादींच्या मृत्यूने एका साहित्यिकयुगाचा अंत झाला, असे वाटल्यावाचून राहात नाही.

या थोर साहित्यनिर्मात्यांतील प्रत्येकाने आपापल्या कार्यक्षेत्रांत केलेली कामगिरी जशी अमोल तशीच अजोड आहे. आणि त्या सर्वांनीही मराठी साहित्याच्या कीर्तिमंदिरात आपापले स्थान निश्चित आणि अढळ करून ठेवले आहे. भावना, विचार आणि कृती या तिहींचा दुर्मिळ संगम त्या सर्वांच्या जीवनात आणि कार्यात प्रकर्षाने प्रकट झाला असल्याकारणाने अभिजनांप्रमाणे जनसाधारणांच्या अंतःकरणांवरही त्यांच्या व्यक्तित्वाचा असाधारण प्रभाव पडावा, त्यांना विलक्षण लोकप्रियता प्राप्त व्हावी, हे स्वाभाविकच होय.

या महाभागांच्या निधनामुळे मराठी साहित्य, कला, वृत्तविद्या, तत्त्वज्ञान, राजकारण इत्यादींच्या क्षेत्रांत फार मोठी पोकळी उत्पन्न झाली आहे ही पोकळी सहजासहजी भरून येण्यासारखी नाही. यातील कुणा एकाच्याही स्मृतीला अनुरूप अशी श्रद्धांजली वाहावयाचा प्रयत्न करावयाचा तर त्याकरिता अनेक वेगवेगळे विस्तृत लेख लिहून घेतले तरी ते अपुरे पडतील. यामुळे, या टीचभर संपादकीयात तशा प्रकारचे भलते साहस करण्याचा अनुचित प्रकार न करता, केवळ त्यांच्या स्मृतीला सादर अभिवादन करून लेखणीला विराम देतो.

* * *

निसर्गाला रितेपणा रुचत नाही. सामान्य मानवही निसर्गाच्या या प्रवृत्तीचे अनुकरण करून जीवनप्रवाहाची धारा सदैव अखंड वाहती ठेवण्याचा आपल्या परीने प्रयत्न करीत असतो 'The king is dead' अशी आर्त घोषणा करीत असतानाच 'Long live the king' अशी अभिनंदनपर पुस्तीही तिला तो जोडीत असलेला दिसतो. वाङ्मयक्षेत्रही याला अपवाद असू शकत नाही. यामुळे दिवंगतांच्या स्मृतीला श्रद्धांजली वाहात असतानाच वर्तमानाच्या वर्धापनांच्या अभिनंदनांचाही प्रपंच केला तर तो अनुचित ठरू नये.

वर्तमान मराठी साहित्यिकांतील प्रथम श्रेणीच्या मानकऱ्यांपैकी पद्मश्री ग. दि. माडगूळकर व पु. ल. देशपांडे या प्रौढप्रताप लेखकद्वयाने नुकतीच पन्नाशी उलटून एक्कावनाव्या वर्षात पदार्पण करण्याचा सुयोग साधला ही अत्यंत आनंदाची घटना होय. क्षणमप्यवतिष्ठतेश्वसन् यदि जन्तुर्ननुलाभवानसौ, असे कविकुलगुरूनेही म्हटले आहे. स्वाभाविकच या रसिकप्रिय साहित्य कला पुंगवद्वयाचे त्यांच्या असंख्य चाहत्यांनी आणि स्नेह्यांनी मोठ्या उत्साहाने अभिनंदन व शुभचिंतन केले असले तर ते योग्यच होय. त्या त्यांच्या उत्साहात महाराष्ट्र साहित्य पत्रिकाही मनःपूर्वक सहभागी आहे.

'शब्दसृष्टीचे ईश्वर' कविवर ग. दि. माडगूळकर यांच्या पन्नासाव्या वर्धापन दिनानिमित्त पुणे येथे त्यांच्या स्नेह्यांनी आयोजिलेल्या अशा एका अनौपचारिक अभिनंदन समारंभाला पद्मभूषण ना सी. फडके प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. त्यांनी 'ग. दि. मा' व 'पु. ल.' या साहित्यिक-द्वयीचे ज्येष्ठत्वाच्या अधिकाराने भावनायुक्त स्तुतिपर शब्दांत मोकळ्या मनाने तोंडभरून कौतुक केले; व आपल्या पिढीतील आपल्यासुद्धा सर्व प्रमुख साहित्यिकांवर, भाषासरणीतील प्रसाद आणि ऐनजिनसी मराठीपणा या दोन गुणांच्या बाबतीत त्यांनी निश्चितपणे वरताण केली आहे, असा निर्वाळा दिला. प्रा. फडके यांचा पंचाहत्तरावा वाढदिवस त्यापूर्वी थोडेच दिवस होऊन गेला होता; परंतु त्याआधी नुकत्याच झालेल्या आचार्य अत्रे यांच्या निधनामुळे त्याला समारंभाचे स्वरूप येऊ न देण्याचे, प्रा. फडके यांच्याच आदेशावरून, बुद्धिपुरःसर टाळण्यात आले होते. आचार्य अत्रे यांच्या मृत्यूने समाप्त झालेल्या साहित्ययुगाच्या एका विद्यमान ज्येष्ठ प्रतिनिधीकडून वर्तमान पिढीतील या प्रौढ साहित्यिकद्वयाचा गौरव आणि अभिनंदन होण्याचा हा योग म्हणजे " महाराष्ट्र कविपरंपरा—खंड न पडला तिला जरा; " या 'वी' कवींच्या उक्तीचे प्रात्यक्षिकच होय.

एक्कावनाव्या वर्षात पदार्पण करून, 'ग. दि. मा.' आणि 'पु. ल.' यांनी आता 'प्रौढत्वा'तून 'वयस्कते'त प्रवेश केला आहे. 'प्रौढत्वी निज शैशवास जपण्या'चा आपला कवीचा बाणा ते आपल्या भावी वयस्कतेतही पूर्वीप्रमाणेच टिकवून धरतील यात संदेह नाही. 'ग. दि. मा' व 'पु ल.' यांना उदंड आयुरारोग्य लाभून त्यांच्या हातून भारतीय भाषा, साहित्य कला व जीवन यांची प्रगती होण्याला मदत होवो, हीच महाराष्ट्र साहित्य पत्रिकेची हार्दिक शुभेच्छा.

के. नारायण काळे

• • •

# राजमठाचे रहस्य

• रामचंद्र चिंतामण ढेरे •

### गोविंदप्रभू चक्रधरांची निवासस्थाने

महानुभावीय वाङ्मयाच्या अभ्यासकांना 'राजमठ' ही संज्ञा परिचित आहे. महानुभावांचे पुण्यक्षेत्र असलेल्या ऋद्धिपुरातील गोविंदप्रभूंचे निवासस्थान 'राजमठ' या नावाने प्रसिद्ध आहे. हे मूळचे नृसिंहमंदिर. गोविंदप्रभु तथा गुंडम राऊळ हे त्या मंदिरात वावरत; नरसिंहाच्या नैवेद्यासाठी येणारे सात परियळ स्वतः चाखीत; नरसिंहाच्या मूर्तीशी खेळ करीत.[१] केव्हा केव्हा ते ऋद्धिपुराबाहेर जात. परंतु 'राउळेवीण आम्हासि अरीष्टें ऐसी वीघ्नें पावताति:' असे गावातील महाजनांना जाणवले. 'गावीं मड-मंडप-देऊळे असता राउळासि बीढार कैसें नाहीं?' असा प्रश्न त्यांच्या मनात उद्भवला आणि त्यांनी असे निश्चित केले की, 'राउळ आणावे: एक स्वतंत्र बीढार देयावे:' महाजनांचा हा निश्चय श्रद्धेतून उद्भवलेला होता. परंतु राउळांच्या अनुयायांना मठ विकत हवा होता; सत्तेचा व्हायला हवा होता. अखेरीस म्हाइंभटांनी ग्रामस्थ महाजनांना 'साटि आसु चौथरीया' देऊन राजमठ राउळांसाठी विकत घेतला– 'तांबेयाचें पत्र' केले.[२] नंतर राजमठ गुंडम राउळांचे कायमचे निवासस्थान बनले आणि त्यांच्या तेथील अनेक लीळांच्या स्मृतींमुळे महानुभावांचे ते परम पवित्र स्थान बनले.

औरंगजेबाने विजापूरवरील मोहिमेच्या वेळी 'धर्मकार्य' म्हणून या स्थानाची मशीद बनविली. परंतु तरीही 'राजमठा'ची स्मृती शिल्लक राहिलीच. आजही ही मशीद 'राजमठ मशीद' याच नावाने ओळखली जाते.[३] गुंडमप्रभूंची लीलास्थली म्हणून महानुभावांच्या हृदयात या स्थानाविषयीचा श्रद्धाभाव अतूट आहे.

### राजमठ = नृसिंहमंदिर

गुंडम राउळांचे निवासस्थान असलेले ऋद्धिपुरातील नृसिंहमंदिर 'राजमठ' या नावाने ओळखले जाते, हे आपण पाहिले. परंतु 'राजमठ' ही संज्ञा केवळ ऋद्धिपुरातल्या नृसिंहमंदिरापुरतीच मर्यादित नाही. कोणतेही नृसिंहमंदिर महानुभावीय वाङ्मयात 'राजमठ' याच नावाने उल्लेखिले जाते. "नरसिंहमठासच राजमठ ही संज्ञा देण्याचा प्रघात आहे,"[४] असे डॉ. य. खु. देशपांडे लिहितात. डॉ. कोलते यांनी असे स्पष्ट केले आहे की, "महानुभाव पंथात त्यांचे ईश्वरावतार, विशेषतः श्रीचक्रधरस्वामी आणि श्रीगोविंदप्रभू ठिकठिकाणी ज्या नृसिंहमंदिरांत राहिले, ती सर्व स्थळे 'राजमठ' या नावाने प्रसिद्ध आहेत."[५] चक्रधरस्वामींचा ज्यांच्याशी संबंध आला, अशा अनेक नृसिंहमंदिरांचे अथवा राजमठांचे उल्लेख 'लीळाचरित्रा'त अनेक ठिकाणी आलेले आहेत[६] 'स्थानपोथी'त अशा स्थानांची तपशीलवार विवरणेही आलेली आहेत.

चक्रधरस्वामींचा संचार विदर्भात आणि मराठवाड्यात गोदावरीच्या दोन्ही तीरांवर (उभयगंगातीरांवर) प्राधान्याने घडला. या भागात अनेक नृसिंहमंदिरे आहेत. या बहुतेक नृसिंहमंदिरांशी चक्रधरांचा संबंध आलेला दिसतो. हिरण्यकशिपूचा वध केल्यानंतर, त्या कृतीने आलेले अशुचित्व दवडण्यासाठी नृसिंहाने ब्रह्म्याच्या आदेशाने ज्या ज्या तीर्थात स्नाने केली, त्या त्या ठिकाणी विश्वकर्म्याने मंदिरे उभारली आणि प्रतिमा स्थापन केल्या, असे महानुभाव कवी कृष्णमुनी डिंभ

१. श्रीगोविंदप्रभु-चरित्र : संपा. डॉ. वि. भि. कोलते. मलकापूर, १९६०. पृ. ३८, लीळांक १११–११२.

२. तत्रैव, पृ. ३८–३९, लीळांक ११५.

३. महानुभाव संशोधन : १ : डॉ. वि. भि. कोलते. मलकापूर, १९६२. पृ. १५८–१५९.

४. श्रीऋद्धिपुरवर्णन : संपा. डॉ. य. खु. देशपांडे यवतमाळ, १९२९. प्रस्तावना, पृ. १९.

५. महानुभाव संशोधन : १, पृ. १५७.

६. लीळाचरित्र : संपा. डॉ. शं. गो. तुळपुळे. पुणे, १९६४-१९६७. पूर्वार्ध–२, पृ. २४–२५; उत्तरार्ध–१, पृ. ६२–६५, इत्यादी.

याने 'ऋद्धिपुरमाहात्म्या' त म्हटले आहे.[७] तीर्थस्नानांनीही नृसिंहाची गात्रे निष्पाप बनली नाहीत; त्रेतद्वापर युगे संपून कलियुग सुरू झाल्यानंतर परमेश्वराने स्वीकारलेल्या अवतारांचा (म्हणजे गुंडम राऊळ व चक्रधरस्वामी यांचा) संबंध घडल्यानंतरच नृसिंहाचे पाप नाहीसे होऊन तो स्वानंदाने निजपदी आरूढ झाला, अशी महानुभावीयांची श्रद्धा आहे. गुंडम राऊळ आणि चक्रधरस्वामी नृसिंहमंदिरातच का उतरत असत, या प्रश्नाचे हे श्रद्धेने दिलेले उत्तर आहे. नृसिंहमंदिरालाच राजमठ म्हणतात, हे कृष्णमुनी डिंभाने आपल्या ग्रंथात स्पष्ट केले आहे—

*नृसिंहें जेथे केली वस्ती ।*
*तेथें नृसिंहमठ केला निगुती ।*
*तयासि राजमठ म्हणती ।*
*कळयुगी मुनिजन ॥ (ऋ. मा. ४.३७)*

राजमठ म्हणजे नृसिंहमठ अथवा नृसिंहमंदिर ही धारणा येथे अगदी स्पष्टपणे व्यक्त झालेली आहे. या संदर्भातच कृष्णमुनीने आणखीही थोडा सूक्ष्म तपशील पुरविला आहे. तो म्हणतो–

*जेथें भयेंकर रूप तेजिलें ।*
*तथें विश्वकर्मेनि नृसिंहाळय केलें ।*
*तयासि मुनिजनीं नाव ठेविलें ।*
*राजमठ ऐसें ॥ (ऋ. मा ४. १४)*

याचा अर्थ असा की, नृसिंहाने हिरण्याकशिपूच्या वधासाठी धारण केलेली उग्रभीषणता टाकून सौम्य रूपाने जेथे निवास केला, ते नृसिंहालय 'राजमठ' अशी संज्ञा पावले. कृष्णमुनीने पुरविलेली ही माहिती राजमठाचे रहस्य शोधण्याच्या दृष्टीने महत्त्वाची आहे, हे पुढे विवेचनाच्या ओघात स्पष्ट होईलच. कृष्णमुनीने आपल्या ग्रंथात छिन्नपाप (डोंब्रेग्राम), खडकुळी-सावखेड, नांदेड, देऊळवाडा, ऋद्धिपूर, इत्यादी अनेक नृसिंहस्थानांचा निर्देश केला आहे.

## 'राजमठा' चा अर्थ लावण्याचे प्रयत्न

महानुभावीय वाङ्मयाच्या अभ्यासकांनी 'राजमठ' या संज्ञेचा अर्थ लावण्याचा प्रयत्न अभावानेच केलेला आहे. राजमठ म्हणजे नृसिंहमंदिर, ही महानुभावांची पारंपरिक धारणा नुसती नोंदविण्यापलीकडे त्यांनी या संज्ञेकडे गांभीर्याने पाहिलेले दिसत नाही. डॉ. तुळपुळे यांनी या संज्ञेचा अर्थ 'गावातील मुख्य देऊळ,' 'प्रमुख देऊळ' असा दिला आहे.[८]

त्यांनी दिलेला हा अर्थ मुळीच समर्थनीय नाही, हे उघड आहे.

'राजमठ' या संज्ञेतील 'मठ' हे उत्तरपद मंदिराचा पर्याय आहे, यात शंका नाही. प्रश्न आहे तो 'राज' या पूर्वपदाच्या अर्थाचा. 'मुख्य', 'प्रमुख' असा त्या पदाचा अर्थ करण्याचा मोह होणे स्वाभाविक आहे. जसे, मृगराज = मृगमुख्य. परंतु मग एखाद्या गावात शिवाचे मंदिर मुख्य असेल, तर त्या मंदिराला 'राजमठ' का म्हणावयाचे नाही ? नृसिंहेतर देवतांच्या मंदिराला कुठे 'राजमठ' म्हटलेले नाहीच. मग राजमठ म्हणजे मुख्य देऊळ असे कसे मानता येईल ?

## राजा हे नृसिंहाचेच नाव

राजमठ म्हणजे जर नृसिंहमंदिर आणि मठ म्हणजे जर मंदिर, तर 'राज' – राजा हे पूर्वपद नृसिंहासाठी आहे, असेच मानायला हवे. नृसिंहाचे एक नाव 'सामराज' असे आहे. मराठी भक्तिसाहित्यातही नृसिंहभक्तिपर रचनातून या नावाचा वापर वारंवार झालेला आहे. 'जय जय सामराजा सामराजा । आकांतीं पावसी देवा भक्तकाजा ।' असा समर्थांनी त्याचा जयजयकार केला आहे,[९] तर 'श्रीसामराजा, तूं स्वामि माझा ।' अशा शब्दांत मध्वमुनीश्वरांनी त्याचे दास्य गाजविले आहे.[१०] प्रख्यात पंडितकवी सामराज याचे नृसिंह हे दैवत असल्यामुळेच त्याचे सामराज हे नाव ठेवले गेले होते. 'सामराज' हे नृसिंहाच्या सौम्य रूपाचे नाव आहे. 'सौम्य झाला नरहरि स्वामी दासाचा ।' असा भक्तांचा अनुभव आहे.[११] नृसिंहाने जेथे 'भयंकर

---

७. श्रीऋद्धिपुरमाहात्म्य : संपा. डॉ. यू. म. पठाण. औरंगाबाद, १९६७. प्रसंग ४.

८. लीळाचरित्र, पूर्वार्ध-२, पृ. १५१; उत्तरार्ध-१, पृ. २००; श्रीऋद्धिपुरवर्णन (पुणे, १९६७), पृ. ११४.

९. श्रीसमर्थांचा गाथा : संपा. अनंतदास रामदासी, वाई, श. १८५०. पृ. ३४५.

१०. मध्वमुनीश्वरांची कविता : संपा. प्र. व्यं. गुर्जर. पुणे, १९३३. पृ. ८८.

११. मराठी आरती : डॉ. म. वि. गोखले. पुणे, १९६७. पृ. ४४५.

रूप तेजिलें', तेथे राजमठ उभारले गेले, ही कृष्णमुनीने पुरविलेली माहिती नृसिंहाच्या 'सामराज' या नावाशी सुसंवादी आहे. या पार्श्वभूमीवर राममठ ही संज्ञा सामराजमठाचे संक्षिप्तीकरण दिसते. सामराज म्हणजे सौम्य नृसिंह, अर्थात् राजा म्हणजे नृसिंह. सामराज या नृसिंह नामाशी संबंध असलेले एक नृसिंहक्षेत्र महाराष्ट्रात आहे.

### सांवखेड आणि राजसदन

औरंगाबाद जिल्ह्यात गोदावरी आणि शिवणा या दोन नद्यांचा संगम जेथे झालेला आहे, तेथे प्रवाहाच्या मध्यभागी एक बेट आहे. त्या बेटाला मणिपर्वत असे म्हणतात. या मणिपर्वतावर नृसिंहाचे ठाणे आहे. हे नृसिंहक्षेत्र सांवखेड या नावाने ओळखले जाते आणि जवळच असलेले शेंदूरवाडे हे राजसदन या नावाने ओळखले जाते. सांवखेड आणि राजसदन ही दोन्ही क्षेत्रनामे नृसिंहाशी संबंधित आहेत. सांव म्हणजे साम. ऋद्धिपूरच्या राजमठाला पंडित नारायणव्यास बहाळिये याने 'ऋद्धिपूरवर्णना'त अनेकदा 'राजभुवन' असेही म्हटले आहे, हे 'राजसदन' या क्षेत्रनामाच्या संदर्भात ध्यानी घ्यावे.[१२] मध्वमुनीश्वरांनी सांवखेडच्या नृसिंहाचा आणि तत्संनिध असलेल्या राजसदन क्षेत्राचा गौरव गाणारी अनेक पदे रचलेली आहेत.[१३] चक्रधरस्वामींचा निवास खडकुळी येथे असताना ज्या लीळा घडल्या, त्या लीळांच्या वर्णनात खडकुळीपासून जवळच असलेल्या सांवखेडचा उल्लेख अनेक वेळा आढळतो. कृष्णमुनी डिंभानेही हे नृसिंहक्षेत्र आवर्जून उल्लेखिले आहे.[१४]

राज-राजा म्हणजे नृसिंह हे सत्य जरी आपल्या हाती आले, तरी मुख्य प्रश्न असा उरतोच की, नृसिंहाला राजा का म्हणावयाचे? राज-राजा याचा अर्थ नृसिंह असा कसा होतो? या प्रश्नाचा शोध घ्यायचा झाला, तर आपल्याला एका जटिल सांस्कृतिक प्रक्रियेचाच वेध घ्यावा लागणार आहे. त्यासाठी आपल्याला नृसिंह या देवतेचे स्वरूप उकलावे लागेल आणि त्या उकलीतूनच कदाचित त्याच्या राजस्वरूपावर प्रकाश पडू शकेल. या दृष्टीने आपण प्रथम प्राचीन मराठी वाङ्मयातील नृसिंहविषयक उल्लेखाचा धांडोळा घेऊ आणि त्या उल्लेखांतून ध्वनित होणाऱ्या नृसिंहस्वरूपाला तत्पूर्वकालीन साधनांनी पुष्टी मिळते काय, ते पाहू.

### शकुनीचे नरसिंसाधन

महानुभाव कवी नरसनारायण याच्या 'शल्यपर्वा'त नरसिंहसाधनाचा एक भीषण प्रसंग वर्णिलेला आहे.[१६] पांडवांच्या विनाशाचा उपाय म्हणून शकुनी स्मशानात जाऊन हे नृसिंहसाधन करतो, असा तो प्रसंग आहे. स्मशानात प्रेतमंदिरे उभवलेली आहेत; शंकिणी, डाकिनी यक्षिणी, भैरव, क्षेत्रपाळ, वेताळ इत्यादिकांची तिथे गर्दी झालेली आहे; भूतावळी रक्तामांसाचा भोग अनुभवीत आहे. अशा वातावरणात शकुनीने भूतावळीसाठी मांस-मंदिरेचा सुकाळ केला; पुढे अग्निकुंड सिद्ध करून त्यात अग्नी चेतविला आणि अपसव्य प्रेते मांडून, त्यांवर नग्नावस्थेत बसून चतुष्पादांच्या आहुती द्यायला प्रारंभ केला. पूर्णाहुतीची वेळ येताच भोवती 'भूतसृष्टीचा गोंधळ' घेऊन भयानक नृसिंहमूर्ती प्रकट होऊ लागली. जर पूर्णाहुती पडून नरसिंहाचे प्रकटणे पार पडू शकले, तर 'पृथ्वीचिया रायांतें। मारूनि राज्य करीन निरुतें।' अशी आकांक्षा शकुनीच्या मनात उदित झाली. इतक्यात श्रीकृष्णाच्या आदेशाने अर्जुनाने देवदत्त शंख आवेगाने फुंकला आणि हनुमंताने भुभुःकार केला त्या महाध्वनीमुळे शकुनीच्या मुखीचा मंत्र चळला—

*मंत्र मुखीचा चळला। मग नरसिंह तप्त जाला।*
*क्रोधें उठावला। सकुनियावरी॥*
*करितां नरसिंहाचें स्मरण। जरी चुके मंत्राचें ध्यान।*
*तरी आंगीं लागे पिशाचपण। अथवा तेथेंचि मरे॥*
*तैसें सकुनियालागी जालें। दोन्ही ठावो असती अंतरले।*
*तंव श्रीकृष्ण अर्जुन पावले। पुढां समीपत्व॥*
*पुढां कोपला पंचाननु। म्हणे यासी करावा प्रयत्नु।*
*मग आपुली मांडी चिरून। नरसिंह असुखें सिंपिला॥*
*आनिक केलें विधान। स्मरिलें नरसिंहाचें जमनस्थान*
*जैसा उठविला होता जाण। तैसा मागौता बैसविला॥*
(श. प. ४. ५४–५८)

१२. ऋद्धिपुरवर्णन, ओ. ३८९, इत्यादी

१३. मध्वमुनीश्वरांची कविता, पदांक ३०७, ६५३, इत्यादी.

१४. लीळाचरित्र, उत्तरार्ध १, लीळांक ९, ११, १८, १९, ५६.

१५. श्रीऋद्धिपुरमाहात्म्य, ३·८२–८३, ४·२०–२२.

१६. शल्यपर्व : संपा. डॉ. यू. म. पठाण. औरंगाबाद, १९६४. प्रसंग ४.

शकुनीचे हे नरसिंहसाधन वेताळसाधनासारखे अथवा यक्षिणीसाधनासारखे उग्र आहे. स्मशान, भूतावळी, मांस, मदिरा, विनाशक हेतू आणि मंत्र चळण्यामुळे होणाऱ्या आत्मघाताचे भय — हे सर्वच वातावरण भीषण आहे. या सर्व वर्णनातून असे ध्वनित होते की, नृरसिंह ही भूत-पिशाचांच्या श्रेणीतली आणि त्यांवर प्रभुत्व गाजविणारी उग्र देवता असल्याची नवरसनारायणाची समजूत आहे. आणखीही एक विशेष ध्यानात घेण्यासारखा आहे, तो हा की, नवरसनारायणाने नरसिंहाला वारंवार 'वीर' म्हटले आहे. आणि याच संदर्भात 'बावन वीरां'चा व 'वीर वेताळा'चा उल्लेख केला आहे.[१७] तसेच त्याने आणखीही एका प्रसंगी भूतावळी आणि नरसिंह यांचा यांचा संबंध सांगितला आहे—

*सर्व भूतांसी बळ दीजे । आधीं नरसिंह सादर कीजे ।*
*तेव्हां निधान सिद्धिजे । पृथ्वी आंतील ॥*

(ज्ञ. प. १. १०६८)

नवरसनारायण नरसिंहाचा समावेश 'बावन वीरां'त करतो आणि त्याला प्रसन्न करण्यासाठी यक्षिणीसाधनासारखे उग्र साधन करण्याची आवश्यकता ध्वनित करतो, ही बाब नृसिंहस्वरूपावर वेगळाच प्रकाश टाकणारी आहे.

**'भूतावळीचा पुढारू'**

दुसरा एक महानुभाव कवी संतोषमुनी कृष्णदास याच्या 'रुक्मिणीस्वयंवरा'तही नृसिंहाचे असेच स्वरूप प्रकटले आहे.[१८] श्रीकृष्ण रुक्मिणीला रथात घालून द्वारकेकडे चालला असताना वाटेत त्याचा पाठलाग करणाऱ्या रुक्मीशी त्याचा जो संघर्ष झडला, त्या संघर्षाच्या वर्णनाचे निमित्त आहे. रुक्मीने भूतास्त्र अभिमंत्रून 'औट कोटी भूतावळी' उठवली; वेताळ, मैराळे, झोटिंग, ब्रह्मग्रह, जोगिणी, इत्यादी भुते यादवसैन्याला 'खाऊ-गिळू' करू लागली. या भूतांचा परिहार करण्यासाठी—

*मग नरसिंहास्त्र अभिमंत्रुनी । देवें घातलें तत्क्षणीं ।*
*तंव नरसिंह चालिले जाणी । भुतांतें ग्रासावया ॥*
*षोंषियेखालुते नर । वरूतें सिंहाचें कळिवर ॥*
*ऐसे नरसिंहु चालिले अपार । देखा तिये वेळीं ॥*
*आवेसें किंकळिया देती । तेणें फुटों पाहे आकास क्षिती ।*
*कोपु न समाये त्रिजगतीं । नरसिंहु वीरांचे ॥*

(रु. स्व २२. ७१-७३)

श्रीकृष्णाने अभिमंत्रिलेल्या नरसिंहास्त्राच्या प्रभावाने उठलेल्या असंख्य नरसिंह 'वीरां'नी भूतावळीचा संहार आरंभिल्यावर भूतसृष्टी 'दांतें आंगुळिया धरून' नरसिंह वीराची कृपा भाकू लागली—

*तूं तंव आमचा आदिगुरु । आणि तूंचि ये भूतावळीसी पुढारु ।*
*तरी कां करितासी संहारु । सेवकांचा ? ॥*

(रु. स्व. २२.७८)

संतोषमुनीच्या मते नरसिंह हा भूतावळीचा आदिगुरू आणि 'पुढारू' असून, सगळी भूतावळी ही त्याची सेवक आहे. संतोषमुनीही नरसिंहाला 'वीर' म्हणतो आणि त्याच्या परिवारात 'बावन वीरां' पैकी अनेक वीरांचा समावेश करतो, हे ध्यानी घेण्यासारखे आहे. 'ऋद्धिपुरमाहात्म्या'चा कर्ता कृष्णमुनी डिंभ यानेही आपल्या 'आत्मतीर्थप्रकाश' नामक ग्रंथात नरसिंहाला भूत-पिशाचश्रेणीतच गणले आहे.[१९]

**'नरसींमंत्रे भुते जाती'**

नवरसनारायण, संतोषमुनी कृष्णदास आणि कृष्णमुनी डिंभ हे तिघेही महानुभाव कवी आहेत. महानुभाव संप्रदाय श्रीकृष्णेतर अवतारांना परमेश्वर मानीत नाही. त्यामुळे त्या संप्रदायाचे कवी आपल्याला अमान्य असलेल्या देवतांचे हेतुतः विडंबन करण्याचा संभव गृहीत धरला पाहिजे, हे मला मान्य आहे. परंतु जे ग्रंथकार दहाही अवतारांना परमेश्वरावतार मानतात, नृसिंहाविषयी भक्तिभाव बाळगतात, त्यांच्याही ग्रंथांत जर नृसिंहाविषयी अशाच प्रकारचा भाव सहजपणे प्रकट झालेला असेल, तर ती वस्तुस्थिती नृसिंहस्वरूपाचा गंभीर विचार करायला लावणारी ठरेल, यात शंका नाही. महानुभावेतर मराठी संतांनी नृसिंहाचा समावेश कोणत्या श्रेणीत केला आहे, ते जाणून घेण्यासाठी त्यांची पुढील काही बोलकी वचने पाहा—

---

१७. तत्रैव, २.२११; ३.२५३; ३.२७५; ३.२८०; ३.३१४; ३.३४९.

१८. संतोषमुनि कृष्णदास-विरचित रुक्मिणीस्वयंवर : संपा. ना. व. जोशी. हैदराबाद, शके १८८६. प्रसंग २२ वा.

१९. आत्मतीर्थप्रकाश : संपा. कृष्णदास महानुभाव. हैदराबाद, श. १८८५. ७.३९४.

*वीर झोटिंग नरसिंग चेडा ।*
*वेताळाचा पूजिती खोडा ।*
*शेंदूर माखोनिया धोंडा ।*
*शेळी बोकड जीव घेती की ॥*[२०]

—एकनाथ

*तुकाई ना नरसो मायराणी स्मशानीं वसती ।*
*भोगें घालितीं गोंधळ ।*
*अजपुत्रास वधिनी भक्त म्हणविती ।*
*पापें करितीं तुंबळ ॥*[२१]

—शेख महंमद

*बुलगावा मुंजा नरसिया झोटिंग ।*
*पूजा कीजे सांग देवतांची ॥*[२२]

—समर्थ रामदास

*जाखिणी जाखाई दैवतें अनेक ।*
*वेताळ मेसोबा प्रेत झोटिंग ।*
*नरस्यादि पळतां न पाहती मागें ।*[२३]

—आत्मारामस्वामी

अशा वचनांची मालिका आणखीही वाढवता येऊ शकेल. वरील वचनांतून हे स्पष्ट होते की, अनेक मान्यवर मराठी संतांनी नरसिंह हा स्मशानात राहणारा, वेताळादी वीरांच्या श्रेणीतला देव आहे, असा भाव स्पष्टपणे व्यक्त केला आहे. नरसिंह हा भुतांचा अधिपती असल्यामुळे त्याच्या मंत्राचा जप केल्याने भूतपिशाचांचा परिहार होतो, हेही मराठी संतांना मान्य आहे.

'नरसीमंत्रें भुतें जातीं' असे समर्थांनी म्हटले आहे.[२४] कृष्णयाज्ञवल्की,[२५] कृष्णदयार्णव,[२६] इत्यादी अनेक संतकवींनीही अशीच श्रद्धा व्यक्त केली आहे.

२०. श्रीएकनाथमहाराज यांच्या अभंगांची गाथा : संपा. त्र्यं. ह. आवटे. पुणे, श. १८३०. क्र. ३८९०, पृ. ७८३.

२१. शेख महंमदबाबा-कृत कवितासंग्रह : संपा. वा. सी. बेंद्रे. पृ. १०९.

२२. रामदासांची कविता, भाग १ : संपा. शं. श्री. देव. धुळे. पृ. २०१.

२३. दासविश्रामधाम : संपा. शं. श्री. देव. धुळे. ३·४९.

२४. रामदासांची कविता, भाग १, पृ.

२५. कथाकल्पतरू, ५. ३·१०४.

२६. हरिवरदा, ५५·१८४.

## अवतार नरसिंह आणि 'वीर' नरसिंह एकच

वरील संतकवींच्या नरसिंहविषयक उपरिनिर्दिष्ट वचनांबाबत अशी सोडवणूक करून घेता येऊ शकेल की, या वचनांत उल्लेखिलेला नरसिंह हा परमेश्वरावतार नरसिंहाहून वेगळा असा एक क्षुद्र देव आहे; नावापलीकडे त्याचा अवतार नरसिंहाशी काहीही संबंध नाही. जर हे मराठी संत एकीकडे नरसिंहाला परमात्म्याचा अवतार मानतात; त्याची भक्तिगीते रचून गातात; तर मग ते आपल्याला प्रिय असणाऱ्या दैवताचा अशा हीन श्रेणीत समावेश कसा करतील ?— ही शंका स्थूलतया प्रबल वाटते.

परंतु देवताविज्ञानाच्या अभ्यासकांना हे परिचित आहे की, एखादी देवता क्षुद्र श्रेणीतून उन्नत बनल्यानंतरही तिच्या मूलरूपाची स्मृती समाजमानसातून नकळत पाझरत राहतेच. विनायक आणि खंडोबा यांच्याविषयी श्रद्धाभाव बाळगणाऱ्या मराठी संतांच्या ग्रंथांतून त्या दैवतांविषयीचे असे कितीतरी उल्लेख आलेले आहेत की, ज्यांतून त्या दैवतांच्या मूलरूपांचे भान घडू शकते. नरसिंहाविषयीही नेमके हेच घडले आहे. शकुनीने स्मशानात आव्हानिलेला नरसिंह तोच आहे की, जो 'मागें हिरण्याक्षावरी। स्तंभ फोडोनि निघाला बाहेरी !,'[२७]

## नरसिंह : 'बावन वीरां' तील एक वीर

कलगी-तुरा संप्रदायाचे मराठी शाहीर बावन वीरांना आपली दैवते मानतात आणि प्रतिपक्षावर मात करण्यासाठी त्यांना आवाहन करतात. त्यांची ही आवाहनगीते 'वीर' नावानेच प्रसिद्ध आहेत. शाहिरांच्या या 'वीर' नामक आवाहनगीतांत 'बावन वीर', 'पंच वीर' हे वीरसमूह उल्लेखिलेले असून, त्यांत अनेक वीरांच्या नावांत नरसिंहाचाही समावेश आहे[२८]—

*चले आयेगा बेताल रगडकर, जावे नरसिंग झोटिंग ।*
*तरे लहूका टिका लगाकार फिर खडा हूं मसानको ॥*
*महाबीरपर टोला मरीका आया हुंदाडा भैरवका ।*
*नरसिंग झोटिंग अलग उडा देऊं पता ना लागे*
*शाहिरका ॥*

२७. शल्यपर्व, ३·३१५.

२८. मराठवाड्यातील कलगीतुऱ्याची आध्यात्मिक शाहिरी : प्रा. प्र. भा. मांडे. औरंगाबाद, १९६५. पृ. ५७, ११८, १२०.

*आगाडी चौकी मरी मांकी ।*
*पीछे दिये चौकी भैरवकी ॥*
*डावी चौकी बीर नरसिंगकी ॥*

महानुभाव कवी, महानुभावेतर मराठी संतकवी आणि कलगीतुरा संप्रदायाचे मराठी शाहीर यांच्या रचनांतून येणारे हे सर्व नृसिंहविषयक उल्लेख बारकाईने पाहिले असता असे दिसून येते की, नरसिंह हा वेताळ-झोटिंगादी उग्र देवतांच्या श्रेणीतील देव असून, त्याचा 'बावन बीरां' त समावेश होत असे. प्रल्हादाच्या भक्तीने तुष्ट झालेल्या आणि त्याचा कैवार घेऊन हिरण्यकशिपूच्या वधासाठी अवतरलेल्या नरसिंहाचे हे मूलरूप असावे आणि नरसिंह हा वैष्णव परंपरेत परमेश्वरावतार म्हणून सुप्रतिष्ठित झाल्यानंतरही लोकमानसातून त्याचे लोकप्रिय मूलरूप पाझरत राहिले असावे.

नरसिंहाचे हे स्वरूप केवळ मराठी वाङ्मयातच नव्हे, तर अन्य भारतीय लोकभाषांतील वाङ्मयातही प्रतिबिंबित झालेले आहे. नरसिंहाच्या 'वीर'–स्वरूपाची ही सार्वत्रिक जाणीव हेच सिद्ध करते की, त्याचे हे 'वीर'–रूपच मूळचे असावे. परंतु केवळ भारतीय लोकभाषांतील वाङ्मयाच्या आधारे अनुमान करीत न बसता, आपण त्यापूर्वीच्या प्राचीन साहित्याचा या संदर्भात जर धांडोळा घेतला आणि त्यातूनही नरसिंहाचे हेच विशेष सूचित झाले, तर आपण सत्याच्या निकट जाऊ शकू.

## मातृगणाचा नियंत्रक नरसिंह

ज्या पुराणांनी नरसिंहाची अवतारप्रतिष्ठा गाजविली आहे, त्या पुराणांतूनही नरसिंहाचे हे स्वरूप परिस्फुटित झालेले आहे. मत्स्यपुराणात एकशे एकोणऐंशीव्या अध्यायात शिवान्धक-संघर्षाची कथा आहे : पार्वतीला पळवून नेऊ लागलेल्या अंधकासुराशी शिवाचे युद्ध सुरू झाले. शिवाने अंधकावर पाशुपतास्त्र सोडले. त्याच्या आघाताने अंधकाच्या शरीरातून रक्त वाहू लागले; परंतु त्या रक्ताच्या थेंबाथेंबातून अनंत अंधक निर्माण होऊन उत्पात करू लागले. यावर उपाय म्हणून शिवाने रक्तपान करणाऱ्या उग्रभीषण मातृकांची निर्मिती केली.[२९] त्यांच्या साहाय्याने शिवाने अंधकावर विजय मिळविला; परंतु त्या विजयानंतर एक नवेच संकट उपस्थित झाले त्या रक्तपिपासू महाभयानक मातृका शिवाला म्हणू लागल्या—

*भगवन् भक्षयिष्यामः सदेवासुरमानुषान् ।*
*त्वत्प्रसादाज्जगत्सर्वं तदनुज्ञातुमर्हसि ॥*

( मत्स्य. १७९·४१ )

[ हे भगवन्, आम्ही सर्वजणी देव-दैत्य-मनुष्यांसकट सर्व जगताला तुझ्या कृपेने खाऊन टाकू – आम्हांला तशी अनुज्ञा दे. ]

शिवाने त्यांना या घोर संकल्पापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला; पण त्याचा उपयोग झाला नाही. अखेरीस शिवाने मातृकांच्या नियंत्रणासाठी नरसिंहाची प्रार्थना केली. हिरण्यकशिपूच्या रक्ताने ज्याची नखे रंगलेली आहेत, असा नरसिंह प्रकट झाला आणि त्याने मातृकांना नियंत्रित करून त्यांना लोकपालनाची आज्ञा केली.

या मातृका 'औटकोटी भूतावळी' पैकीच आहेत. त्यांचे नियंत्रण करणारा नरसिंह तोच प्रल्हादप्रिय नरसिंह आहे, हे ध्यानी घेता विष्णूचा अवतार म्हणून गाजलेल्या नरसिंहाची मूल प्रकृती काय असावी, याची जाणीव होऊ लागते.

## 'उग्र वीर' नरसिंह

नरसिंह हा एक 'वीर' देव असल्याची जाणीव केवळ मराठीतील आणि तत्समकालीन अन्य भारतीय भाषांतील साहित्यातच नव्हे, तर नरसिंहोपासनापर संस्कृत साहित्यातही व्यक्त झालेली आहे. 'ऋणमोचन-स्तोत्र' नामक नृसिंहस्तोत्रात––

*श्रीनृसिंहं महावीरं नमामि ऋणमुक्तये ।*

अशा प्रकारे नृसिंहाला 'महावीर' म्हणून ऋणमुक्तीसाठी नमन केले आहे. 'नरसिंहमंत्रराज' म्हणून नृसिंहोपासनेत प्रसिद्ध असलेला मंत्र असा आहे––

*उग्रं वीरं महाविष्णुं ज्वलन्तं सर्वतोमुखम् ।*
*नृसिंहं भीषणं भद्रं मृत्युमृत्युं नमाम्यहम् ॥*

या मंत्रात नृसिंहाला 'उग्र वीर' म्हटले आहे. 'पिशाचमोचनस्तोत्र' नामक आणखी एका नृसिंह-स्तोत्रात—

२९. 'मत्स्यपुराण', १७९·१०–३२ मध्ये मातृकांची विस्तृत नामावली आहे. 'गरुडपुराण'तही ही कथा याच स्वरूपात वर्णिलेली आहे.

अनुक्रमणिका



*यद्ग्रासकं ग्रासकाणां वीराणां च विवर्धनम् ।*
*व्यापकं व्यापकानां च तद्धि ब्रह्म नमाम्यहम् ॥*

असे ' उग्र वीर ' या नावाचे तात्त्विक उन्नयन घडविले आहे. ' मंत्रराजा 'तील ' उग्र वीर ' या विशेषणांची अशीच तात्त्विक निरुक्ती ' नृसिंहपूर्वतापनीयोपनिषदा 'ने दिली आहे.[३०] ' एष एवोग्र एष एव वीर ... ' असे नृसिंहाचे वर्णन ' नृसिंहोत्तरतापनीयोपनिषदा ' ने केले आहे.[३१]

उपासकांच्या दृष्टीत नरसिंहाचे परमात्मस्वरूपच भिनलेले असल्यामुळे त्यांनी ' उग्र वीर ' या विशेषणांचे विवरण त्या उदात्त स्वरूपाला अनुसरून करणे स्वाभाविक असले, तरी नृसिंहाच्या स्वरूपवर्णनात त्या विशेषणांचा प्रवेश त्याच्या मूल रूपाच्या विशेषातूनच झालेला आहे, हे उघड आहे. नृसिंहविषयक वाङ्मयीन सामग्रीत आवर्जून येणाऱ्या या विशेषणाचा अर्थ काय, हे आता पाहिले पाहिजे.

## वीर म्हणजे यक्ष

वीर हा यक्षवाचक शब्द आहे. ' बावन वीर ' अथवा ' पंच वीर ' हे देवतासमूह यक्षश्रेणीतले आहेत. डॉ. वासुदेवशरण अग्रवाल या महापंडितांनी यक्षविषयक जे मौलिक संशोधन केले आहे, त्यात त्यांनी यक्षाच्या या ' वीर ' संज्ञेची विपुल चर्चा केली आहे.[३२] ' बावन वीरां 'च्या ज्या अनेक नामावळी उपलब्ध होतात, त्यांत सर्वत्र नरसिंहाचा न चुकता समावेश झालेला आहे.[३३] यक्षांची उपासना भारतीय ग्रामजीवनात अगदी आजपर्यंत लोकप्रिय आहे, ती प्राधान्याने वीरोपासनेच्या नावानेच आहे. ' वीर ' देव भारतीय जनजीवनात दृढमूल होऊन बसले होते; भारतीय लोकधर्माच्या घडणीत या वीरांचा म्हणजेच यक्षांचा वाटा फार मोठा आहे.

वीर ही यक्षवाचक संज्ञा असली, तरी त्या संज्ञेत यक्षांचा एक विशेष दाखवणारी छटा आहे; वीर हे सामान्यतः उग्र आहेत, विनाशक शक्तीने युक्त आहेत, अशी समजूत आहे. नरसिंह हा ' उग्र वीर ' म्हणून प्रसिद्ध असल्याचे आपण पाहिलेच आहे. तो यक्ष आहे, हे आता स्पष्टच झाले आहे. तो मूळचा सिंहमुखी यक्ष आहे. मानवेतर प्राण्यांची मुखे असलेल्या यक्षमूर्ती अनेक मिळालेल्या आहेत. तेव्हा सिंहमुखी यक्षाचे अस्तित्व संभवनीयतेच्या कक्षेतले आहे. हा सिंहमुखी उग्र यक्ष जनमानसाच्या व्यापक श्रद्धेचा विषय आहे, असे पाहिल्यावर भारतीय धर्मधुरीणांनी कौशल्याने त्याला विष्णूचा अवतार बनविले आणि त्याच्या उग्रवीरत्वाचा उपयोग नव्या अवतारकथेत करून घेतला. यक्ष नरसिंहाचे हे वैष्णवीकरण म्हणजे भारताच्या सांस्कृतिक घडणीतील एक विलक्षण रहस्यमय घटना आहे.

## काष्ठस्तंभाचे गूढ

भारतीय देवतामंडलातील देवतांच्या स्वरूपाचे विश्लेषण आपण करीत राहिलो, तर आपणास त्यातून त्या त्या देवतांची जडणघडण करणाऱ्या लोकमानसाची आंतरप्रक्रिया उलगडत जाते. विशेषतः परकीय देवतांचा स्वीकार करताना अथवा क्षुद्र देवतांचे उन्नयन घडविताना त्या त्या देवतांच्या मूलस्वरूपाची सामग्री कौशल्याने उपयोगात आणण्याची प्रवृत्ती प्रकर्षाने आढळून येते. यक्ष नृसिंहाला विष्णूचा अवतार बनविताना, त्याची जी अवतारकथा रचली गेली आहे, त्या कथेतील सर्व सामग्री ही यक्ष नृसिंहाच्या मूलरूपाशी कुठल्या ना कुठल्या तरी प्रकारे संबंधित असलीच पाहिजे, असा कयास अगदीच विफल ठरणार नाही. अर्थात आज त्या सर्व सामग्रीचा उलगडा करण्याइतकी साधने आपल्या हाती नाहीत. नृसिंहाचे काष्ठस्तंभातून अवतरण घडले, ही त्या अवतारकथेतील महत्त्वाची घटना मात्र त्याच्या मूलरूपाशी संबंध दाखवणारी आहे, असे दाखवता येणे शक्य आहे.

प्राचीन काळी यक्षमूर्ती काष्ठाच्या असत ( अनेकदा वृक्षही यक्षरूप मानले जात ). जैनांच्या आगमसाहित्यात अशा अनेक काष्ठमय यक्षमूर्तींचे उल्लेख येतात. ' अन्तगडदसाओ ' नामक जैनागम ग्रंथात मोग्गरपाणी ( मुद्गरपाणि ) नावाच्या यक्षाच्या उपासकाची एक कथा आहे.[३४] राजगृह नगरीतील यक्षायतनात मुद्गर-

---

३०. नृसिंहपूर्वोत्तरतापनीयोपनिषत् : आनन्दाश्रमसंस्कृतग्रन्थावलिः, ग्रंथांक : ३०. पुणे, १९२९. पृ. २७-२९.

३१. तत्रैव, पृ. १११.

३२. ' पृथ्वीपुत्र ', पृ. ३१९-३३४, ३५२-३६३ आणि ' प्राचीन भारतीय लोकधर्म ', पृ. ११८-१४३.

३३. ' प्राचीन भारतीय लोकधर्म ', पृ. १४५-१४७ ( परिशिष्ट ).

३४. ' अन्तगडदसाओ ' : संपा. डॉ. प. ल. वैद्य, पुणे, १९३२, पृ. ३१-३४.

पाणीची काष्ठप्रतिमा होती. मुद्गरपाणीचा उपासक नित्य निष्ठेने त्याची पूजा-अर्चा करीत असे. असे असतानाही एकदा यक्षायतनातच त्या उपासकावर घोर संकट ओढवले. अशा संकटग्रस्त मनःस्थितीत तो निराशेने उद्गारतो की, "जर या काष्ठप्रतिमेत मुद्गरपाणीचे अस्तित्व असते, तर त्याने मला या घोर संकटात टाकले नसते!"

—यक्ष नरसिंहाच्या काष्ठप्रतिमेचाच नरसिंहावताराच्या कथेत काष्ठस्तंभ झालेला असला पाहिजे, असे अनुमान या पार्श्वभूमीवर सुसंगत वाटते.

## 'यक्षिणीचा नारसिंह'

मूलतः नरसिंह हा 'बावन वीरां' च्या जातीतला एक 'वीर' आहे. आहे आणि 'बावन वीर' हे यक्ष आहेत—म्हणजेच नरसिंह हा मूलतः यक्ष आहे, हे सत्य अनेक पुराव्यांनी आपल्या हाती येते. शहामुनी नामक मुसलमान मराठी संतकवीने नरसिंहाच्या यक्षत्वाची कल्पना आपल्या 'सिद्धान्तबोध' नामक ग्रंथात स्पष्ट शब्दांत मांडली आहे. शहामुनी हा महानुभावीय आणि भागवतसंप्रदायी अशा उभयविध संस्कारांत वाढलेला साधुकवी आहे. त्याने चक्रधर-महिंभट्ट-संवाद-रूपाने काही विषय मांडले आहेत, त्यांतच नरसिंह-अवताराचाही एक विषय आहे.

शहामुनींच्या मते, यक्षिणी नामक एक माया-सदृश प्रभावी देवता आहे —

जग हे देवाचे अधीन। त्या देवास यक्षिणी स्वामिण।
तिची आज्ञा वंदून। सकळ देव वर्तती॥
(सि. बो. १७·११६)

कर्मभूमीतील तेरा कोटी देवांचे स्वामित्व तिच्याकडे असूनही तिला 'मोक्ष द्यावयाचे सामर्थ्य' नाही. नरसिंह हा या यक्षिणीचाच अवतार आहे —

*नारसिंह अवतार घेऊनि यक्षिणी।*
*प्रगटली विशाळ स्तंभ चिरोनी।*
*हिरण्यकशिपु असुर विदारूनि।*
*प्रल्हादा साह्य ती जाहली॥*
(सि. बो. २६·१०४)

चक्रधरांनी पुरविलेल्या या माहितीविषयी महिंभट्ट अशी शंका घेतो की, 'विष्णु प्रगटला स्तंभांत' हे जगप्रसिद्ध असताना तुम्ही हा 'भिन्नार्थ' कसा सांगता? यावर चक्रधरस्वामी असे स्पष्टीकरण करतात की—

*महाविष्णूचे आज्ञाधर। ब्रह्मादिक हरि हर।*
*इंद्र चंद्र भास्कर। गंधर्व सांब यक्षिणी॥*
*ज्यासी महाविष्णु आज्ञा करी। तोचि देव अवतार धरी।*
*म्हणोनि पुराण उच्चारी। विष्णुचि घेतो अवतार॥*
(सि. बो. २६·८३–८४)

नरसिंहाच्या मूलरूपाविषयीची ही कल्पना महानुभावीय वातावरणातली असली, तर अन्य साधनांच्या प्रकाशात तिचे महत्त्व जाणवल्यामुळे येथे मुद्दाम नोंदवली आहे.

## 'उग्रवीर' आणि 'सामराज'

नरसिंह हा मूलतः 'उग्रवीर' म्हणजे उग्र प्रकृतीचा यक्ष आहे, हे निश्चित झाल्यावर नरसिंहमंदिराला 'राजमठ' का म्हणतात, याचे उत्तर देणे अगदी सहज शक्य बनते. 'वीर' या संज्ञेप्रमाणेच 'राजा' हीही यक्षवाचक संज्ञा आहे. राजा ही यक्षवाचक संज्ञा असल्यामुळेच यक्षांचा प्रमुख असलेला कुबेर हा 'राजराज' या नावाने ओळखला जातो. कालिदासाने कुबेराला मेघदूतात 'राजराज' म्हटले आहे.[३५] मंत्रपुष्पांजलीत कुबेराला 'महाराज' हे विशेषण लावलेले आहे. महाभारत, हरिवंश, वायुपुराण, पद्मपुराण व भागवतपुराण इत्यादी अनेक प्राचीन ग्रंथांत 'राजा' या संज्ञने यक्षांचा आणि 'राजराज' या नावाने कुबेराचा उल्लेख अनेक वेळा येतो.[३६]

—आता या सर्व विवेचनाच्या पार्श्वभूमीवर आपल्या हे ध्यानी येईल की, भारतीय लोकमानसाने 'उग्रवीरा'ला 'सामराज' बनविले आहे. तो विष्णूचा अवतार बनल्यानंतरही 'भूतावळी' चा नियंत्रक राहिलाच आहे; यक्ष त्याचे 'अनुचरमुख्य'[३७] आहेतच आणि त्याचे मूळचे काष्ठमय रूपही काष्ठस्तंभाच्या रूपाने त्याच्या अवतारकथेत सुरक्षित आहे.

---

३५. मेघदूत, १.३.

३६. महाभारत, वन. २७६.३, २८२.२३, २९०. ९; शांति. १७७.५२, इत्यादी.

३७. भागवतपुराण, ७·८·५२–५३.

### नाग-नरसोबा

नरसिंह मूलतः यक्ष असल्याची खूण आपल्या एका लोकधार्मिक विधानात सुरक्षित आहे. श्रावण महिन्यात आपण नाग-नरसोबाची पूजा करतो. नागाबरोबर नरसोबाची पूजा करण्याचे कारण आज आपण विसरून गेलो आहोत परंतु यक्ष आणि नाग यांच्या उपासनांचे संप्रदाय एके काळी सारखे प्रभावी होते आणि त्यांच्यात फार मोठ्या प्रमाणात देवाण घेवाणही झालेली आहे. हे सत्य भारतीय विद्यांच्या सर्वच अभ्यासकांना मान्य झालेले आहे. नाग-नरसोबा या जोडीतील नरसोबा हा यक्षांचा प्रतिनिधी आहे. एरवी नागाबरोबर नरसोबाची पूजा श्रावणात करण्याचे प्रयोजन स्पष्ट होऊच शकत नाही.

नरसिंह हे अनेक घराण्यांचे कुलदैवत आहे. नरसिंह हा विष्णूचा अवतार म्हणून इष्टदैवत बनणे स्वाभाविक आहे; पण कुलदैवत बनणे मात्र चमत्कारिक वाटते. कुलदैवते असणारे बहुतेक सर्व देव हे 'मूलदेव' आहेत, याची जाणीव अभ्यासकांना आहेच. नरसिंह विष्णूचा अवतार बनल्यानंतरही कुलदेव म्हणून त्याची प्रतिष्ठा टिकून आहे. विष्णूचा अवतार म्हणून गाजणाऱ्या नरसिंहाच्या जशा सांग-सायुध मूर्ती आढळतात, त्याचप्रमाणे त्याचे अवघड शेंदरी तांदळे ही पूजिले जातात, हे याच संदर्भात ध्यानी घ्यावे.

राजमठाचे रहस्य हे असे आहे. त्या संज्ञेत समन्वयशील भारतीय संस्कृतीच्या समावेशक, उदार आणि उदात्त प्रकृतीची एक विलक्षण कहाणी घनीभूत झालेली आहे.

### राजमठातच निवास का ?

आता एक आनुषंगिक प्रश्न उपस्थित होतो, तो असा की, गुंडम राऊळ आणि चक्रधरस्वामी यांचा निवास अधिकतर राजमठांतच का? राजमठांविषयी त्यांना इतकी ओढ का? कृष्णमुनी डिंभाने या प्रश्नाचे श्रद्धेच्या पातळीवरून दिलेले उत्तर आपण मागे पाहिलेच आहे.[३८] परंतु त्या उत्तराने चिकित्सक मनाचे समाधान होत नाही.

चक्रधरस्वामींची विहरणपद्धती आणि प्रबोधनसरणी बुद्ध-महावीरांच्यासारखी आहे. त्यांच्या विचारविश्वावरही बुद्ध-महावीरांचा, विशेषतः महावीरांचा प्रभाव आहे. बुद्ध आणि महावीर हे दोघेही धर्मचक्रप्रवर्तक प्रायः यक्षायतनांत उतरत आणि यक्षोपासनेवर प्रभाव गाजवून यक्षानुयायांना आपल्याकडे आकर्षून घेत. बौद्ध जातककथांत आणि जैनागमांत या घटनांचे प्रत्यंतर पानोपानी येते. चक्रधरस्वामींनी बुद्ध-महावीरांची ही सरणी उचलली आणि यक्षायतनांत म्हणजेच राजमठांत निवास करणे अधिक इष्ट मानले. बौद्ध जातककथा, जैनागमसाहित्य आणि लीळाचरित्रादी महानुभावीय चरित्रग्रंथ यांची तौलनिक पाहणी करणाऱ्या कोणाही अभ्यासकाला बुद्ध, महावीर आणि चक्रधरस्वामी यांच्या प्रकृतीतील आणि प्रबोधनपद्धतींतील हे अद्भुत साम्य जाणवल्यावाचून राहणार नाही.

---

३८. विख्यात वाङ्मयसंशोधक श्री. वि. अं. कानोले यांनी नरसिंह आणि महानुभावीय महात्मे यांच्या अनुबंधाविषयीचा प्रश्न उपस्थित केला होता; परंतु त्यांनी त्या प्रश्नाचे समाधान सांप्रदायिक माहितीने करून घेतले. [पहा : 'मराठवाडा विद्यापीठ पत्रिका', १.१, १९६१, पृ. २०.]

• • •

## साभार – स्वीकार

**अक्षरमाधव** ( कै. अणे यांचे निवडक लेख ) : संपादक–राम शेवाळकर, विदर्भ साहित्य संघ, शाखा वणी; १० रु.

**मी हे सांगितलं पाहिजे** ( ज्ञानकोशकारांच्या आठवणी ) : शीलवती केतकर, ह. वि. मोटे प्रकाशन, मुंबई १४; १५ रु.

**गायनी कळा** ( सांघिक गायन-वादनविषयक प्रबंध ) : ह. वि. दात्ये, ३०९ शनिवार, पुणे २; १२ रु.

**क्रांतिकारक टिळक नि त्यांचा काळ** : अ. ज. करंदीकर, काळ प्रकाशन, पुणे ३०; १५ रु.

**प्राचीन भारतीय राजनीति** : र. पं. कंगले, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ७–५० रु.



अनुक्रमणिका

# तांब्यांच्या गीतिकाव्याचे बाह्यान्तर स्वरूप

● भ. श्री. पंडित ●

शब्दांमुळे मानवी मनोभाव प्रकाशात आला. भाषा शब्दांची असते. तिच्यात सदैव नवतेचा प्रादुर्भाव होत असतो. प्रत्येक युगाचे अनुभव नवेनवे शब्द घेऊन व्यक्त होतात. या शब्दांना अर्थ चिकटला म्हणजे 'काव्य' आकारास येते. काव्यनिपुणाची भाषा स्वभावतःच छंदोबद्ध असते. छंदात स्वभावतःच लय असते. लयबद्ध शब्दांच्या श्रवणाने रसिकाचे कर्ण तृप्त होतात आणि अंतःकरण उचंबळून येते. म्हणूनच उच्च प्रतीचे भावकाव्य छंदात व लयबद्ध शब्दांत अवतीर्ण होत असते. अशा काव्याला सामान्यतः गीतिकाव्य (a lyrical poem) हे नाव देण्याची परिपाटी आहे आणि त्याच्या शैलीला संगीतात्मक शैली या नावाने ओळखण्याची रीती आहे. आधुनिक मराठी कवींत तांब्यांनी संगीतात्मक शैलीचा अवलंब करून नवविध रसांची नानाविध गीतिकाव्ये गायिली आहेत.

काव्याचे माध्यम शब्द आहे. शब्द म्हणजे ध्वनी. त्याचा परिणाम प्रथम कानांवर आणि मग मनावर होतो. अर्थात् ज्या शब्दांत ध्वनी आणि अर्थ यांचा एकजीव असेल त्यास महत्त्व असते हे उघड आहे. काव्यात जर शब्द ध्वन्यनुकारी आणि अर्थ ध्वन्यात्मक असेल, तर ते गीतिकाव्य दुधात साखर पडावी तसे मधुर व रुचिकर वाटते. तांब्यांच्या कवितासंग्रहांत अशी विविध मधुर व रुचिर गीतिकाव्ये आहेत. मनुष्याला जीवनात जे बरेवाईट अनुभव येतात, त्यांच्या आधाराने हृदयाच्या अंतर्भागांतून जे काव्य उत्स्फूर्त होते, ते खरे गीतिकाव्य होय. या बाबतीत स्वतः तांबे आपला अनुभव सांगतात; "एखाद्या गोष्टीने मनाला चटका बसला की, तिला कवितेचे रूप यावयाचे. संसारातील अनेक लहानमोठी, घरांतील, घराबाहेरील, जड सृष्टीतील, चैतन्य सृष्टीतील दृश्ये मनाला झोंबली म्हणजे ती काव्यरूपाने परिणत व्हावयाची; मग ती कसल्याही स्वरूपाची असोत, सामाजिक असोत, धार्मिक असोत, राष्ट्रीय असोत, असा क्रम आज तागाईत चालू आहे".†

मनुष्याला जात्याच गीताची आवड आहे. तो गातो, त्या गीतांतील मात्रा त्याच्या मनगटातील ठोक्यांवर आणि उरामधील फुप्फुसांच्या वरखाली होणाऱ्या भात्यावर अवलंबून असतात. त्यांच्यातून उद्भूत झालेल्या गीताचा विस्तार आणि संकोच हृदयाच्या स्पंदनाशी निगडीत आहे. गीताच्या रचनेचा संबंध मनुष्याच्या शरीराशी आहे आणि त्या गीतांतील काव्याचा संबंध त्याच्या मनाशी आहे. मनुष्य सर्वत्र सारखाच असल्यामुळे त्याच्या गीतरचनेत आणि तदंतर्गत काव्यात अभेद दृष्टीस पडतो.

गीताच्या बाह्य रचनेला अलीकडे 'आकृतिबंध' असे नवीन नाव आहे. पूर्वी त्या रचनेला 'पद्य' म्हणत. कालांतराने त्या पद्यरचनेचे शास्त्र बनले. त्या शास्त्रांत लक्षणे व नियम यांचा अंतर्भाव झाला. पद्यरचनेचे शास्त्र निर्माण झाले, ते वस्तुतः प्रत्यक्ष अनुभवाने आणि प्रयोगाने जन्माला आले. त्याचा एखाद्या साच्यासारखा उपयोग होऊ लागला हे त्याचे दुर्दैव होय. वस्तुतः त्याची उत्पत्ती अगदी स्वाभाविक आहे. गीताला आणि पद्याला खरोखर निरनिराळी नावे नकोत. परंतु रचनेचे शास्त्र बनल्यामुळे सहजोत्स्फूर्त ते 'काव्य' आणि हेतुपुरःसर रचलेले ते 'पद्य' असा भेद निर्माण करण्यात आला आणि इंग्रजी वाङ्मयात ज्याप्रमाणे 'कवि' (a poet) हे विशेषण सन्मानाचे आणि 'पद्यलेखक' किंवा 'पद्यकार' (versifier or versibrist) हे विशेषण हेटाळणीचे द्योतक ठरले, त्याचप्रमाणे मराठी वाङ्मयांत या दोन विशेषणांची योजना होऊ लागली.

मनुष्याच्या आत्म्याला जसे शरीर तसेच गीताला बाहेरील आकृतीचे बंधन स्वाभाविक आहे. मनुष्याला यमक आणि पालुपद जात्याच प्रिय आहेत. ठराविक अवधीनंतर जुळलेले यमक कानांवर पडले आणि आवडलेल्या पालुपदाच्या मुखड्याची पुन्हा पुन्हा उजळणी झाली म्हणजे त्यात त्याला संगीताचा आभास होतो. मुलाबाळांना अंगाई गीते, मोलमजुरी करणाऱ्या बाया-

† तांबे समग्रकविता. चार शब्द. १६–११–३५.

बापड्यांना ओव्या आणि कवाईत करणाऱ्या शिपायांना त्यांच्या गतींतील ताल प्रिय असतो. गीताचा मुखडा सुंदर असल्यास तो रसिकाच्या अंतःकरणाचा ताबा घेतो आणि आपोआप साधलेली यमके कानी पडताच तो नागाप्रमाणे डुलू लागतो.

तांब्यांची प्रतिभा वैणिक ( musical ) आहे. तिच्यात हृद्गतभाव संगीतात्मक शैलीने प्रकट करण्याची क्षमता आहे. तिच्या ठिकाणी परिमित समर्पक शब्दयोजनेने हृदयाची तार छेडण्याची प्रवीणता आहे. त्यांची अभिव्यक्ती जशी गीतात्मक तशीच नाट्यात्मक आहे. त्यामुळे त्यांची काही गीतिकाव्ये आत्मपर आहेत आणि काही गीतिकाव्ये नाट्यपर आहेत. नाट्यपर गीतिकाव्ये अभिनेय आहेत. ती गीते कानांना जशी तृप्त करू शकतात तशीच डोळ्यांना रिझवू शकतात. मनाला भुरळ पाडण्याचे सामर्थ्य दोन्ही प्रकारांत आहे. त्यांच्यात उत्कट भाव आहे आणि रचनेत अंतर्गत संगीत आहे. साभिप्राय उच्चार आणि भावनानुकूल राग यांच्याशिवाय त्यांचा प्रत्यय येणार नाही. तांब्यांची कविता कानांनी ऐकली पाहिजे. ती डोळ्यांनी वाचल्यास तिचे भावमाधुर्य, अर्थसौंदर्य आणि शब्दचातुर्य यांचा अनुभव येणार नाही. तिचे संगीत स्वाभाविक आहे. ते बाहेरून लादलेले नाही. ठराविक शब्दांनी संगीत निर्माण करणाऱ्या कवींच्या जातीचे तांबे नाहीत. त्यांची रसना आणि रचना दोन्ही रसाळ आहेत. तांब्यांपूर्वी इतक्या यथानुरूप स्वरांशी इतक्या हृदयंगम कवितेचे संमीलन क्वचित् झाले असेल! 'Poetry is music in words' अर्थात 'काव्य म्हणजे शब्दांतले संगीत' आणि 'Music is poetry in sound' अर्थात 'संगीत म्हणजे स्वरांतले काव्य' या इंग्रजी उक्तींची यथार्थता तांब्यांची कविता ऐकली म्हणजे जाणवते.

गीतरचनेच्या बाबतीत तांब्यांची प्रतिभा इतकी चपल व तल्लख आहे की ती गीताचा अंतरात्मा चटकन् खुडून घेते. केवळ पदे जुळवल्याने किंवा यमके साधल्याने कुणी कवी होत नाही. कवी होण्यास नैसर्गिक प्रतिभाच हवी. तांब्यांची गीते प्रतिभापूरित आहेत, स्वयंस्फूर्त आहेत, मुक्तकंठ आहेत आणि सुरेल आहेत. त्या गीतांत सतारीच्या तरल आणि सूक्ष्म स्वरच्छटांची संगत आहे आणि काव्यमय कल्पनांची रंगत आहे. त्यात निव्वळ शब्दसंगीत नाही. त्यांच्यात तंतुवाद्याचा अस्फुट मूक झंकार आहे. तो फक्त रसिकाच्या कानांपर्यंत पोचतो असे नाही. तेथून तो त्याच्या अंतःकरणात प्रवेश करतो आणि त्यांमधले गूढगहन भाव चाळवतो. संगीत हे त्यांच्या विचारविवेचनाचे, भावनिदर्शनाचे आणि कल्पनाप्रदर्शनाचे माध्यम आहे. काही कवी तर्कसंगत युक्तिवादाने, काही शब्दचित्रणाने आणि काही कल्पनेच्या भरारीने जे कार्य करतात, तेच कार्य तांबे संगीताने साधतात. परंतु त्यात त्यांचा संयम कायम असतो. भाषा कितीही संगीतमय बनवली, तरी भाषा ती भाषा आणि संगीत ते संगीत, या वस्तुस्थितीकडे त्यांचे दुर्लक्ष होत नाही. काव्यावर संगीताचे अतिक्रमण झाले तर दोष उद्भवेल याची त्यांना जाणीव होती. काव्याला संगीताची जोड देण्याच्या बाबतीत प्रख्यात आंग्ल कवी टेनिसन् याच्याशी त्यांचे साम्य दिसते. 'Perfect music set unto noble words' हे टेनिसन्च्या काव्यासंबंधीचे टीकाकारांचे उद्गार तांब्यांच्या कवितेला देखील तंतोतंत लागू पडतात.

आधुनिक मराठी कवितेत वैणिकतेचा प्रादुर्भाव इंग्रजी वाङ्मयाच्या संपर्काने झाला. रेव्हरंड टिळक आणि केशवसुत यांच्या आधी महाजनी आणि कानिटकर यांनी वैणिकतेच्या प्रवर्तनाचा प्रयत्न केला. परंतु त्यांचा प्रयत्न तोकडा होता. केशवसुतांना वैणिकतेच्या सुरेलपणाने वेध लावला. "याचे तोंड कुरूप हे पिकविवशात गाईल काव्यें नवीं" असे त्यांच्या वाणीने आत्मविश्वासाचे उद्गार काढले. परंतु त्यांना संगीतांतील जादूचा शोध लागला नाही. तांब्यांना ती जादू गवसली. त्यांच्या प्रतिभेचे बुलबुल अगदी आरंभापासून आपल्या कवितेत आपले अंतःकरण ओतीत होते. तीत अंतःकरण आहे म्हणूनच तिची भुरळ अनावर आहे. ती भुरळ मनाला झपाटते.

तांब्यांना गीतिकाव्य रचण्याची स्फूर्ती होण्यास त्यांच्या भोवतालचे वातावरण कारण आहे. अगदी पोरवयात ते झाशीला राणीच्या राजवाड्यांत पुसाळकरांच्या शेजारी राहात. पुसाळकर यांना गायनशास्त्राची चांगली माहिती असून गायनाची निरतिशय आवड होती. त्यांचा अधिकार मोठा असल्यामुळे त्यांच्याकडे नामांकित गवई भेटीस येत व मैफिली होत. त्या ऐकून तांब्यांच्या ठिकाणी गायनाची अभिरुची निर्माण झाली. त्यामुळे तांब्यांच्या कृतीत काव्य आणि संगीत यांचे अद्वैत प्रत्ययास येते. पुढे प्रतापगडास न्यायाधिशाच्या

अनुक्रमणिका

पदावर असताना त्यांनी तेथील दरबारी गवयांकडून संगीताचे सशास्त्र शिक्षण घेतले. एकोणीसशे वीस नंतर स्फुरलेल्या त्यांच्या बहुतेक कविता रागदारीत आहेत. याचे कारण त्यांनी त्या सुमारास केलेला संगीताचा सशास्त्र अभ्यास होय. संगीतकलेवरील या नितांत प्रेमामुळेच त्यांनी संगीतदेवतेला उद्देशून 'तूं कवण जगांतिल ललना ?', 'छेड सखी ! दुर्गा मधु रागिणि' आणि 'संगीत कलेप्रत' या गीतिका आळविल्या आहेत.

तांब्यांना गीतिकाव्याची ओढ असण्याचे दुसरे कारण म्हणजे त्यांच्या अंतःकरणावरील वैष्णव साहित्याचा विलक्षण प्रभाव होय. तर्क, नास्तिकता, बुद्धी किंवा वितंडवाद यांपेक्षा भक्तिप्रवण अंतःकरणाने जीवात्म्याचे परमात्म्याशी मीलन करण्याचा प्रेममार्ग त्यांना विशेष पटतो. मानवी वासनांकडे पूज्य दृष्टीने पाहणे त्यांना प्रिय आहे. विरहात प्रेमभावना अधिक उत्कट व प्रबळ असते. तिला कामुकतेचा विटाळ नसतो ही संतांची भावना त्यांना मान्य होती. त्यामुळे त्यांनी कबीर, सूर, तुलसी आणि मीरा यांच्या हिंदी गीतांप्रमाणे काही विराण्या आळवल्या आहेत आणि नामदेव व तुकाराम यांच्या मराठी अभंगांप्रमाणे कांही भक्तिगीते गाइली आहेत.

तांब्यांच्या लहानपणी आयाबायांची आणि कथेकरी हरिदासाची लोकगीते प्रचारांत होती. मुलीबाळींच्या खेळांत गाण्यांची कमतरता नव्हती. त्यामुळे त्यांनी 'चिमणी'ला भुलाबाईच्या गाण्याची, 'वाऱ्या'ला 'नदीच्या पैलारू' या गाण्याची, 'आतां गडी फू'ला 'कंकण न सुटे रामाला' या हरिदासी चालीची आणि 'पन्नास वर्षांनंतर' या नाट्यगीताला 'मुद्रिके! टाकुनि राम कशी आलिस ?' या स्त्रीगीताची चाल योजिली आहे. ते तरुण असताना नाटक मंडळ्यांची चलती होती. नाटक मंडळ्या महाराष्ट्रात गावोगाव दौरे काढत होत्या. जनतेत त्यांची नव्या नव्या चालीवरली गाणी प्रसार पावत होती. किर्लोस्कर, देवल आणि कोल्हटकर याच्या चालींचा जिकडे तिकडे बोलबाला होता. त्यामुळे तांब्यांनी आपल्या काही गीतांना 'तस्करा हाती', 'नाहि सुभद्रा', 'ही कामाची तलवार', 'वधुनि त्या भयंकर भूता', 'चंद्रकांत राजाची कन्या', 'क्षण टाक गडे ! कर या कंठि' इत्यादि नाटकी गाण्यांच्या चाली लावल्या आहेत.

'ढोले हे जुलमी गडे !' आणि 'नादी लागुनि तुझ्या चेटक्या' या त्यांनी रचलेल्या लावण्या आहेत आणि 'बिजली जशि चमके स्वारी' व 'झाशीवाली' हे त्यांना स्फुरलेले पोवाडे आहेत.

'आले तुझ्या रे ! दारी नृपा' आणि 'पाहा हो कसा हा कारागीर' या दोन गीतिकाव्यात त्यांनी लगत्वातीत, मात्रातीत आणि अक्षर संख्यातीत रचना करण्याचा अत्यंत जबाबदारीचा व जोखमीचा प्रयत्न मोठ्या प्रशंसनीय रीतीने अगदी सहजगत्या यशस्वितेला नेला आहे. त्यांत अनियमित रचना गाता येईल अशा सहजतेने साधण्याचे त्यांचे खरे कौशल्य प्रकट झाले आहे. या दोन्ही गीतांच्या रचनेत आरंभापासून अंतापर्यंत कुठेही बनावटपणा अथवा ओढाताण नाही.

तांब्यांनी परंपरागत लोकगीतांच्या धाटणीवर, नाटकातील गाण्यांच्या चालीवर आणि निरनिराळ्या रागरागिणीत गेय रचना केली आहे.† गेयरचनेच्या मानाने त्यांची अगेय अशी श्लोकरचना कमी आहे.‡ लगत्वा-

---

† गेयरचनेबाबत अण्णासाहेब किर्लोस्कर, कविवर्य बी आणि स्वतः तांबे यांनी प्रसंगापात्त आपापली मते प्रकट केली आहेत,

(१) "गायनास योग्य अशा पद्यांचा यात समावेश केला असून......, ज्या ज्या पदांच्या चाली प्रसिद्ध आहेत, त्या त्या पदांवर त्यांच्या चाली लिहिल्या आहेत व ज्यांच्या प्रसिद्ध चाली मिळाल्या नाहीत त्यांच्या चाली कळण्याकरिता राग व ताल दिले आहेत....... आपल्या भाषेत अजून कोणतीही गायन-लिपि प्रचारात नसल्यामुळे अशा प्रकारच्या पुस्तकांपासून फारसा उपयोग होईल असे वाटले नव्हते. पुणे व मुंबई येथे ह्या नाटकांचे प्रयोग झाले आहेत तेव्हा बहुतेकांना यातील पदांच्या चाली सहज माहीत होतील."

— ब. पां. किर्लोस्कर. शाकुंतल प्रस्तावना. २८ सप्टेंबर १८८१.

(२) "दिंडी, साक्या, पदे, भूपाळ्या, लावण्या वगैरे मराठी कविता गाण्याकरितां रचल्या आहेत. ही लोकगीते होत. ती रागात्मक असल्यामुळे त्यांचा संबंध संगीत शास्त्राशी आहे. प्राचीन कालापासून तो आजपर्यंत जी लोकगीते आहेत, त्यांत ज्याला

[पुढील पानावर चालू]

श्लोक रचनेत आणि गेय गीत रचनेत अनेक बाबतीत फरक आहे. श्लोक गाण्यासाठी नाहीत. स्वरावृत्तीनें म्हणजे गण आणि मात्रा यांच्या आवृत्तीने आणि स्वरांदोलनाने त्यांना गायनाचा ओझरता सुगंध लागलेला असतो इतकेच काय ते! गीत गाण्यासाठी आहे. श्लोकाला ताल व लय यांचे बंधन नाही. गीताला लय असते आणि ताल असतो. श्लोकबद्ध काव्यात रस हा आत्मा असल्यामुळे त्याचे अनुसंधान रसिकाच्या मनात असते. गीतात स्वरानुसंधानास महत्त्व असते. श्लोक व गीत यांतील हा विरोधाभास लक्षात घेऊन तांब्यांनी आपल्या कवितेत त्या परस्परांत सामंजस्य स्थापन करण्यात यश संपादन केले आहे. काव्यात वाक्याच्या अर्थाला, अर्थानुसंधानाच्या प्रवाहाला, रसाला, ध्वन्याघाताला, यतीला आणि रीतीला प्राधान्य आहे यांकडे तांब्यानी दुर्लक्ष केलेले नाही. त्यांनी स्वरांदोलनाचे विविधत्त्व जेवढ्या प्रमाणात काव्याच्या अर्थाला आणि रसाला परिपोषक आणि उत्तेजक ठरेल, तेवढ्याच प्रमाणात त्याला आपल्या गीतरचनेत स्थान दिले आहे. आपण कवी आहोत गायक नाही या वस्तुस्थितीचा त्यांना विसर पडलेला नाही.

कार्लाइलनें रॉबर्ट बर्न्स् वरील आपल्या निबंधात काव्य आणि गीतिकाव्य यांच्यासंबंधी अत्यंत प्रत्ययोत्पादक विवेचन केले आहे."संगीतात्मक विचार म्हणजे काव्य" ही त्याची काव्याची व्याख्या सर्वश्रुत आहे. तो म्हणतो, "कवीच्या संवेदनेत हृदयाचे सुरेल संगीत आणि वास्तव गीत यांचा सहवास असतो गीत हा साहित्याचा अतिशय साधा असा आटोपसर प्रकार आहे. तो स्वयंपूर्ण असतो. ... आंतरिक भावना जिवंत असल्याशिवाय गीताच्या बाह्य गतीत ऐट व डौल येणे शक्य नाही. काळ्या खडकातून खळाळून येणारा रुपेरी झरा आणि नळ यांच्या पाण्यात फरक असतो... बर्न्सला मनुष्याचा प्रत्येक मनोभाव प्रकट करण्याकरिता अमोघ स्वर आणि अचूक शब्द सापडले आहेत. आपले गीतिकाव्य निर्माण करणारांत आपण जर त्याला अग्रमान दिला तर तोही अपुरा ठरेल. आपल्या अंतःकरणावर जर त्याच्या साहित्याचा फार मोठा असा ठसा उमटणार असेल, तर तो त्याच्या गीतिकाव्याचाच होय. "+ हेच उद्गार तांब्यांच्या बाबतीत चरितार्थ होतील.

---

[ मागील पानावरून चालू ]

साधारणतः मात्रा म्हणतात त्यांचा नियम नसतो. कारण ज्या चालीवर ती गीते म्हटली जातात, त्या चालीप्रमाणे ऱ्हस्व अक्षर दीर्घ होईल, किंवा दीर्घ अक्षर ऱ्हस्व होईल. [ संगीतशास्त्राच्या नियमाप्रमाणे चालीच्या ओघात काही अडथळा येत नाहीं. मात्रांची मर्यादा दोन ते चारपर्यंत कमीजास्त झाल्यास, ते अशुद्ध होणार नाही. चारपेक्षां जास्त मात्रा चालीच्या ओघांत मावत नाहीत. त्या बाहेर फेकल्या जाऊन ते गीत बेताल व बेसूर होते. संगीताप्रमाणें मराठी लोकगीतांत यति नसतात...लक्ष्यांत ठेविले पाहिजे की, गणना उच्चारकालाची होते अक्षरांच्या रूपांची नाही."

—बी. टिपण. वागीश्वरी. फेब्रुवारी १९४६ वर्ष १ अंक २.

( ३ ) "कित्येक ठिकाणी सोळा मात्रांच्या जागी मी चौदामात्राच ठेविल्या आहेत. त्या का? तेथे संगीत कलेचा संबंध येतो. तसेच दहा मात्रांच्या वृत्तांत माझी एखादी ओळ नऊ मात्रांचीच असते. तेथेही असेच संगीताचें धोरण मी पाहिले आहे. संगीताचा आणि काव्याचा किती निकट संबंध आहे आणि संगीतामुळे काव्यातील भावना किती उठावदार होतात आणि या दोन जुळ्या बहिणी कला एकमेकींस भेटल्या व खेळीमेळीने सहकार्य करू लागल्या, तर ह्या दुःखमय पृथ्वीवर स्वर्गलोक कसा भराभर उतरून येतो, हे मी तुम्हांला सप्रयोग सिद्ध करून दाखविले असतें."

— मा. त्र्यं. पटवर्धनांना तांब्यांचे पत्र दि. १३।४।३५ सह्याद्रि फेब्रु. १९४२.

---

+ But by far the most finished, complete and truly inspired pieces of Burns are, without dispute, to be found among his songs. It is here, that, although, through a small aperture, his light shines with least obstruction; in it highest beauty and pure sunny clearness. The reason may be, that song is a brief simple species of composition; and requires nothing so much for its perfection as genuine poetic feeling and genuine music of heart....Such grace and truth of external movement, too presupposes in general a corresponding force and truth of

[ पुढील पानावर चालू ]

गीतरचना तालाच्या तत्त्वावर वसवलेली असल्यामुळे गण किंवा मात्रावृत्तातील शब्द रचनेचा काटेकोर कोरीव नीटसपणा त्यात साधता येत नाही, गीतात ध्वनि-माधुर्याला महत्त्व असल्यामुळे काव्य कल्पनेला गौणत्त्व येते, मिश्रमाधुर्यामुळे वृत्ते तोंडपाठ होतात तशी चालीची माहिती नसल्यामुळे गीते होत नाहीत इत्यादी आक्षेप गीतरचनेवर घेण्यात येतात. गीत या नामानुसार त्यास वादनाची साथ हवी असेही सुचविण्यात येते. परंतु आतापर्यंतच्या विवेचनावरून त्याची अभिव्यक्ती आत्मिक किंवा नाट्यात्मक हवी, सहजोद्गारात्मक स्फुर्तीमुळे त्याच्या अंतर्गत रचनेत एकभावनात्मकता असते आणि त्या भावनेशी तद्रूप होऊन ते गीत म्हटल्यास अथवा वाचल्यास परिणामकारक होते हे लक्षात येईल. तांब्यांच्या गीतांच्या बाबतीत असंख्य रसिकांचा हा अनुभव आहे. आज लता मंगेशकर आणि आशा भोसले या भगिनींनी आणि माणिक वर्मा यांनी आपल्या किन्नर कंठातून ती गीते गाऊन रसिकांना झुलवत ठेविले आहे ही वस्तुस्थिती या विधानाची साक्ष देईल.

तांब्यांच्या गीतिकाव्याचा एक विशेष असा आहे की त्यात गायनापेक्षा काव्याला प्राधान्य असून त्याचा मोठ्या समंजसपणाने पाठपुरावा करण्यात आलेला आहे. काव्य गाऊन दाखविले तरी त्यात काव्यालाच अधिक महत्त्व असल्यामुळे, त्यात काव्याची गळचेपी होणार नाही, अशी दक्षता त्यांनी घेतली आहे. काव्य अधिक उठावदार करण्यासाठी आणि तदंतर्गत भावना अधिक उत्कटतेने व्यक्त करण्यासाठी त्याला विशिष्ट प्रमाणात सुस्वराची जोड द्यावयाची असते; काव्यावर गायनाचे आक्रमण नको इकडे त्यांनी सावधपणे लक्ष पुरविले आहे. काव्यगायनात काव्य आणि कवीचे व्यक्तित्त्व यांना आद्यस्थान आहे हे ते विसरलेले नाहीत. त्यांची गीति-काव्ये भावोत्कट असून आशय, कल्पना, नाद, माधुर्य इत्यादी गुणांनी ओतप्रोत आहेत हे 'मरणात खरोखर जग जगते', 'मग विसर हवा तर हा क्षण गे', 'याचेळी माझ्या ये रमणा!' 'तव नयनि उजळले बालरवि' इत्यादि त्यांच्या गीतांच्या मुखड्यांकडे पाहिले तरी सहज लक्षात येईल. एखाद्या फळाच्या आसवाची पारख त्याची लज्जत पाहून होत असते. त्यात टाकलेल्या साखरेच्या प्रमाणावरून ती अजमावता येत नाही. तांब्यांची गीतिकाव्ये स्वभावतःच मधुर आहेत. त्यांच्यात कोणताही बाहेरील 'अर्क' नाही.

हिंदी बांधलेल्या चिजा जशा लवचिक व नाजूक असतात, तशाच तांब्यांना स्फुरलेल्या काव्यगीतिका, त्यांना नकळत आपोआप साधल्या आहेत. 'जन म्हणति सावळी तुज सगळे' हे त्यांचे पत्नीविषयक गीतिकाव्य 'देवि भजो दुर्गा' या सुप्रसिद्ध चिजेच्या धर्तीवर असून ते दुर्गा रागांत आहे. त्यात मध्यम व षड्ज हे स्वर मुख्य आहेत. त्यास अनुसार तांब्यांनी मध्यम स्वरावर 'ळे' हे अक्षर आणले आहे. ते दीर्घ असल्याने आवश्यक तो विराम घेऊन दुर्गा रागाचे स्वरूप व भावना प्रकट करता देतात. सारांश, तांब्यांनी आपल्या गीति-काव्यांत ज्या रागांचे जसे उठाव आहेत, तसे ते ठेवले आहेत. त्या त्या रागानुसार रस व भावना कायम राहू दिल्या आहेत आणि अक्षररचना अशी साधली आहे की गातांना गीताची तोडमोड न होता ते लयतालात अल्प तानांनी गाता येते.

काव्याने संगीताचा आश्रय केला, तर भावना अधिक सूक्ष्म रीतीने जागृत करता येतील आणि विशिष्ट अशा रसाची त्यांना जोड दिल्यास भावकाव्ये अधिक परिणाम-कारक होतील या उदात्त हेतूने तांब्यांनी काव्य आणि संगीत यांचा समवाय साधण्याचा प्रयत्न केला. तांब्यांच्या या कार्याचे हार्दिक स्वागत करताना प्रा. रामचंद्र कृष्ण लागूंसारख्या काव्यमर्मज्ञाने लिहिले आहे;—"निरनिराळ्या प्रकारच्या वस्तूंनी गजबजलेले जे हे विश्व आपण पाहतो त्यातले भेद वरकरणी असतात. वरून भिन्न दिसणाऱ्या वस्तू अंतर्यामी परमात्मरूपच असतात. अशी ही विश्वाची एकात्मता ज्याच्या बुद्धीला पटली आहे त्याला हे सारे विश्व आपल्याला निर्माण करणाऱ्या परमेश्वराची स्तुती गात आहे असा अनुभव येतो. जड श्रवणेंद्रियांना ते गाणे ऐकू येणार नाही. कल्पनाशक्तीनेच त्याचा अनुभव घेता येतो. ईश्वराची

---

[ मागील पानावरून चालू ]

sentiment and inward meaning. ... He has found a tone and words for every mood of man's heart. ... It will seem a small praise if we rank him as the first of all our song witers, for we know not where to find one worthy of being second to him.

— Carlyle on Burns.

लाडकी मुले जे कवी, ते ईश्वरस्तुतिपर मधुर स्तोत्रे रचतात. तांब्यांच्या नैसर्गिक आस्तिक्यबुद्धीला त्यामुळेच **'समर्पण'** हे स्तोत्र रचता आले. तांब्यांची श्रद्धा जबर असल्यामुळे, स्तोत्रातील गंभीर, उदात्त विचार आपल्याला अनुरूप असा भाषेचा वेष घेऊनच त्यांच्या मनात आले असावेत. किंबहुना ही भाषा, हा अर्थ, असा भेदभाव ह्या स्तोत्रात आपल्यास करता येणार नाही, आणि शब्दार्थांच्या एकतानतेत रागदारीची भर पडली आहे. मालकंसात रचलेले हे स्तोत्र कोणीही आपल्याशीच गुणगुणले, तरी त्याच्या सौंदर्याची साक्ष त्याला पटेल."+ तांब्यांचे गीतिकाव्य कसे अंतःस्फूर्त व नैसर्गिक आहे त्याचा हा पुरावा आहे. प्रस्तुत स्तोत्र चार य गणांच्या आवृत्तीने सिद्ध होणाऱ्या भुजंगप्रयात वृत्तामध्ये, प्रत्येक चरणांतील शेवटचे एक गुरु अक्षर वगळून आहे. माधवराव पटवर्धनांना १३।४।३५ च्या पत्रात "तेथे संगीताचा संबंध आहे" असे जे उत्तर त्यांनी दिले आहे, ते येथे प्रत्ययंतराला येईल.

तांब्यांच्या गीतिकाव्याच्या बाह्यांतर रूपावर टीकाही झाली आहे. "तांब्यांनी आपली अशी एक रचनापद्धती निर्माण केली. मनातील मुख्य भाव ध्रुवपदामध्ये थोडक्यात पण चपखलपणे व्यक्त करावयाचा, व त्याची काहीच थोडी तपशीलवजा अंगे उपमा दृष्टांताच्या साहाय्याने पुढील तीनचार कडव्यांतून सजवावयाची आणि शेवटी समारोपात्मक, असे एक कडवे घालून कविता संपवावयाची"† तांब्यांना गीतिकाव्ये स्फुरली आहेत. त्यांनी ती निर्माण केलेली नाहीत. या गीतिकाव्यातील पुष्कळांची रचना अष्टमात्रिक आहे. यामुळे त्या गीतांची बाहेरील मांडणी एकसारखी दिसते. वस्तुतः त्या प्रत्येक गीताचा राग अगदी वेगळा आहे. त्या रागात ते गीत म्हटले म्हणजे परिणामकारक होते. गीतांची मांडणी बाहेरून जरी सारखी दिसली, तरी आतील मोडणी निराळी आहे. ती समजावी म्हणूनच तांब्यांनी कवितेवर रागाचे नाव घातले आहे. तांब्यांनी गीते सजवली आहेत हा आरोपदेखील गैरसमजातून उत्पन्न झाला आहे. कवितेची भाषाच कर्णाच्या सुवर्णमय कवच कुंडलाप्रमाणे उपजत असते. ती पोषाखाप्रमाणे मुद्दाम बाहेरून चढवलेली नसते. तांब्यांच्या काही गीतिका षण्मात्रिकही आहेत. गज्जलाचा गण पंचमात्रिक असतो. पण तांब्यांनी 'कळ ज्या लागल्या जीवा' हा आपला गज्जल मात्रिक जातीत रचला आहे. माधवराव पटवर्धनांनी त्याला नंतर अक्षर गणात परिवर्तित केले आहे. मात्रिक रचना लवचिक असल्यामुळे गाण्यास सोयीची असते. गीताच्या चालीला दोन ते चार मात्रांपर्यंतची मर्यादा असते. त्या मर्यादेनुसार 'या वेळी माझ्या ये रमणा' या गीताची मोडणी 'या वेळी माझ्या येरम णा' अशी होईल. गीताचे नैसर्गिक स्वरूप उद्गारात्मक असून ते मूळात स्वयंसिद्ध, स्वयंपूर्ण आणि संपूर्ण आहे, आणि ते मुख्यतः श्रवणांसाठी आहे हे सत्य लक्षात ठेवले म्हणजे त्याच्याविषयी अपसमज निर्माण होणार नाहीत. श्लोकबद्ध रचना घाटामधून वाहणाऱ्या नदीच्या प्रवाहाप्रमाणे शांत व संथ आहे. गीतरचना स्वच्छंद वाहणाऱ्या जलौघाप्रमाणे आहे. तिला स्वतःच्या 'छंदा' ने वाहण्याचा आनंद आहे.

तांब्यांना स्फुरलेल्या गीतिकाव्याच्या आशयावरही टीका झाली आहे. त्यावर 'त्याची काही थोडीच अंगे उपमा दृष्टांतांच्या साहाय्याने सजविलेली असतात' हा जसा आरोप आहे, तसाच "त्यांचे गूढ गुंजन खरोखर फारसे गूढ नसते. सरळ, प्रत्यक्ष निवेदनापेक्षा पर्यायाने, रूपकाने, म्हणजेच रूपकाने आधारलेल्या अतिशयोक्तीने निवेदन केल्यास काव्यदृष्ट्या अधिक वेधकता येते, या सर्वसामान्य तत्त्वावर अधिष्ठित असे त्यांचे गूढ गुंजन आहे... ते खोल तत्त्वज्ञान सांगण्याच्या भानगडीत पडत नाहीत. त्याचाच एक भाग म्हणजे त्यांनी कोणत्याही प्रकारचा संदेश सांगितलेला नाही."† हा आरोप काव्य आणि तत्त्वज्ञान यांच्यात अभेद आहे या गैरसमजुतीतून उत्पन्न झाला आहे; क्वचित त्याचा हेतू एक असला तरी आविष्काराचे मार्ग भिन्न आहेत. तांब्यांनी साहित्यशास्त्राचा मार्ग चोखाळला आहे. ज्यांनी तो मार्ग चोखाळला नाही, त्यांची काव्ये 'दुर्बोध' होऊन त्यावर कशी वादंगे माजली आहेत हे सांगण्याचे कारण नाही.

प्रा. जोग यांनी अर्वाचीन मराठी काव्यात तांब्यांच्या गीतिकाव्याचे जयदेवाच्या अष्टपद्यांशी साम्य आहे असे म्हटले आहे. तांब्यांनी 'गीतगोविंद' वाचले होते. परंतु त्यांना गीतिकाव्य जे स्फुरले, ते सूर, कबीर, मीरा व तुलसी यांच्या गीतिकाव्यांवरून स्फुरले. लहानपणापासून

---

+साहित्यसुवर्ण नवी आवृत्ती. २७।२।५१ पृ. ९८।९९.

†अर्वाचीन मराठी काव्य. आवृत्ती पहिली. पृ. १७०

† तांबे समग्र कविता. आवृत्ती चौथी. प्रस्तावना. प्रा. रा. श्री. जोग

त्यांच्या अंतःकरणावर त्या हिंदी संतांच्या वाणीचा संस्कार होता. जोगांनी आपल्या ग्रंथात पाचव्या प्रकरणाला चंद्रशेखर आणि तांबे असा मथळा दिला असून सुरुवातीला त्या दोघा परिणतप्रज्ञ राजकवींची वैषम्य-दर्शक तुलना केली असून प्रकरणाचा शेवट केशवसुत आणि तांबे यांच्या तुलनेने केला आहे. वस्तुतः या तिघाही कविश्रेष्ठांच्या भूमिका परस्परांपासून भिन्न होत्या. चंद्रशेखरांची रचनापद्धती सर्वत्र सारख्या सुंदर प्रतीची आहे आणि तिच्या गुणांची पातळी उच्च आहे. त्यांना कथनकला उत्तम साधली होती. त्यांच्या कथनांत मनाला गोव्यात गुंतविणारी अद्‌भुत जादू असून भाषेत अस्खलित ओघ आहे. त्यांची रचना प्रदीर्घ असली, तरी कुठेही कंटाळवाणी नाही. तिच्यात कल्पनेच्या गरुड भराऱ्या न होत की विचारांच्या खोल पाणबुड्या नाहीत. तिच्यात गुदगुल्या करणारा विनोदही फारसा नाही. त्यांच्या कवितेची प्रकृती चिंतनशील असली, तरी नाद-मुग्ध आणि स्वप्नाळू वातावरणात रमणारी आहे. तिच्यात विचारशक्तीला ताण नाही; पण मनोवेधकता भरपूर आहे. कवी या नात्याने चंद्रशेखरांच्या कलाकुसरीला स्वतंत्र स्थान आहे. विषयानुकूल वृत्तयोजना, सुंदर शब्दशिल्प आणि आकर्षक मांडणी या गोष्टीत त्यांचा हात धरणारा दुसरा कुणी नाही. तांब्यांची प्रकृती गीतिकार कवीची होती. माडखोलकर म्हणतात;– "तांबे यांच्या यशाची अनन्यता त्यांनी निर्मिलेल्या विविध गीत संभारात आहे. त्यांच्या गीतांतून काव्य, संगीत आणि चित्र या तिन्ही कालांतील लालित्याचा संगम झालेला आढळतो. शेले, टेनिसन् प्रभृतींपासून स्फूर्ती घेऊन केशवसुत टिळकांनी भावगीते आणि सुनीते लिहावयास सुरुवात केली. पण, त्यांच्या भावगीतांना वैणिके म्हणणे, म्हणजे वीणेच्या गुण रणनाचे विलोल माधुर्य आपण कधी अनुभवले नाही, असे सांगण्यासारखेच आहे. वीणेच्या तारांतून उठणाऱ्या निरनिराळ्या नादांच्या लकेरी आणि रसांच्या लहरी यांची मृदु सूक्ष्म आंदोलने जर कोणाच्या गीतात पाहावयाला मिळत असतील, तर ती तांबे यांच्या." † तांबे चटकन भावविवश होत नाहीत. त्यांची भावना हळूहळू विरघळत विरघळत खोल तळाशी जाते. त्यामुळे त्यांच्या गीतांत काव्याचा आनंददायक कंद अनुभवास येतो. केशवसुतांची भूमिका नव्या मनूतील नव्या दमाच्या 'प्रेषिता'ची होती. त्यांनी इष्ट असेल ती, आणि साध्य होईल ती, सुधारणा घडवून आणण्यासाठी 'तुतारी' फुकली होती.

कै. काकासाहेब गाडगीळ, नागपूर विद्यापीठाचे कुलगुरु कै. काकासाहेब पुराणिक आणि सुप्रसिद्ध साहित्यिक विठ्ठल-राव घाटे या तिघांनीही आपआपल्या चरित्रातून तांब्यांसंबंधीच्या आठवणी दिल्यावाचून राहवलेले नाही. प्रा० मायदेवांनी आपल्या 'वेचलेल्या क्षणा' त काही आठवणी दिल्या असल्यास नवल नाही. कारण ते तांब्यांचे शिष्य होते. पण इतर तिघांचा तांब्यांशी तशा प्रकारचा संबंध नव्हता. काकासाहेब गाडगीळ सांगतात; "१९११ त नीमचला तीनचार वर्षांनी जात होतो. तेथे सैलाणा व मागाहून सीतामहू दरबारचे वकील म्हणून प्रसिद्ध कवी भास्करराव तांबे होते. आम्ही त्यांचे साभिनय काव्यगायन अनेक वेळा ऐकले. त्यांनी आम्हाला टेनिसन्चे 'एनाक आर्डन्' इतक्या सुंदर रीतीने शिकविले की अजूनही त्याची आठवण झाली म्हणजे आनंद होतो... आता त्यांच्याशी सम स्तरावर गप्पा होऊ लागल्या. त्यांनी माझ्या मनावर एकप्रकारे मोहिनी टाकली. त्यांच्या गप्पात राजकारण नव्हते; निर्मत्सर साहित्य होते. ते रसिक होते, गायक होते. 'प्रीतिन वसे कधीही उंच त्या गडावरी' आणि 'तू हुबेहूब साउली' या कवितांच्या पार्श्वभूमी सांगून त्या त्यांनी आम्हाला गाऊन दाखविल्या. त्यामुळे गवयाचे गायनही आवडावे आणि गीतातला रसमय अर्थही समजावा तसे होऊन एक प्रकारचा श्रेष्ठ आनंद वाटला आणि मधाला सुवास यावा तसे वाटले "† काकासाहेब पुराणिक सागतात, "इंदोरला भास्करराव तांबे आपले कविमित्र रहाळकर यांच्याकडे यावयाचे. त्यांनी नवीन कवितेला जन्म दिली की आमच्या फॅन्सी क्लबात काव्यगायना जलसा व्हावयाचा. कित्येक प्रसंगी मी खोलीत एकटाच असायचा. तरीही तांब्यांनी मोठ्या तल्लीनतेने आपली नवरचित कविता गाऊन दाखवावी आणि इतरही कविता गाऊन दाखवाव्या. ते जी कविता गात, तिच्यातला आशय वा मर्म, ते आपल्या हावभावांनी आणि आवाजातील उंच, खोल किंवा कोमल उच्चारांनी श्रोत्यांच्या निदर्शनास आणून देत. त्यांचे काव्य-गायन म्हणजे ते गात असलेल्या कवितेतील वर्ण्य

† अर्वाचीन मराठी साहित्य. पृ० २१/२२.

†पथिक भाग पहिला. ६०, ५६, ६५ व ७२

विषयांचे श्रोत्यांपुढे उभे केलेले हुबेहूब चित्रच!"× घाटे लिहितात, "तांब्यांचा खाक्या निराळाच होता. ते आत्मकेंद्रित आणि आत्मतृप्त होते. ते आपल्याच काव्याच्या नशात धुंद असत. आपल्या कविता ते हात-वारे करून आवेशाने आणि आवेगाने म्हणून दाखवीत. ते आपली कविता म्हणत आणि पटकन तिचे इंग्रजी भाषांतर करीत. दाखल्यादाखल ते आपल्या आवडत्या इंग्रजी कवींच्या ओळींच्या ओळी साभिनय म्हणून दाखवीत. आणि शेवटी इंग्रजीत काव्यकलेवर प्रवचन करीत. कविता म्हणाव्या तांब्यांनीच. इतक्या वाईट आवाजाचा, कविता इतक्या चांगला म्हणणारा कवी मी अजून पाहिला नाही."‡

तांब्यांचे गीत, मग ते आत्मिक असो, नाट्यात्मक असो की तात्त्विक असो, त्यावर भाष्य लिहिता येईल, इतका त्यात भरपूर आशय असतो. 'मरणात खरोखर जग जगते' या तात्त्विक गीतात आत्मयज्ञाच्या महतीचे गौरव आहे. मुक्तता हवी असेल, तर सर्वस्वाच्या समर्पणाची सिद्धता हवी, बंधनांचा नसता बाऊ करण्यात अर्थ नाही. सूर्य तेज देऊनच तेजस्वी होतो. 'दे आणि घे' हा निसर्गाचा नियम आहे. कृपणता कायम ठेवून आणि नुसती प्रवचने झोडून काहीही प्राप्त होत नाही. 'कृपणता' म्हणजे देण्यासारखे जवळ असूनसुद्धा त्याचा मोह सुटत नाही अशी वृत्ती. स्वातंत्र्य हवे असेल, तर प्राणोत्सर्ग शिका असा या गीताचा थोडक्यात आशय आहे.

×न्यायमूर्ती पुराणिक यांचे चरित्र पृ. ३०
‡ दिवस असे होते. पृ० ८४/८५

तांब्यांनी मराठी कवितेकरिता काय केले असा एक प्रश्न उपस्थित करण्यात येत असतो. तांब्यांनी मराठी कवितेची ठराविकापासून सुटका केली. शब्दांना अर्थ असतो. पण सूर असतोच असे नाही. तांब्यांनी शब्दांना सूर दिला आणि कवितेचा आशय अधिक परिणामकारक व सूचक केला. हर्षाला व खेदाला वाट काढून देण्यासाठी गीतिकाव्यासारखे प्रभावी साधन नाही, ते मराठी कवितेला तांब्यांनी दिले. त्यांनी तिला काव्य, चित्र, संगीत आणि नाट्य या ललित कलांची जोड मिळवून दिली. एकेकाळी या कला देवळात होत्या, पुढे त्या राजदरबारात आल्या, तांब्यांनी त्यांना आधुनिक कवितेत मानाचे स्थान मिळवून दिले. त्यांनी तिला 'नाट्यगीत' हा एक नवीन काव्य प्रकार प्रदान केला. तांब्यांच्या कवितेत दोष नाहीत असे नाही. या जगात निर्दोष असे काय आहे? काव्यचर्चेत कवीच्या काव्यगुणांबरोबर त्याच्या काव्यदोषांची चर्चा अवश्य व्हावी परंतु त्याच्या काव्यगुणांकडे कळत न कळत, चुकून माकून डोळेझाक होऊ नये येवढेच!

• • •

## साभार - स्वीकार

**सोविएत रशियाची पन्नास वर्षे** (खंड पहिला): संपादक–वसंत पळशीकर, समाज प्रबोधन-मौज प्रकाशन, गृह, मुंबई ४; २२–५० रु.

**शिदोरी** (कादंबरी): व. ह. पिंटके, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ८–५० रु.

**रात्र कधी संपूच नये** (कादंबरी): प्रभाकर तामणे, ठोकळ प्रकाशन, पुणे ३०; ८ रु.

**रूपाळी** (कादंबरी): आनंदीबाई शिर्के, श्री लेखनवाचन भांडार, पुणे ३०; ८ रु.

**ताई व भाऊ** (कादंबरी ७ वी आवृत्ती): अमरेंद्र गाडगीळ, ठोकळ प्रकाशन, पुणे ३०; २–५० रु.

**निबंधलेणी** (कॉलेज विद्यार्थ्यांसाठी निबंध); वा. शि. आपटे, श्रीलेखनवाचन भांडार, पुणे ३०; ४ रु.

**कल्पनाविस्तार** (विद्यार्थ्यांसाठी निबंध): ह. मो. मराठे, श्रीलेखन वाचनभांडार, पुणे ३०; २ रु.

**यशवंतराव चव्हाण** (३ री आवृत्ती): कृ. भा. बाबर, ठोकळ प्रकाशन, पुणे ३०; २–५० रु.

**महर्षि शिंदे** (२ री आवृत्ती): हिराजी पाटील, श्रीलेखनवाचन भांडार, पुणे ३०; २–५० रु.

**भारतीय स्वातंत्र्यलढ्यांचा इतिहास**: त्र्यं. र. देवगिरीकर, भारत ग्रंथमाला, पुणे २; ८ रु.

श्री

# ज्ञानदेवी बारावा अध्याय
# पाठनिश्चितीची प्रक्रिया

• श्री. ना. वनहट्टी •

(मागील अंकावरून पुढे चालू)

(१)

मानवी मनाचे व्यापार अनंत नवलपरीच्या मार्गांनी चाललेले असतात. आमची ज्ञानदेवीच्या पाठसंशोधनाची प्रेरणा किती तरी वर्षांची! पाठसंशोधन आणि पाठनिश्चिती पूर्ण निरपेक्ष, वस्तुनिष्ठ वृत्तीने झाली पाहिजे, हा कटाक्ष अनेकवार व्यक्त केलेला; तथापि वेदान्ती मनाचे व्यापार नवलाईच्या मार्गाने चालले. प्रस्तुत पाठसंशोधनाचा प्रयत्न श्री. बाळाचार्य खुपेरकरांच्या प्रेरणेने, त्यांना पाहिजे तशा तत्त्वज्ञानाची नवी ज्ञानेश्वरी सिद्ध करण्यासाठी सुरू आहे, अशी अद्भुत कल्पना या मनातून आविर्भूत झाली.

कल्पना कितीही निराधार असली तरी सर्वसाधारण वाचकाचा तिजमुळे गैरसमज होऊ शकतो. म्हणूनच ही कल्पना सर्वथैव मिथ्या आहे, हे स्पष्ट सांगितले पाहिजे. हा अजातवादाने उभविलेला आभास आहे. प्रस्तुत पाठसंशोधन ज्या तत्त्वांनुसार चालले आहे असे निर्धास्तपणे म्हणता येईल त्यात निरपेक्षता हे एक प्रमुख तत्त्व होय. वस्तुनिष्ठता, निरपेक्षता, निर्लेपता हे तिन्ही शब्द मिळून तत्त्व एकच आहे. ते आम्ही प्रारंभापासून सहजप्रवृत्तीने आणि कटाक्षाने अवलंबिले आहे. या कार्याला प्रेरणा परमेश्वराची आणि ज्ञानदेवांची आहे. बाळाचार्यांची नाही. तिची जरुरी नव्हती. बाळाचार्य वयोज्येष्ठ, ज्ञानज्येष्ठ आहेत, ज्ञानदेवीचे गाढ व्यासंगी आहेत, आम्हाला आदरणीय आहेत. ज्ञानदेवीचे पाठसंशोधन व्हावे असे त्यांना फार वाटते. या कारणास्तव वै. मामासाहेब दांडेकरांप्रमाणे १२व्या अध्यायाच्या प्रायोगिक पाठसंशोधित आवृत्तीला आम्ही त्यांचा पुरस्कार मागितला आणि तो त्यांनी दिला. ज्ञानदेवांच्या तत्त्वज्ञानासंबंधाने त्यांची काही विशिष्ट मते आहेत; असतील! प्रस्तुत पाठसंशोधन कार्याला त्यांच्याशी काही कर्तव्य नाही. वस्तुनिष्ठता आणि शास्त्रीय दृष्टी यांच्यापासून हे पाठसंशोधन आणि पाठनिश्चितीचे कार्य प्रस्तुत लेखकाचा त्याच्याशी संबंध असेपर्यंत विचलित होणार नाही.

वर उल्लेखिलेला आरोप ज्यांनी केला ते आमचे मित्र आहेत. ज्ञानदेवी पाठसंशोधनासंबंधीचा आमचा लेख आणि १२ व्या अध्यायाची पाठसंशोधित आवृत्ती त्यांच्याकडे गेली आहे. त्यावरून या कार्यातील निरपेक्ष वस्तुनिष्ठतेची प्रचीती सहज येऊ शकली असती. आता तरी ती येईल अशी आम्ही आशा करतो.

वेदान्ताचार्यांना आपल्या वेदान्ताविषयी चिन्ता, तर भाषाशास्त्रज्ञांना भाषाशास्त्रासंबंधी आशंका. ज्ञानदेवीचे पाठसंशोधन म्हणजे भाषाशास्त्राच्या गहन विषयात पांडित्य मिरविणाऱ्याचेच काम. पश्चिमेकडून आणलेली भाषाशास्त्रज्ञानाची बिरुदे जो मिरवीत नाही, अशाने हे काम हाती घ्यावे हे केवढे औद्धत्य!

हे औद्धत्य एका गांवढ्या माणसाने केले आहे, हे खरे. आपल्याला ज्या विषयाचा व्यासंग करावयाचा आहे (भारतीय भाषांचे ऐतिहासिक भाषाविज्ञानही त्यात आले) त्यांच्या गाढ ज्ञानासाठी पाश्चात्त्य देशांत जावयाची जरुरी नाही ही खात्री पटल्यामुळे आणि व्यावहारिक उद्देशाचा संपर्क नसल्यामुळे, पूर्व वयात, सुलभ असूनही, पाश्चात्त्य देशांत जाऊन तिकडील बिरुदे हस्तगत करण्याचा उद्योग त्याने केला नाही. ऐतिहासिक भाषाविज्ञानात आणि पाठसंशोधनशास्त्रात त्याची गती कितपत आहे याची परीक्षा त्याच्या कार्यावरून होईल. भारतीय विद्या, वाङ्मय, संशोधन यांचे प्रेमी असे जे सारज्ञ असूयोज्झित विद्वान आहेत त्यांच्याकडून त्याचे

मूल्यमापन व्हावे आणि भक्तमंडळींनी, तसेच सामान्य वाचकांनी ज्ञानेश्वरीच्या शुद्धतर पाठाचा उपयोग करावा ही या प्रयत्नाची अपेक्षित फलश्रुति होय.

कार्य सुरू करण्याचे औद्धत्य प्रस्तुत संपादकाने केले असले तरी ते औद्धत्य तेवढ्यापुरतेच मर्यादित आहे. इतर बाबतींत तो विनम्र आहे; विशेषतः ज्ञानाच्या बाबतीत. प्रस्तुत पाठसंशोधनासाठी जे जे लागेल ते ते संपादन करण्याची ईर्ष्या त्याच्या ठायीं आहे. या कार्यात साह्य करण्याविषयी सर्वांना प्रेमाने तो पाचारण करू इच्छितो. खंडोबाच्या माळावर जे भाषाविज्ञानाचे आल्प्स पर्वत अवतरले आहेत त्यांतले ज्ञाननिर्झर इकडे वळल्यास त्यांचे केव्हाही स्वागतच होईल. प्रस्तुत कार्य आणि संपादकाचे मन पूर्ण मोकळे आणि सर्वांच्या प्रेमाचे भुकेले आहे.

योग्य वेळी या कार्यासाठी संपादक-मंडळाची योजना करण्याचा हेतू होताच. तदनुसार अधिकारी व व्यासंगी विद्वानांचे संपादक-मंडळ सिद्ध झाले असून त्यांच्या साहाय्याने प्रस्तुत पाठ संशोधित आवृत्तीचे कार्य सर्वमान्यतेच्या पदवीस पात्र होईल अशी आशा वाटते.

( २ )

असो. पाठभेदांची चर्चा मागील अंकावरून पुढे चालू करू.

*जिहिं सकळ भूतांचां अहितीं । निरालंबीं अव्यक्तीं ।*
*पसरलिया मति । भक्तिविण ॥ ६०*

( अ ) अहितीं – हितीं

( आ ) मति – आसक्ति, आशक्ति, अशक्ति

ही ओवी *गीता १२.५*च्या व्याख्यानात आरंभी आली आहे. सांप्रदायिक प्रतींमध्ये ती पहिली आहे. राजवाडे प्रतीमध्ये दुसरी आहे. प्रस्तुत पाठचर्चा सुलभ रीतीने मनात ठसावी या करिता *गीता १२.४,५* येथे अवतरणे इष्ट वाटते.

संनियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।
ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४
क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५

ओवी ५९ मधील 'आगळे । कष्टचि तेयां ॥' या उद्गारांत 'क्लेशोऽधिकतरस्तेषाम्' या पदांचा अर्थ उमटलेला दिसतो. म्हणून रा प्रतीत ही ओवी श्लोक ५ च्या व्याख्यानात आरंभास ठेवली गेली; पण योगमार्गाच्या आक्रमणाचे वर्णन जे मागील ११ ओव्यांमध्ये (४८-५८) आहे त्याचा समारोप या ओवीत असल्यामुळे सांप्रदायिक पाठामध्ये ही श्लोक ४ वरील व्याख्यानाच्या शेवटी घातली गेली; असा प्रकार दिसतो. ही सांध्यावरची ओवी असल्यामुळे दोन्ही श्लोकांच्या आशयाचा अंश हिच्यात उतरला आहे.

आपल्याला ओवी ६० मधील पाठभेदांचा विचार करावयाचा आहे. चरण १ मध्ये अहितीं–हितीं असा सर्वस्वी विरुद्ध अर्थाचा पाठभेद आहे. प्रचलित छापील आवृत्त्यांमध्ये सर्वत्र हितीं आहे. फक्त **मा** मध्ये **अहितीं** आहे. तीत टीपेत हितीं हा पाठ दिला आहे; तो ज्या चार पोथ्यांमध्ये आहे त्यांच्या प्रस्तावनेतील वर्णनावरून त्या पुष्कळ अलीकडच्या, शके १७३० नंतरच्या आहेत असे दिसते. अर्थात एकनाथांच्या मठातून आलेल्या शके १५५१ च्या पोथीत **अहितीं** आहे असे निष्पन्न होते. **स** प्रतीत अहितीं आहे. **मा स** या एकनाथी पाठ जास्तीत जास्त यथातथ्य देणाऱ्या प्रती. त्यांच्या पुराव्यावरून **अहितीं** हा पाठ एकनाथशुद्धीकृत ज्ञानेश्वरीचा होय असे ठरते. आजवर पाहण्यात आलेल्या इतर पोथ्यांवरून याला दुजोरा मिळतो. ज्ञानेश्वरीच्या ज्या पोथ्या आजवर पाहण्यात आल्या त्यांपैकी शेकडा ८५ पोथ्या एकनाथी परंपरेच्या असाव्या. त्यातल्या अगदी अलीकडच्या, म्ह० शके १७३० नंतरच्या सोडल्या, तर बाकीच्यांमध्ये **अहितीं** हा सररास आढळतो. एकनाथशुद्धीच्या ओव्या ज्यांच्या शेवटी नाहीत अशा ज्या पोथ्या पाहण्यात आल्या त्यांतही पुष्कळदा **अहितीं** हाच पाठ दिसला. मात्र यांपैकी काही पोथ्यांमध्ये **हितीं** असल्याचे आढळले. जुन्या, आस्थेने लिहिलेल्या पोथ्यांमध्ये **अहितीं हा** पाठ सार्वत्रिक, हितीं हा पाठ विरळा, दिसतो.

पाठसंशोधित आवृत्तीकरिता वापरलेल्या प्रतींचा पुरावा पाहू जाता **वि का** मध्ये हितीं; **शा व** मध्ये अहितीं; म्हणजे सिद्धनाथी परंपरेची साक्ष अर्धी अर्धी विभागिलेली आहे. **रा**–हितीं, **सा**–अहितीं, **न**–ओवीचा भाग फाटून नष्ट; अशी पाटांगण परंपरेची स्थिती आहे. अर्थात या परंपरेचा पुरावा अर्धा इकडे, अर्धा तिकडे असा आहे. **गो** मध्ये **अहितीं** आहे. वरवा परंपरा (**अ सि**) सर्वस्वी हितीं च्या बाजूने आहे. स्वतंत्र

पोथ्यांमध्ये भ हितीं, तर जा अहितीं अशी स्थिती आहे. सांप्रदायिक मुद्रित आवृत्त्यांमध्ये हितीं आहे. पण तो कोणत्या पोथ्यांवरून घेतला याचा उलगडा होत नसल्यामुळे पुरावा म्हणून त्याचा उपयोग नाही.

मूळ *गीतेचे* ४, ५ श्लोक पाहून ओ ६० कडे पाहिले म्हणजे '*जिहीं सर्व भूतांचां अहितीं (हितीं)*' हा 'सर्वभूतहिते (रताः)' याचा अनुवाद असावा, हे चटकन लक्षात येते. कोणाच्याही सहज लक्षात येण्याजोगी ही गोष्ट आहे. तर मग इथे हितीं हा पाठ युक्त, हे ओघाने येते. 'सर्व भूतांचे हित करणाऱ्या ज्यांनी (अव्यक्तोपासकांनी)' असा अर्थ हितीं पाठ घेतल्याने होतो व तो गीतेस अनुसरून आहे. ही गोष्ट जर इतकी उघड आहे, तर अहितीं हा पाठ आला कसा? एकनाथांनी आपल्या शुद्धीकरणात हाच कसा ग्राह्य मानला? एकनाथी परंपरेचा खरा पाठ हाच आहे हे आपण पाहिले आहे. मुळात हितीं असून एकनाथांनी अहितीं केले असेल हे शक्य नाही. तसे मानणे हा अतिधृष्टपणा होईल. एकनाथांपुढे असलेल्या प्राचीन पोथ्यांमध्ये अहितीं हाच एक पाठ असल्यामुळे आणि इथे कोणी काही 'अवद्य' केले आहे अशा शंका घेण्यास जागा नसल्यामुळे हाच त्यांनी कायम ठेवला असावा. किंवा त्यांच्यापुढे दोन्ही पाठ असून त्यांपैकी अहितीं हाच प्राचीन परंपरेने आलेला विशुद्ध पाठ असे त्यांना वाटल्यामुळे तो त्यांनी कायम केला असावा. त्यांच्या मागून येणारे 'पाठ घातला पूर्वीचा' अशी प्रतिज्ञा करणारे गोपाळाश्रम यांनी अहितीं हाच स्वीकारला आहे. त्यांच्यापुढे हितीं, अहितीं हे दोन्ही पाठ होते हे निश्चित आहे.

इथे पडताळ्याचा विचार असा की मूळ पाठ जर हितीं असता, तर मूळ गीतेतील शब्दांना अनुसरणारा हा पाठ भ्रष्टवून अहितीं करण्यास कोणी धजला असता काय? सकळ मंगळी वर्यत असणाऱ्या या ग्रंथात हिताचे 'अहित' करण्यास कोणाचा हात वाढील? हाच विचार पुढे वाढविला म्हणजे 'अहित' चे 'हित' होणे शक्य आहे हे लक्षात येते. अव्यक्तोपासक जरी झाले तरी ते सर्व भूतांच्या हितात मग्न असतात असे स्वतः गीता म्हणत असता ज्ञानदेव त्यांना 'अहित' कसे म्हणतील, असा विचार करून कुणी तरी फार पूर्वी हितीं हा पाठ सुरू केला असावा.

तेव्हा पोथ्यांचा पुरावा, एकनाथ आणि गोपाळाश्रम या दोन्ही मान्यवर पाठशोधकांचा निर्णय आणि अनुमानाचा पाठिंबा यांवरून अहितीं हा पाठ ग्राह्य ठरतो. त्याचा इथे अर्थ काय, हा पुढचा प्रश्न. त्याचा अन्वय कुणीकडे लावायचा हे ठरले म्हणजे अर्थाचा अंदाज करण्याची दिशा स्पष्ट होईल. अहितीं हे 'जिहीं' याचे विशेषण मानून अव्यक्तोपासकांकडे लावायचे की च. २ मधील 'अव्यक्तीं' याचे विशेषण मानायचे? व्याकरणाच्या दृष्टीने दोन्ही शक्य आहेत. अहितीं हे तृतीयेचे अनेकवचन होऊ शकते किंवा सप्तमीचे एकवचन होऊ शकते. पहिल्या पक्षी ते जिहीं या सर्वनामाचे आणि दुसऱ्या पक्षी अव्यक्तीं या सप्तम्यन्त नामाचे विशेषण होईल. आतापर्यंतच्या सर्व अर्थ करणाऱ्यांनी त्यांच्या मती असलेल्या 'हितीं' या पाठाचा अन्वय पुढच्या चरणातील *निराळंबीं अव्यक्तीं* याकडे लावला असून 'सर्व प्राण्यांचे मूर्तिमंत हितच (सर्व प्राण्यांना कल्याणकारक) अशा अव्यक्ताच्या (परब्रह्माच्या) ठायीं' असा अर्थ केला आहे. पण जे स्वतः 'जे होये ना नोहे। जें नाहिं ना आहे।' असे निर्गुण निरालंब, ते सर्व प्राण्यांचे हित करणारे कसे असू शकेल? हित करणे हे सगुणत्व होय, निर्गुण अव्यक्त परब्रह्मावर त्याचा आरोप होऊ शकत नाही.

ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान सांगणाऱ्या वेदान्ताचार्यांनी '*सकलभूतांचां हितीं*' हे तर अव्यक्ताचे विशेषण केले आहेच, पण गीतेतील 'सर्वभूतहिते' हे पद देखील अव्यक्ताचे—परमात्म्याचे—विशेषण मानणे योग्य होईल, आणि ज्ञानेश्वरांनी त्याचा तसा अर्थ केला तो मार्मिक व संदर्भाला जुळणारा आहे असे म्हटले आहे. पण गीतेतील १२·४ येथील 'सर्वभूतहिते' हे पद व्याकरणाच्या, मीमांसेच्या किंवा इतर कोणत्याच दृष्टीने अव्यक्त परब्रह्माचे विशेषण होऊ शकत नाही. ज्ञानेशांनी तसे केले असे म्हणणे हे नको असलेले श्रेय त्यांच्या पदरी बांधण्याप्रमाणे आहे. कोणाही भाष्यकाराने वा टीकाकाराने तसे केलेले नाही.

'हितीं' हा पाठ मानल्यास त्याचा अन्वय आणि अर्थ काय होईल—काय केला जातो—याचे विवरण एथवर केले. पुराव्याने ठरलेला पाठ 'अहितीं' याचा आता विचार करू. चमत्कार असा वाटतो की ज्ञानेशांना मुळाच्या अगदी उलट असा हा शब्द सुचला तरी कसा?

मुळात ' सर्वभूतहिते रताः ' – सर्व प्राण्यांचे कल्याण करण्यात रमलेले--असे स्वच्छ असता ' अहितीं ' हा त्यांच्या मनात आला कोठून ? ' सर्वभूताहिते ( भूत + अहित ) रताः ' किंवा ' सर्वभूतहितेऽरताः ' ( अरताः ) असा तर ज्ञानदेवांच्या पुढे असलेल्या गीतेच्या प्रतीचा पाठ नसेल ? सध्या उपलब्ध असलेल्या गीतेच्या कोणत्याही प्रतीत असा पाठ नाही. सर्व भाष्यकारांनी व टीकाकारांनी ' सर्वभूतहिते रताः ' हाच पाठ धरून त्याचा अर्थ केला आहे. काश्मीरक टीकाकार राजानक रामकंठाने हाच पाठ घेतला आहे अभिनवगुप्तांच्या गीतार्थसंग्रह टीकेत या पदांवर काही स्पष्टीकरण नाही. महाभारताच्या पाठसंशोधित आवृत्तीत कोणत्याही प्रतीत ' सर्वभूताहिते ' असा पाठ असल्याचा उल्लेख नाही. पूर्वीच्या काळी अवग्रह देत नसत, तेव्हा ' सर्वभूतहिते अरताः ' असा पदच्छेद करून ' हिते अरताः ' – हितामध्ये मग्न नसणारे, म्हणजे अहित ( हितकर्ते नसलेले ), अशा पर्यायपरंपरेने ' अहित ' हा शब्द ज्ञानदेवांनी योजला असेल, अशी कल्पना करणे शक्य आहे. पण या संबंधात आणखी शोध करून पाहू. रामानुजाचार्यांनी आपल्या या ठिकाणच्या भाष्यात ' अहित ' शब्द वापरला आहे. तो कशाकरता वापरला याचे नीट ज्ञान व्हावे यास्तव *गी*. *१२*.*३*,*४* वरील त्यांचे भाष्य बहुतांश येथे अवतरणे इष्ट वाटते.

" ये त्वक्षरं प्रत्यगात्मस्वरूपं, अनिर्देश्यं देहादन्यतया देवादिशब्दानिर्देश्यं, तत एव चक्षुरादिकरणानभिव्यक्तं, सर्वत्रगमचिन्त्यं च सर्वत्र देवादिदेहेषु वर्तमानमपि तद्विसजातीयतया तेन तेन रूपेण चिन्तयितुमनर्हं, तत एव कूटस्थं सर्वसाधारणं, तत्तद्देवाद्यसाधारणाकारसम्बद्धमित्यर्थः। अपरिणामित्वेन स्वासाधारणाकारान्न चलति न च्यवत इत्यचलं, तत एव ध्रुवं नित्यं, सन्नियम्येन्द्रियग्रामं चक्षुरादिकमिन्द्रियग्रामं सर्वं स्वव्यापारेभ्यः सम्यङ्नियम्य, सर्वत्र समबुद्धयः सर्वत्र देवादिविषमाकारेषु देहेष्ववस्थितेष्वात्मसु ज्ञानैकाकारतया समबुद्धयः, तत एव सर्वभूतहिते रताः सर्वभूताहितरतित्वान्निवृत्ताः, सर्वभूताहितरतित्वं ह्यात्मनो देवादिविषमाकाराभिमाननिमित्तम्; य एवमक्षरमुपासते, तेऽपि मां प्राप्नुवन्त्येव, मत्समानाकारमसंसारिणमात्मानं प्राप्नुवन्त्येवेत्यर्थः ।"

रामानुजाचार्यांनी अक्षर म्हणजे प्रत्यगात्मा–देहधारी जीवाच्या ठायी असलेला आत्मा–असा अर्थ केला आहे. जीवांच्या अनेक श्रेणी असतात. देव, यक्ष, सिद्ध, गंधर्व, मानव इत्यादी. कूटस्थ म्हणजे सर्वसाधारण. देवादिकांच्या देहांमध्ये असलेल्या परस्परविसदृश अशा आत्म्यांचे जे सर्वसाधारण स्वरूप त्या अक्षराची समबुद्धीने म्हणजे एकाकारतेने जे उपासना करतात ते देखील माझ्याप्रत येऊन पोचतातच म्हणजे माझ्यासारखा आकार धारण करणाऱ्या संसारमुक्त आत्म्याची स्थिती प्राप्त करून घेतात. हे अक्षरोपासक ' सर्वभूतहिते रत ' असतात, म्हणजे काय ? देवादिक जीवांचे आकार परस्पर विसदृश असतात आणि देहबद्ध अवस्थेत त्यांना आपआपल्या देहाकाराचा अभिमान असतो, या अभिमानामुळे इतर सर्व भूतांचे अहित करण्याकडे त्याची प्रवृत्ती असते. पण अक्षरोपासक जेव्हा विषम आकाराच्या जीवात्म्यांशी सम्बद्ध असलेल्या सर्वसाधारण अव्यक्त आत्मस्वरूपाची उपासना करू लागतो तेव्हा ( पूर्वी देहाभिमानामुळे उत्पन्न झालेल्या ) इतर भूतांचे अहित करण्याच्या प्रवृत्तीपासून तो निवृत्त होतो.

जो मुद्दा सध्या प्रस्तुत आहे त्याला अवश्य असलेल्या भाष्यांशाचे स्पष्टीकरण येणेप्रमाणे आहे. इथे प्रस्तुत नसलेल्या विशेषणांचा अर्थ गाळला आहे. मूळ भाष्य मात्र शेवटी दिलेली प्रमाणवचने वगळून सबंध दिले आहे. यातली सर्वांत लक्षणीय गोष्ट ही की—सर्वभूतहिते रत याचा अर्थ रामानुजांनी ' सर्वभूतअहितरतित्वात् निवृत्त ' असा केला आहे. देहस्थित जीवात्मा देहस्वार्थासाठी इतर प्राण्यांचे अहित करण्यात गढलेला असतो हे जगाच्या व्यवहारात पदोपदी दिसून येणारे सत्य आहे. देहाभिमान ज्यांनी सोडला आहे असे जे समबुद्धि अक्षरोपासक त्यांची प्राणिमात्रांचे अहित करण्याची प्रवृत्ती नष्ट होते, असे रामानुजाचार्यांच्या या व्याख्यानाचे तात्पर्य आहे.

ज्ञानदेवांना ' अहितीं ' या शब्दाची सूचना रामानुजांच्या भाष्यातून मिळाली असेल काय, हा विचार करण्याजोगा प्रश्न आहे. देहाभिमानरहित झालेले समबुद्धि उपासक अहित करण्याच्या प्रवृत्तीपासून निवृत्त होतात असे रामानुजांनी म्हटले आहे. ही निवृत्तीची कल्पना ज्ञानदेवांनी घेतलेली नाही; या ओवीत वर्णिलेले अव्यक्तोपासक भूतांचे अहितकर्ते असतात असेच त्यांनी म्हटले आहे. याचे कारण समजण्याजोगे आहे. हे उपासक निरभिमान आणि समबुद्धी झालेले नाहीत. समबुद्धी

झाल्यानंतर ते सर्वभूतांचे हितकर्ते होत असतील. पण तसे होण्याच्या पूर्वी त्यांची स्थिती कशी असते ते पुढच्याच दोन ओव्यांमध्ये सांगितले आहे :—

तेंयां महेन्द्रादि पदें। करिति वाटवंधे।
रिद्धिसिद्धिचीं द्वंद्वें। पडौनि ठाति॥ ६१
कामक्रोधांचे विलग। उठावति अनेग।
आणि शून्येंसिं आंग। जुझावें किं॥ ६२

महेन्द्रादि उचतर स्थानांचा लोभ त्यांची वाट रोखतो; म्हणजे देवादिकांचे स्थान त्यांना प्राप्त होऊन ते त्यातच गुंतून पडतात आणि कामक्रोधांच्या उसळ्या अनेकवार त्यांच्या मनात उठतात इ० इ०. महेन्द्रादिपदे आणि रिद्धिसिद्धी यांच्यामध्ये गुंतून जाऊन जे थांबतात, कामक्रोधांच्या ऊर्मींनी जे हेलायमान होतात असे जे (इंद्रियवासनांसह) देहाने शून्यावरोबर झगडणारे लोक, ते इतर भूतांच्या अहिताला प्रवृत्त होत असले पाहिजेत हे काय सांगायला पाहिजे?

इथे असे दिसते की ज्ञानेशांनी गीता १२·४ आणि १२·५ यांचे रोख निराळे कल्पिले आहेत. १२·४ मध्ये इंद्रियांचा संयम करणारे समबुद्धी अव्यक्तोपासक उल्लेखिले असून ते मलाच प्राप्त होतात (तेहि मातेंचि किरीटि। पावति गा॥ ५८) असे मुळास अनुसरून त्यांनी म्हटले आहे. १२·५च्या व्याख्यानात, अव्यक्तावर आसक्त होऊन केवळ योगाच्याच बळावर जाणारे जे असतात ते महेन्द्रादिपदे आणि रिद्धिसिद्धी यांत गुंतून पडतात व कामक्रोधांच्या अधीन होतात. त्यांचे मार्गक्रमण क्लेशमय होते; (त्यांना माझी प्राप्ति तर होत नाहीच, पण त्यांच्या वाट्याला अखेरीस दुःखच येते (तेयां दुःखाचा सेलवांटा। भागासि आला॥ ६९), असे ते सांगतात. असे का होते? याचे कारण सुचविणारा एकच शब्द ज्ञानेशांनी अतिशय मार्मिकपणे घातला आहे. *भक्तिविण!* अव्यक्ताची उपासना करतानासुद्धा भक्तीची बैठक पाहिजे. भक्तीच्या आधाराखेरीज अव्यक्ताची उपासना म्हणजे निराधार अव्यक्ताची आसक्ती. ती मध्यंतरीच्या प्रलोभनामध्ये फसते आणि अखेरीस दुःखाला कारण होते, असे ज्ञानेश सांगतात. आपल्या जीवनदर्शनाचा हा महत्त्वाचा सिद्धान्त त्यांनी इथे थोडक्यात निवेदिला आहे.

या विवेचनाचा एकंदर निष्कर्ष असा—

१. खरा पाठ 'हितीं' नसून 'आहितीं'.

२. 'अहितीं' चा संबंध पुढील चरणातील अव्यक्तीं याकडे नसून तो 'जिहिं' याकडे म्हणजे अव्यक्तासक्त साधकांकडे आहे. ते तृतीयेचे अनेकवचन आहे. हा अन्वय गीताश्लोकाला अनुसरून आहे.

३. 'अहितीं' या शब्दाची सूचना ज्ञानदेवांना रामानुजभाष्यातून मिळाली असावी.

४. भक्तीशिवाय केलेली अव्यक्ताची उपासना ही आसक्ती होते आणि तिच्यामुळे उपासक मध्यंतरीच्या प्रलोभनामध्ये गुंतून पडतो, असे ज्ञानदेव सांगतात. ओव्या ६०, ६१, ६२.

५. अशा उपासकांचा देहाभिमान सुटत नाही; आणि देहाभिमानी सकल भूतांचा हितकर्ता असू शकत नाही. 'सकळ भूतांचां अहितीं' याचा अर्थ असा आहे. हा विचार रामानुजभाष्यामध्ये आलेला आहे.

'अहितीं' हा पाठ माडगावकरांच्या ज्ञानदेवीमध्ये आहे, कुंट्यांच्या व चाफेकरांच्या ज्ञानेश्वरीत टीपेत आहे. हे छापील ग्रंथ कोणासही पाहता येतील. याशिवाय ज्या हस्तलिखित पोथ्यांमध्ये हा पाठ असल्याचे आम्ही मागे लिहिले आहे त्या पोथ्या किंवा पोथ्यांच्या मायक्रोफिल्म् आमच्याजवळ आहेत. कोणाही जिज्ञासूला पाहता येतील.

(आ) बहुतेक प्रतींमध्ये आसक्ति आहे. याचे कारण हे उघड आहे की मूळ गीतेमध्ये आसक्त हा शब्द आहे. असे असूनही मति हा पाठ ज्याअर्थी अनेक महत्त्वाच्या प्रतींमध्ये आहे त्याअर्थी त्याचे मूळ जुने असले पाहिजे असे अनुमान होते. मति हा पाठ **रा न सा** या प्रतींमध्ये म्हणजे संपूर्ण पाटांगण परंपरेमध्ये आणि शिवाय **भ** या महत्त्वाच्या स्वतंत्र प्रतीमध्ये आहे. पसरलिया हे अनेकवचनी कर्मानुसारी क्रियापद आहे. त्याचे कर्म अनेकवचनी असावयास पाहिजे. आसक्ती हे एकवचनी असणार. आसक्तीचे अनेकवचन कधी होत नाही. मती म्हणजे बुद्धी याचे अनेकवचन केव्हा केव्हा होऊ शकते. आसक्ती पसरली असा शब्दप्रयोग भाषेत प्रचलित नाही. मतिप्रसर इ० म्हणण्याचा प्रघात आहे. ज्ञानदेवकाली असेच असण्याची शक्यता अधिक. पोथ्यांच्या आधाराला व्याकरण, भाषाप्रचार यांची साक्ष जोडली म्हणजे मती हाच मूळ पाठ असावा ही धारणा दृढ होते.





( ३ )

गीता १२·६ चे व्याख्यान पुढील ओवीपासून सुरू होते. ही प्रस्तावनारूप सांध्याची ओवी असल्यामुळे पाठसंशोधित आवृत्तींत *गीता १२·६*च्या वर छापली आहे.

*म्हणोनि येर ते पार्था । नेणातीचि हे व्यवस्था ।*
*जे कां भक्तिपंथा । वोटंगले ॥ ७५*

**रा न** प्रतींमध्ये च. १,२ येणेप्रमाणे—
*म्हणोनि येर तेयांची वार्ता । परिसें गा पार्था ।* ( **न** )

या दोन प्रतींखेरीज इतर कोठेही अशी रचना नाही. या रचनेत म्हणौनि हे अव्यय विजोड दिसते. अव्यक्तोपासक क्लेशाला पात्र होतात 'म्हणून भक्तिपंथाचा आश्रय करणाऱ्यांची अवस्था तू ऐक' यापेक्षा 'म्हणून भक्तिपंथाचा आश्रय करणारे या मार्गाकडे लक्षच देत नाहीत' हे म्हणणे अधिक स्वाभाविक, हे कोणालाही पटेल. **रा न** प्रती मूळ पाठात घडविलेल्या बदलांच्या वारस आहेत, असे पूर्वी कित्येक ठिकाणी आपल्या निदर्शनास आले आहे. तोच प्रकार इथे दिसतो. इतर कोणत्याही नोंदलेल्या प्रतींत ही रचना नाही.

शब्दाचा पाठभेदः

**व्यवस्था—व्यथा**

व्यवस्था याची वेवस्ता, वेवस्था आणि व्यथा याची वेथा अशी अपभ्रष्ट रूपे अनेक पोथ्यांत आढळतात, ती वरील तत्सम रूपांच्या पोटात आहेत असे समजावे. व्यथा हा पाठ **दा मा स शा अ सि सा** या प्रतींमध्ये आहे. व्यवस्था हा **गो व भ जा वि का** या प्रतींमध्ये आहे. **मा स** या एकनाथी परंपरा विशुद्ध स्वरूपात दाखविणाऱ्या प्रती. **अ सि** या वरवा परंपरेच्या. तेव्हा व्यथा हा पाठ एकनाथी व वरवा या परंपरांचा होय, हे ठरते. व्यवस्था हा पाठ सिद्धनाथी परंपरेचा, हे **वि का व** या प्रतींवरून दिसते. **भ जा** या महत्त्वाच्या स्वतंत्र प्रतींमध्ये तो आहे आणि पाठसंशोधक गोपाळाश्रम स्वामींनी तो स्वीकारला आहे यावरून त्याचे अधिकतर मूल्य सूचित होते. व्यथा हा पाठ सुधारलेला असणे अधिक संभवनीय. व्यवस्था म्हणजे इथे उपासनेची आखीव पद्धती. ही पद्धती अनुसरल्यानंतर मागाहून व्यथा होणार. एका दृष्टीने नेणाति या क्रियापदाशी व्यथा हा शब्द अर्थाला जास्त जुळत असल्यामुळे तो पाठ ग्राह्य असे वाटण्याचा संभव आहे. भक्तिमार्गी लोक अव्यक्तोपासनेची पद्धती जाणत नाहीत असे नव्हे; तिचे ज्ञान आहे म्हणून सगुणभक्तीशी तिची तुलना करून ते भक्तीकडे वळतात. म्हणून तिचे क्लेश ( व्यथा ) त्यांच्या अनुभवाला येत नाहीत. याप्रमाणे अर्थाच्या दृष्टीने पाहिले तर व्यथा हा पाठ श्रेयस्कर वाटतो. पण याच कारणास्तव तो नंतरचा, सुधारलेला असण्याची शक्यता अधिक. तोच जर मुळात असता तर त्याच्या ठिकाणी व्यवस्था असे कोण कशाला करता? आणि इतक्या महत्त्वाच्या पोथ्यांत तो कसा येता!

*कर्मेंद्रियें सुखें । करिति कर्में अशेषें ।*
*जियें कां वर्णविशेषें । भागासि आलिं ॥ ७६*

**भागासि—भोगासि, भागा**

भोगासि हा पाठ फक्त **रा** प्रतीत आहे. तिला नेहमी साथ देणाऱ्या **न** प्रतीत देखील तो नसून भागासि आहे. पोथ्यांच्या या बलवत्तर साक्षीवरून भागासि हाच पाठ ठरतो. वाट्याला आली या समुचित अर्थाच्या दृष्टीनेही हा पाठ योग्य ठरतो. बहुसंख्य प्रतींमध्ये **सि** प्रत्यय गाळून भागा एवढेच ठेवले आहे. बाब महत्त्वाची नाही. पण गोपाळाश्रमांनी सि घेतला आहे यावरून जुन्या परंपरेचा त्याला आधार असावा.

*आणिकहि जें जें सर्व । कायिक मानसिक भाव ।*
*तेयां मीं वांचुनि धाव । आनौती नाहिं ॥ ७१*

**कायिक मानसिक—काहिं एक मानसिक, कायिक वाचिक मानसिक**

कायिक ऐवजी काहिं एक असे **रा न** प्रतीत आहे. दुसऱ्या कोणत्याही प्रतीचा पाठिंबा त्याला नाही. आणि त्याचा अर्थ नीट लागत नाही. काहिं एक याचा अर्थ जुन्या भाषेत थोडाबहुत, थोडासा असा होतो; ज्ञानदेवीतील इतर उदाहरणांमध्ये तसाच आहे. पण इथे तो मुळीच जुळत नाही. इथे 'एकूण एक'या अर्थाचा शब्द असावयास पाहिजे. मागे 'सर्व' म्हणून लगेच 'काहिं एक' म्हटले; हा परस्पर विरोध तर फारच खुपणारा आहे. तेव्हा प्रतींचा, परंपरांचा पाठिंबा नसलेला हा पाठ अर्थाच्या दृष्टीनेही अग्राह्य ठरतो. राजवाडे प्रतीच्या समर्थक संपादकांनी याचा अर्थ लावण्याचा केलेला प्रयत्न सफल झालेला नाही. मारून मुटकून संदर्भाला प्रतिकूल अर्थ काढण्यापेक्षा पाठाचा त्याग करणे बरे.

**कायिक वाचिक मानसिक** असे **रा न सा गो का** या प्रतींखेरीज इतर सर्व प्रतींमध्ये आहे. साधारणपणे कायावाचामने किंवा कायिक वाचिक मानसिक असा तिन्हींचा उल्लेख करण्याची सर्वत्र पद्धत आहे. तसाच जर मूळ पाठ असता तर वरील महत्त्वाच्या प्रतींमध्ये 'वाचिक' चा अभाव दिसला नसता. वाचिक भाव म्हणजे काय? ही शब्दयोजना थोडी चमत्कारिक दिसते. मुळात असलेला वाचिक शब्द इतक्या प्रतींमध्ये गाळला जाण्यापेक्षा मुळात नसलेला वाचिक शब्द मागाहून घातला जाणे अधिक संभवनीय; कारण, 'कायिक वाचिक मानसिक' असा सार्वत्रिक प्रचार आहे.

गी. १२,७ चे ज्ञानेशांचे व्याख्यान ८३ व्या ओवी-पासून सुरू होते.

*किंबहुना धनुर्धरा । जो मातेचेया ये उदरा ।*
*तो मातेचा सोएरा । केतुला पां ॥ ८३*

**रा न** प्रतींमधील च. ३,४—

*तिये मातेचा सवंसारा । केतुला पां ॥*

**सवंसारा** हा पाठ फक्त **रा न** प्रतींमध्ये आहे. हे सवंसार या अकारान्त नामाचे यमकाकरिता आकारान्त रूप केले अशी कल्पना करावी लागते. सवंसारा हे इथे प्र. एकवचन आहे. याचा अर्थ पसारा व्याप, विस्तार. स्त्रीला मूल झाले म्हणजे तिच्या प्रपंचाचा पसारा केवढा होतो! तिला आपल्या मुलाचे सर्व काही करावे लागते.

**सोयरा ( सोएरा )** हा इतर सर्व प्रतींमध्ये आहे मातेचा पुत्र हा तिचा किती निकटच्या नात्याचा होय वरे! प्रेमाचा आप्त, नातेवाईक याअर्थी सोयरा शब्द ज्ञानदेवीत अनेक ठिकाणी आला आहे.

दोन्ही पाठ अर्थाच्या दृष्टीने चांगले, सारख्या योग्यतेचे दिसतात. **सवंसारा** या पाठाच्या **रा न** प्रतीं-मध्ये 'तिये' असे सर्वनामाचे रूप बदलून ते मातेकडे लागेल असे केले आहे. **सवंसारा** हा पाठ देवाच्या बाजूने अर्थान्वित होतो. भक्ताकरिता देवाला व्याप उभारावा, पसारा मोडावा लागतो. **सोयरा** हा पाठ भक्ताला लागतो. भक्त हा देवाच्या निकटच्या नात्यातला बनतो. अर्थाच्या दृष्टीने तुल्यबल पाठांमध्ये निर्णय करावयाचा झाल्यास प्रतींचे पाठबळ हेच निर्णायक तत्त्व ठरणार. एरवीही ते प्रमुख तत्त्व असतेच. इथे **सवंसारा** पाठाला **रा न** प्रतींखेरीज कुणाचाही पाठिंबा नाही. पाटांगण परंपरेतील **सा** प्रतीचाही नाही. बाकीच्या सर्व परंपरा व सर्व स्वतंत्र प्रती सोएरा हाच पाठ देतात.

शिवाय अन्वयाची महत्त्वाची बाब **रा न** प्रतींच्या विरुद्ध जाते. मागे अवतरलेल्या ओवीकडे जरा वारकाईने लक्ष पुरवावे. च. १,२ सर्वत्र सारखेच आहेत. तेव्हा **रा न** प्रतींनुसार "जो मातेचेया ये उदरा तिये मातेचा सवंसारा केतुला पां" असे वाक्य होते. जो हे सर्वनाम पुत्राचे बोधक आहे, तर तिये हे मातेला लागू आहे. जो तो ही एकाची बोधक असावयास पाहिजेत, तसे होत नाही. इतर प्रतींमधील पाठांत हा संबंध बरोबर जुळतो. ज्ञानेशांनी व्याकरणदृष्ट्या चुकीचे वाक्य लिहिले असेल आणि मागाहून कोणी व्याकरणदृष्टि वाचकाने ते सुधारले असेल अशी कल्पना, केवळ राजवाडे प्रतीचे समाधान साधण्याकरिता, करण्याचे कारण नाही.

*तेवि मीं तेयां । जैसे असति तैसेयां ।*
*कृत तें धनंजया । घेतला पाठा ॥ ८४ ॥*

**कृत तें धनंजया-कळिकाळ नोकुनियां [लोपुनियां], कृतनिश्चये धनंजया**

**कृत तें धनंजया रा न गो**मध्ये; **कृतनिश्चये धनंजया सा** मध्ये आहे. इतर प्रतींपैकी **वि का** मध्ये **कळिकाळ लोपुनियां** आहे; बाकीच्या सर्व प्रतींमध्ये **कळिकाळ नोकुनियां** आहे. **वि** मध्ये मुळात **लोपु** असून त्यावर समासात **नोकु** अशी सुधारणा केली आहे. सिद्धनाथी परंपरेमध्ये मूळचा **लोपुनियां** पाठ होता, पण एकनाथीच्या अनुकरणाने **नोकुनियां** झाला. हे पाठांतर घडण्याच्या पूर्वीची अवस्था **का** मध्ये दिसते; ते घडत असलेले **वि** मध्ये दिसते; ते पक्के झाल्यानंतरची अवस्था **ब शा** मध्ये दिसते.

हा एकूण पाठच स्वीकार्य वाटत नाही. कळिकाळाचा इथे उल्लेख वर्णनाच्या ओघाला सोडून वाटतो. कळिकाळ हा जोड शब्दप्रयोग ज्ञानदेवांच्या सरणीत नीट बसतो असे वाटत नाही. या शब्दांच्या द्वारे इथे जे व्यक्त होते, तेच ८७ पासून पुढे ज्ञानेशांनी प्रेममय उदात्त वाणीने सुंदर रीतीने सांगितले आहे. 'तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात्।' याचे खरे विवरण तेथे आले आहे. मागील 'तैसेयां' याच्याशीं **कळिकाळ नोकुनियां** याचा अन्वयही नीट जुळत नाही. तेव्हा हा पाठ अस्वीकार्य

अनुक्रमणिका

ठरतो. मात्र हा पाठ फार जुन्या काळापासून चालत आला असावा. तो एकनाथी व सिद्धनाथी परंपरा आणि **भ जा** या महत्त्वाच्या स्वतंत्र पोथ्या यांच्यामध्ये आहे.

मूळ पाठ कोणता असावा? **रा न गो** मध्ये **कृत तें** आहे; **सा** मध्ये **कृतनिश्चयें** आहे. अनुस्वार चुकून गळला अशी कल्पना केली तर हा पाठ कदाचित सर्वांहून सरस ठरेल. कृतनिश्चयें म्हणजे ठाम निश्चयाने, याचा अन्वय 'घेतला पाटा' याकडे फार सुरेख जमतो. 'माझे भक्त कसेही असले तरी ठाम निश्चयाने मी त्यांची जिम्मेदारी घेतो' असा अर्थ निष्पन्न होतो. ज्ञानदेवीच्या पोथ्यांमध्ये अनुस्वाराचा अनियम फार आढळतो. ये वर अनुस्वार नाही ही महत्त्वाची बाब नाही. पण हा पाठ फक्त **सा** मध्येच आढळतो. त्याला पाठिंबा नाही. म्हणून तो आम्ही स्वीकारला नाही. अलीकडे उपलब्ध होत असलेल्या पोथ्यांमध्ये कदाचित याला पाठबळ मिळण्याचा संभव वाटतो. तसे झाल्यास पुनर्विचार करावा लागेल.

**कृत तें** हा जो पाठ आम्ही सध्या स्वीकारला आहे त्याचा अर्थ कसा करायचा? राजवाडे प्रतीच्या पुरस्कर्त्या संपादकांनी 'ते कृत' अशी शब्दांची उलटापालट करून ते वरील अनुस्वार पुसून 'ते (भक्त) कृतार्थ होत!' असा अर्थ केला आहे. वर सांगितल्याप्रमाणे अनुस्वाराची बाब महत्त्वाची नाही; शब्दांची उलटापालट करणे हा गौण पक्ष, ती अवश्य तर करावयास हरकत नाही; पण कृत याचा अर्थ कृतार्थ, कृतकृत्य असा होऊ शकेल काय? कृत म्हणजे केलेला, केला. केला म्हणजे आज्ञांकित, चेला, सेवक. पहा–मी पार्थु द्रोणाचा केला। २·३७. केले म्हणजे आज्ञापिलेले कार्य: पहा–तुम्हां सज्जनाचें केलें १८·१७६२; किंबहुना तुमचें केलें। १८·१७७ (**रा** प्रत). तशाच तऱ्हेचा इथे **कृत** याचा अर्थ दिसतो. 'माझे भक्त जसे असतील तशांचा मी केलेला, त्यांना वाहिलेला' हा 'जैसे असति तैसेयां' कृत' याचा अर्थ. कृत 'च्या पुढे अर्धविराम द्यावा. तें कारणबोधक अव्ययासारखे; 'तें घेतला पाटा:' 'कारण, मी त्यांची जिम्मेदारी घेतली आहे.'

*माझेयां आणि भक्तां। सवंसाराची चिंता*
*काइ समर्थाची कांता। दैन्यातें सुचि॥ ८५*

(अ) माझेयां आणि भक्तां—एन्हवीं तऱ्हीं माझेयां भक्तां

(आ) दैन्यातें सुचि—दैन्यातें शोची, दैन्य भाकी, भुकेतें शोची, कोरान्न मागे

(अ) स्वीकृत पाठभेद **रा न गो** प्रतींमध्ये आहे. गोपाळाश्रमांनी तो घेतला हे तो स्वीकार्य वाटण्याचे मुख्य कारण. इतर गोष्टी त्याला साधकच आहेत. माझे आणि भक्त या दोन्ही कोटी जवळ जवळ एकच आहेत. जवळ जवळ समानार्थक शब्दांची समानाधिकरण योजना हे भाषाशैलीचे एक विलसित होय, त्याने परिणामकारकता वाढते. ज्याने **आणि** हा शब्द काढून टाकून माझियां हे नुसते भक्तांचे विशेषण करून टाकले त्याने मुळाचा जिव्हाळा आणि परिणाम नष्ट केला. 'एन्हवीं तरी' ही अव्यये जास्त घातल्याने शैलीत आणखी बिघाड झाला. ही पक्षांतरबोधक अव्यये आहेत. 'नाही तरी' असा अर्थ व्यक्त करून निराळा पक्ष दाखविण्याचे इथे प्रयोजन नाही; उलट ते पूर्वार्थसंदर्भास बाधक आहे.

(आ) ओ. ८५ च. ४ मध्ये तीन प्रतिस्पर्धी पाठ आहेत. पैकी **कोरान्न मागे** हा **दा मा स** मध्ये आहे. म्हणजे हा एकनाथी परंपरेचा पाठ होय. **भुकेतें शोची** **वि शा ब का** या प्रतींमध्ये, तसेच **अ सि** या प्रतींमध्ये आहे. तेव्हा हा सिद्धनाथी व वरवा परंपरांचा पाठ होय. भेदाचे प्रकार इथे थांबत नाहीत. या दुसऱ्या पाठप्रकारात दोन्ही शब्दांच्या बदलाने पोटभेद होतात. **भुकेतें** ऐवजी **दैन्यातें** **भ** मध्ये आहे. **गो** मध्ये मुळातले भुकेतें खोडून समासात दैन्य अशी दुरुस्ती केली आहे. फलित पाठ **दैन्य शोचि** असा होतो. **सा** मध्ये **दैन्य** आहे. हे **भुकेतें** यावरील पाठभेद. **शोची** ऐवजी **भ** मध्ये **सुचि**, **सा** मध्ये **भाकी** आहे.

**कोरान्न मागे** आणि **भुकेते शोची**, यांपैकी कोणता पाठ स्वीकार्य? **कोरान्न मागे** ही अर्थ अधिक तीव्र करण्याकरिता मागाहून केलेली सुधारणा दिसते. कोरान्न हा शब्द ज्ञानदेवकाली होता की नव्हता? बहुधा नसावा. असता तर समाजजीवनाची नानापरीची दृश्ये दाखविणाऱ्या लीळाचरित्रासारख्या तत्कालीन विस्तीर्ण ग्रंथात तो आढळला असता. तिथे तो दिसत नाही. एकनाथांपुढे असलेल्या एखाद्या पोथीमध्ये तो असेल. इप्सित अर्थ जास्त ठळक, खोचक रीतीने व्यक्त करणारा म्हणून त्यांनी तो पसंत केला असावा. तेथून तो वरवा परंपरेत गेला असावा.





हा नाशावीत ठरल्यानंतर **भुकेतें** **शोची** याकडे आपण वळतो. हा एक पाठ नसून पाठगट आहे. भुकेतें ऐवजी दैन्यातें, दैन्य, शोची ऐवजी सुचि, भाकी, असे फरक आहेत.

**भुकेतें** हा पाठ बहुमान्य आहे. पण **दैन्य** हा **भ सा** प्रतींमध्ये आहे आणि **गो** मध्ये सुधारलेला पाठ तोच आहे. **भ** प्रत जेव्हा बहुमान्य पाठाहून निराळा पाठ देते तेव्हा तो पाठ अवश्य विचारणीय असतो; आणि **गो** प्रत तिला साथ देते तेव्हा तर त्या पाठाची संभवनीयता अधिकच वाढते. अर्थाच्या दृष्टीनेही **दैन्यातें** हा अधिक ग्राह्य. समर्थाची म्हणजे राजा-महाराजाची जी स्त्री, तिच्या जीवनात **भूक, अन्न** या गोष्टी अगदी अल्प महत्त्वाच्या. राहणीचे एकंदर दैन्य हेच तिला बोचणारे, मलूल बनविणारे. तेव्हा इथे दैन्य हेच उचित आहे. दैन्य–भूक–कोरान्न अशा या पाठ-बदलाच्या पायऱ्या दिसतात. भुकेची पीडा फार होऊ लागली म्हणजेच बाई कोरान्न मागते.

शोची ऐवजी **सुचि, भाकी** असे दोन पाठ आहेत. **भाकी** हा पाठ मूळ पाठाच्या दुर्बोधतेमुळे कल्पनेने फोडलेला फाटा दिसतो. दैन्य भाकी असा प्रयोग, निदान अलीकडील भाषेत तरी, अस्वाभाविक होय. करुणा भाकी इ० प्रचारात आहे. मागणे, दीनवाणी विनंती करणे, या अर्थाचा भाक हा धातू ज्ञानदेवकाली भाषेत होता की नाही, याचा संशय वाटतो. तत्कालीन ग्रंथांत दिसत नाही. वास्तविक ज्ञानदेवांनी इथे समर्थाच्या कांतेचा जो दृष्टान्त दिला आहे तो फार नाजूक आणि भावगम्य आशय सूचित करणारा आहे. भाकणे म्हणजे दीन विनंती करणे. भाष् म्हणजे बोलणे यावरून भाक शब्द आला. समर्थाची कांता आपले दैन्य काय ज्याला त्याला सांगत सुटेल ? हे सुतराम् शक्य नाही.

आणि ज्या कारणास्तव **भाकी** हा पाठ अप्रशस्त, जवळजवळ त्याच कारणास्तव **शोची** हाही पाठ अप्रशस्त. शोचणे म्हणजे शोक करणे; अश्रू गाळणे, मुद्रा कष्टी करणे, करुणोद्गार काढणे, अशा कोणत्या तरी प्रकाराने दुःख प्रकट करणे हे त्यात असतेच. इथे समर्थकांतेचा दृष्टान्त ज्ञानदेवांनी ईश्वराच्या अनन्यभक्तांना दिला आहे; तो त्यांच्या उच्च आध्यात्मिक पातळीला शोभेसा असला पाहिजे. नाहीतर काव्यसौंदर्यहानी व्हावयाची. समर्थ-कांतेचे वर्तन तिच्या उच्च पदाला शोभेसे धीरगंभीर असले पाहिजे, तरच ईश्वराच्या अनन्यभक्तांना ती दृष्टान्त शोभेल. तेव्हा शोची ऐवजी मुळात सुचि हे क्रियापद असले पाहिजे हे उघड आहे. दैन्यातें **सुचि** म्हणजे 'दैन्याला सुचवते', 'तिचे वर्तन, राहणी यांवरून तिचे दैन्य अप्रत्यक्षरीत्या दर्शविले जाते'. इथे उत्तरी नकार असलेले प्रश्नार्थक वाक्य आहे. "समर्थाची कांता आपले दैन्य कधी तरी सूचित करील काय, आपल्या वागणुकीत दैन्य दर्शवील काय ?— अर्थात नाही" असा प्रसंगोचित अर्थ निष्पन्न होतो. सुच, सूच हा धातू ज्ञानदेवीत सुचविणे, दर्शविणे अशा अर्थी येतो. त्याच्या उपयोगाने येथे सुंदर ध्वनिकाव्य अवतरले आहे. पाहा **रा** प्रत ३-४०; १५-९० इ. 'सुचि' ऐवजी 'शोची' हा पाठ कसा आला असावा याचा तर्क करणे फारसे कठीण नाही. सुच धातू पुढे याच स्वरूपात प्रचारातून कमी होत गेला; तेव्हा शोच हा ठसठशीत अर्थाचा धातू त्याच्या जागी येऊन बसण्यास फारशी अडचण पडली नसावी. जे पाठ असे नंतर येऊन स्थानापन्न होतात त्यांच्यामुळे औचित्य, सौंदर्य, संदर्भानुकूल्य इत्यादिकांना थोडीबहुत बाधा बहुधा पोचते. तसे इथेही झाले आहे.

*जन्ममृत्युचां लाटीं । झळंबति या सृष्टि ।*
*देखोनियां पोटीं । रिगाले पाय ॥ ८७*

**रिगाले पाय–पाय रिघती, ऐसें जालें.**

**रिगाले पाय** ऐवजी **पाय रिघती** हा काळाच्या फरकाने जवळजवळ तोच पाठ आहे. स्वीकृत पाठाने लय चांगली जमते. जुने पाठ त्यातल्या त्यात यथातथ्य रूपात देण्याविषयी जिचा अधिक विश्वास वाटतो ती **भ** प्रत **रिघाले पाय** देते. **सा** आणि **का** प्रतींत पाये (य) **रिघती** आहे. **वि** प्रतीत मुळातले 'ऐसें जालें' याला कंस घालून खालच्या समासात **पाये रिघती** हा दिला आहे. तेव्हा पाय रिगणे हा पाठगट एकूण **भ सा वि का** या चार प्रतींत आहे. **वि का** प्रतींच्या साक्षीवरून हा पाठ सिद्धनाथी परंपरेत पूर्वी असावा असे अनुमान होते. **सा** प्रत पाठांगण परंपरेतली असली तरी कित्येक वेळा निराळे मूलगामी पाठ देते हे आपण पाहिले आहे. **भ** प्रतीचे तर स्वतंत्र मूलगामी पाठ देणे हे वैशिष्ट्य आहे. 'पाय पोटीं रिगणें' म्हणजे भयभीत होणे. या सुंदर वाक्सं-प्रदायाचा ज्ञानदेवांनी इथे उपयोग केला असता तो न कळल्याकारणाने त्याच्या जागी कोणी तरी '**ऐसें**

जालें' हे निरर्थक शब्द घालून देऊन ओवीचा शेवट पिळपिळीत करून टाकला. ज्ञानदेवांच्या ओव्यांचे अन्त असे नसतात. 'जन्ममृत्यूच्या लाटांनी ही सृष्टी झपाटली आहे हे पाहून प्राणिमात्र भीतिग्रस्त होतो' असा ओवीचा अर्थ आहे. 'माझे भक्त देखील कदाचित या भवसिंधूच्या उमळत्या लाटांनी भितील' हा याच्या पुढच्या पायरीचा अर्थ पुढच्या ओवीत सांगितला आहे (८८). 'ऐसें जालें' हे सांध्याचे शब्द, त्यांचे इथे काही काम नाही; उलट ते विरस करतात. म. श. को. मध्ये पाय या शब्दाखाली 'पाय पोटीं जाणें' हा वाक्संप्रदाय दिला असून भयभीत होणे, अतिशय भीती वाटणे, असा त्याचा अर्थ दिला आहे. प्राचीन काळी हा 'पाय पोटीं रिगणें' या स्वरूपात असला पाहिजे. रिगणे = जाणे. पहा : रिगाला भक्तिपंथीं १२·२१९

**रिगाले पाय हा सुंदर मूळ पाठ हस्तलिखितांचा शोध, संग्रह आणि त्यांतील पाठांचे पद्धतशीर संशोधन यांमुळेच आपणांस मिळू शकला.** कोणत्याही मुद्रित प्रतीत तो आढळत नाही.

*सडे जे देखिले । ते ध्यानाचिये कासे लाविले ।*
*परिग्रहीं घातले । क्रियांतरिं ॥ १०*

परिग्रहीं—ग्रुहीं, गृहिं·

क्रियांतरिं—तरियांवरि, क्रियांवरि

**ग्रुहीं–रा, गृहिं–न**; **रा न** या दोनच प्रतींमधील हे पाठ गृही याचे अपभ्रंश होत. या आवळ्याजावळ्या दोन प्रतींमध्ये देखील लेखनपद्धतीचे भिन्न प्रकार आढळावे ही लक्षणीय गोष्ट होय. यावरून त्या जुन्या काळी लेखनाला नियमन नव्हते, शुद्धलेखनाच्या नियमांचा पत्ता नव्हता, याची साक्ष पटते. यावरून पुढे पेशवाईत मोरोपंत कवींनी भाषेच्या लेखनाचे नियमन करण्याचा जो प्रयत्न केला त्याचे महत्त्व पटते. अनुस्वाराचा तर काहीच सुमार नाही. वास्तविक येथील शब्द परिग्रही किंवा गृही हे आहेत. त्यात शेवटी अनुस्वार येण्याचा काही संबंध नाही. असे असता नोंदलेल्या पंधरा प्रतींपैकी दहा प्रतींमध्ये हा अनुस्वार आहे.

असो; मुख्य पाठांतर **परिग्रही** बद्दल **गृही** हे आहे, ते फक्त **रा न** प्रतींमध्येच आहे. त्यात अर्थाचे कोणतेही वैशिष्ट्य नाही आणि **गृही**बद्दल मागाहून **परिग्रही** केले जावे याचे कोणतेही कारण तर्किता येत नाही. वास्तव परिग्रही हा पाठ कायम केला आहे. **गृही** हा शब्द राजवाडे प्रतीत देखील फक्त इथेच आलेला दिसतो; परिग्रह पाच वेळा आलेला आहे (ज्ञानेश्वरीचे शब्दभांडार). परिग्रह म्हणजे परिवार, कुटुंब.

**क्रियांतरिं** हा **रा गो** मध्ये व **क्रियांवरि** हा **न** मध्ये आहे. हा पाठ मुळात एकच असला पाहिजे. दोहोंच्या अर्थामध्ये विशेष फरक नाही. खरा निराळा पाठ **तरियांवरि** हा बाकीच्या सर्व प्रतींमध्ये आहे. येथे निवड करणे कठीण आहे. **क्रियांतरिं** या पाठाच्या बाजूला प्रतींची संख्या कमी असली तरी त्यांत **गो** प्रत आहे; **रा** आणि **गो** या एकमेकांची साथ करीत असतील तिथे त्या पाठाला विशेष महत्त्व प्राप्त होते. तरियांवरि या पाठाला बाकीच्या सर्व परंपरांचे व पोथ्यांचे पाठबळ तर आहेच; शिवाय इथे जे चालू उपमान आहे त्याला तो अनुसरून आहे म्हणून सकृद्दर्शनी अधिक उचित वाटतो. इथे संसारावर सागराचे रूपक पूर्वीपासून चालू आहे. भक्तांना त्याच्या तीरावर पोचविण्याची साधने परमेश्वर पुरवितो आहे. भक्तींची साधने आणि तरून जाण्याची साधने यांचा रूप्यरूपक भाव आहे. ओवी ९० मध्ये सडे भक्त आणि कुटुंबी भक्त यांचा विचार आहे. सड्यांना ध्यानरूपी साधनाच्या कासेला लावले; कुटुम्बवत्सल लोकांना तऱ्यांवर (एक प्रकारच्या नावांवर) चढविले, असा अर्थ तरियांवरि हा पाठ घेतल्यास होईल; आणि तो सुरेख जुळतो असे वाटते. पण 'ध्यानाचिये कासे' यात रूप्य आणि रूपक दोन्ही अंगे आहेत; तरियांवरि हे रूपक झाले पण ते कशावर रूपक आहे याचा निर्देश नाही. पुढच्या (९१) ओवीत सहस्रनामें या प्रस्तुत विषयाचा उल्लेख असून त्यावर नौकांचे रूपक केले आहे. पुढच्या ओवीत याप्रमाणे नावांचे रूपक स्पष्ट असता तरियांवरि या शब्दाने त्याची पुनरुक्ती पूर्वीच्या ओवीत केली असेल हे संभवनीय वाटत नाही. तरियांवरि हा जर मूळ पाठ असता तर त्याचा पुढच्या ओवीतील विधानाशी संबंध इतका स्पष्ट आहे की त्या पाठाच्या बदली दुसरा पाठ उद्भवण्याचे कारण नव्हते. क्रियांतरिं हा पाठ असा आहे की, तो वरवर वाचणाऱ्याला बुचकळ्यात पाडील. पण जरा विचार केला म्हणजे त्याचे स्वारस्य लक्षात येते. ध्यानयोग साधण्याला एकान्त लागतो. जो सडा म्हणजे संसारापासून अलिप्त आहे त्याला एकान्त सुलभ, म्हणून त्याला ध्यानमार्गाला लावले. जे कुटुंबी लोक आहेत

त्यांना निवांतपणा कमी असल्यामुळे ध्यान दुःसाध्य, म्हणून त्यांना दुसऱ्या क्रियेकडे लाविले. ही क्रिया म्हणजे नामस्मरण; हे करण्यासाठी सहस्रनाम याच कोणी नौका, त्या तयार करून त्यांना दिल्या आणि त्यांना संसारातून तारणारा मी झालो. अशा रीतीने क्रियांतरिं याचा संबंध पुढील ओवीकडे लावला म्हणजे पाठसंगतीने अर्थसंगती नीट लागते. संसारी पुरुषाला 'नामस्मरण हें साधन पैं सोपें'! त्याकरिता

नलगे सायास जावे वनांतरा। सुखें येतो घरा नारायण ॥

*आणि जेधवांचि कां भक्तीं। दिन्हालिया चित्तवृत्ति।*
*तेधवांचि मज सुति। तेयांचां नार्टि ॥ १५*

नार्टि - हिर्ति, ठाई, पडली, नाटेंचि

हिर्ति हा पाठ **रा गो सा** या प्रतींत आहे. **न** प्रतीत काय होते हे कळण्यास मार्ग नाही, कारण येथील भाग फाटला आहे. पण **रा सा** प्रतीच्या साक्षीवरून हा पाठ पाटांगण परंपरेचा असावा असे मानण्यास चिंता नाही. **ठाई अ सि** प्रतींमध्ये आहे; म्हणजे हा बरवा परंपरेचा असावा. **वि** प्रतीची साक्ष चमत्कारिक आहे. त्यात पडली किंवा घडली अशी अक्षरे या जागी दिसतात. भूलचुकीने हे झालेले दिसते.

मुख्य प्रश्न हितीं आणि नार्टि या पाठांसंबंधी आहे. हितीं अल्पसंख्य प्रतींमध्ये असला तरी त्या प्रती महत्त्वाच्या आहेत; यांच्या आधारावर कित्येक पाठ आपणांस स्वीकरणीय वाटले आहेत. "आणि जेव्हा भक्त मला आपल्या चित्तवृत्ती देतात त्याच वेळी ते मला त्यांच्या हितात घालतात." (म्हणजे मी त्यांच्या हिताला वाहून घेतो.) हा अर्थही एकंदरीने वाईट नाही.

मग नार्टि या पाठाचे काय? तो बहुसंख्य प्रतींमध्ये आहे. एकनाथी व सिद्धनाथी परंपरांचा तोच पाठ आहे. नाट शब्द फार जुना दिसतो. महानुभावीय काव्यांमध्ये तो आढळतो. त्याचे लिंग कोणते? त्याचा अर्थ काय? ज्ञानदेवीत आणखी एका ठिकाणी हा शब्द आलेला आढळतो.

कां जे ऐसें किरीटी। मातें भजे जो अभेदा दिठी।
तयाचिये भजनाचिये नार्टी। सूती मज ॥ १०-१०९

येथील ३, ४ चरणांचे प्रस्तुत ओवीच्या ३, ४ चरणांशी साम्य स्पष्ट आहे. तेव्हा प्रस्तुत ओवीमध्ये देखील भजनाचिये नार्टि असा अभिप्रेत अर्थ असावा. नाट याचा नृत्य असा एक अर्थ दिला जातो व दुसरा स्थान, ठिकाण, प्रदेश असाही दिला जातो. दोन्ही अर्थी हा शब्द पुंल्लिंगी वापरला जातो. ज्ञानदेवीतील या दोन्ही स्थली स्थान, जागा हा अर्थ दिसतो. 'मला सर्व चित्तवृत्ती अर्पण करणारे जे भक्त ते आपल्या भजनाच्या जागी मला ठेवतात, म्हणजे त्यांच्या भजनात मी ओढून आणल्यासारखा येतो;' असा अर्थ.

मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद ॥

हे जे भगवन्ताचे सुप्रसिद्ध वचन आहे त्याचा संस्कार ज्ञानदेवांच्या या उद्गारात दिसतो. नाट म्हणजे केवळ ठिकाण नव्हे. भक्तांच्या भजननृत्याचा गदारोळ जिथे चालला आहे असे ठिकाण, इतका ध्वन्यर्थ त्यात समाविष्ट आहे. वर उतरलेली १०·१०९ ही ओवी **रा** प्रतीत नाही. म्हणजे राजवाडी ज्ञानदेवीमध्ये नाट हा शब्द मुळीच नाही.

केवळ नृत्य अशा अर्थी नाट शब्द पुढील स्थली आलेला दिसतो.

मग रूप करिताय खेचरू। नाटें चतुर्विधें॥
—नरेन्द्र, रुक्मिणीस्वयंवर ३१९

'चार प्रकारच्या नृत्याने युक्त असा सोंगांचा खेळ करून दाखविला.' नाट शब्द स्त्रीलिंगी आढळतो आणि स्त्रीलिंगात त्याचे नाटी असेही रूप आढळते.

अनेगीं संकटीं : देवो दपदिये करीति घरटी
तरि तीयेचेया प्राणाची नाटि : कवणा दीधली ?
भास्कर, उद्धवगीता ११९

जेवीं चकमकेची आगी। जाळूं न शके नाटेलागी।
तेवीं ब्रह्मप्राप्ति प्रथमरंगीं। प्रपंचसंगीं विनाशे॥
*एकनाथी भागवत* २८·३६८

इथे नाट किंवा नाटी याचे अर्थ निराळे दिसतात. तो विषय इथे प्रस्तुत नसल्यामुळे त्याचा विचार करीत नाही.

गीता १२-७ चे ज्ञानदेवांचे व्याख्यान या ओवीबरोबर संपले. ही पाठचर्चा यानंतर एका लेखात आटपून सध्या विराम घ्यावा असे मनात आहे.

• • •

# श्रीशिवराजविरचित ' आत्मरूपचिंतन '

● श्री. ग. वा. तगारे, ●

' [ अप्रकाशित ग्रंथांचे संशोधन करीत असता, येथील सुप्रसिद्ध संत व करवीरचे तत्कालीन छत्रपती २ रे शिवाजी ( १७६२–१८१२ ) यांचे आध्यात्मिक गुरु श्रीसिद्धेश्वरमहाराज पंडित यांच्या घराण्यात, परंपरेने स्वतः छत्रपती २ रे शिवाजी यांनी लिहून अर्पण केले गेले असे मानण्यात येणारे ' आत्मरूपचिंतन ' हे आध्यात्मिक प्रकरण उपलब्ध झाले. सकृद्दर्शनी पुराव्यावरून हे ओवी-बद्ध प्रकरण खुद्द छत्रपतींनी रचले गेले आहे असे आढळल्यामुळे या ऐतिहासिक महत्त्वाच्या हस्तलिखित ग्रंथाची ओळख आपल्या वाचकांस करून देत आहे. माझ्या समोरची पोथी मूळ (autograph) नसून त्याची नक्कल असावी असे जरी माझे मत असले तरी त्यामुळे या प्रकरणाचे ऐतिहासिक महत्त्व कमी होत नाही. आपल्या वाचकांपैकी कोणाकडे या पोथीची प्रत उपलब्ध असल्यास मला कळवावे ही वाचकवर्गाला विनंती. प्रस्तुत लेखातील अवतरणांचे शुद्धलेखन मूळ पोथीप्रमाणेच ठेवले आहे. —लेखक ]

**प्रास्ताविक :**

करवीर छत्रपती २रे शिवाजीमहाराज (१७६२–१८१२) यानी पेशवे, कंपनीसरकार, निपाणीकर देसाई इ. परकीय व स्वकीय शत्रूंविरुद्ध ५० वर्षे झगडा देऊन करवीर राज्याचे स्वातंत्र्य अबाधित राखले हे इतिहास-प्रसिद्ध आहे. वा. प्र. मोडक, मा. वि. गुजर, स. मा. गर्गे इ. इतिहासकारांनी त्यांचे राजकीय व सार्वजनिक जीवन तपशीलवार दिले आहे. पण हे छत्रपती संत कवी होते व यांचा आध्यात्मिक अधिकार मोठा होता याची दखल इतिहासाने घेतली नाही. अपवाद म्हणजे श्रीनिवास पंडितांच्या ' सिद्धेश्वर-महाराजांची बखर ' या एका काळी शिळाप्रेसवर छापल्या गेलेल्या पुस्तकात, या छत्रपतींनी श्रीसिद्धेश्वरमहाराजांना आध्यात्मिक मार्गदर्शक म्हणून स्वीकारले, राजकारभारातून सवड मिळताच भेटता यावे म्हणून स्वतःच्या राजवाड्यातील भाग श्रीसिद्धेश्वर-महाराजांना राहण्यासाठी दिला, व या छत्रपतींच्या स्नानाच्या तीर्थाने कुष्ठरोगी बरे होत असा उल्लेख आहे. श्रीसिद्धेश्वरमहाराज हे ज्ञानेश्वर - परंपरेतील विख्यात सत्पुरुष. यांच्या सहवासामुळे आणि सद्ग्रंथश्रवण व चिंतनामुळे छत्रपतींना आध्यात्मिक ओवीरचना करण्याची स्फूर्ती झाली असल्यास नवल नाही. अशाच स्फूर्तीमुळे ' आत्मरूपचिंतन ' या १०८ ओव्यांच्या आध्यात्मिक प्रकरणाचे लेखन या छत्रपतींच्या हातून झाले असावे.

**पोथीचे वर्णन**

प्रस्तुत प्रकरणाची पृष्ठे २८ असून प्रत्येक पृष्ठाची लांबी १५ सें. मी. व रुंदी १०·५ सें. मी. आहे. प्रत्येक पानात ९ ओळी व प्रत्येक ओळीत साधारणपणे ८ अक्षरे आहेत कागद युरोपियन वॉटरमार्क नसलेला, देशी व जाड असून त्यावर प्रत्येक पानाच्या उजव्या व डाव्या बाजूस प्रत्येकी २·५ सें. मी. समास व मजकुराच्या वरच्या बाजूस २ सें. मी. व खालच्या बाजूस ३ सें. मी. समास सोडले आहेत. पोथी काळ्याभोर शाईने सुंदर हस्ताक्षरात देव-नागरी लिपीत स्वच्छ व स्पष्ट लिहिली आहे.

पोथीची सुरवात पुढील मंगलाचरणाने केलेली आहे. श्रीगणेशायनमः ।

नमन करिता श्रीविघ्नहरा । ग्रंथ पाविजी पैलपारा ।
येथ हाचि सर्वा निर्धारा । वेदादिकी बोलिले ॥ १ ॥
आदिशक्ती श्रीभवानी । अंबामाता वरदायिनी ।
तुळजा आदिपीठस्थायिनी । नमन माझे तयेते ॥ २ ॥
श्रीसिद्धेश्वरा गुरुनाथा । अनाथ दीनाचिया त्राता ।
तयाचरणी ठेविला माथा । भक्तिभावे करूनि ॥ ३ ॥
शुद्धभावे करून । साधुसज्जना नमन ।
**आत्मस्वरूपचिंतन** । पूर्णतेसि पाववी ॥ ४ ॥

' आत्मरूपचिंतन ' हे ग्रंथनाम स्पष्ट सांगितल्यावर त्या विषयाचा उपोद्घात मोजक्या पण स्पष्ट शब्दांत केला आहे. प्रस्तुन विषयाविषयी ग्रंथकार म्हणतात :

आत्मचिंतन पाहु जाता । तोच वाच होय तत्त्वता ।
त्याचा न कळे ही प्रांता । आदि-मध्य निगमासी ॥५॥

अनुक्रमणिका

आपले आपण। पहावया होतसे विस्मरण।
कैसे करावें चिंतन। अगम्य वस्तुचे ॥ ६ ॥
जेथे वस्तुचाचि नाही ठाव। तेथे ज्ञानाचा कोठील वाव॥
जाला नाहीं रूप नाव। ते कैशेनि जाणावे ॥ ७ ॥
जे मनासि अगोचर। वाचेसही बहुदूर।
त्याचा इंद्रियाही पार। कैसेनि लाहिजे ॥८॥
आत्मा आत्मरूप व्हावा। तेव्हा आत्मरूप जाणावा।
जाणणे-नेणणेचा होतो गोवा। तेव्हा कैचे जाणणे॥९॥

आणि ज्ञानेश्वरांची आठवण होण्यासारखी दृष्टांतांची सर पडते :

समुद्रातूनि लवण। निगता होय भिन (भिन्न)।
पण जळी मिळता जळपण। जळचि रूप ॥१०॥
कापुरा अग्नि लागिला। तो अग्निरूपाचि जाला।
शेष नाही उरला। दोहींचाहीं ॥११॥
समीराचेनि योगे। उदकीं होता तरंग।
त्याचा होता भंग। जळ चि ते ( ते ) ॥१२॥
इ. [ पृष्ठे १ ते ३ ]

शेवटच्या पृष्ठावर ( पृ. २७ ) पुढील समारोपात्मक ओव्या आहेत :

आत्मचिंतनाची जयासी गोडी। तेणे करावी या ग्रंथाची आवडी।
तेणे पावे पैलथडी। भवसागराचिया ॥१०७॥
एवं आत्मचिंतन निरूपण। जीवशीव अभिन्न।
[ -पण। ]
केले सद्गुरुचरणी अर्पण। शिवराजे यथामति ॥१०८॥

इति श्री **राजाधिराज** [ ही पाच अक्षरे खोडलेली आहेत. पाद्दा. ] **शिवराज**-विरचितं आत्मचिंतन-निरूपणं समाप्तम्।

श्रीसद्गुरुदेवतार्पणमस्तु। छ छ छ छ

### ग्रंथकर्तृत्व

या अध्यात्मिक प्रकरणाचे हस्तलिखित मला श्रीसिद्धेश्वरमहाराज पंडित यांच्या घराण्यात मिळाले. ते देताना श्रीसिद्धेश्वरमहाराजांचे सध्याचे वंशज ( व माझे स्नेही ) श्रीयशवंतराव महाराजपंडित यांनी प्रस्तुत ग्रंथ छत्रपती श्रीशिवाजी महाराज ( दुसरे ) यानी रचून त्याची एक प्रत त्यांचे सद्गुरु श्री सिद्धेश्वर महाराज याना अर्पण केली अशी पिढ्यान् पिढ्या त्यांचे घराण्यात या पोथीबद्दलची परंपरागत समजूत सांगितली.

सदर परंपरागत माहिती खरी असावी हे पुढील कारणावरून वाटते :

( १ ) या अध्यात्मिक प्रकरणाचे शेवटी ग्रंथकार आपले नाव ' शिवराज ' असल्याचे नमूद करतो.

( २ ) ग्रंथाचे पुष्पिकेत ग्रंथकार शिवराजाना ' राजाधिराज ' अशी पदवी दिलेली आहे. सद्गुरुना अर्पण केलल्या सदर प्रतीतील पुष्पिकेत ' राजाधिराज ' या ५ अक्षरावर जो काट मारला आहे त्यामध्ये छत्रपती शिवाजी महाराजांची आपल्या सद्गुरुपुढे प्रगट झालेली विलीन वृत्ती दिसते.

( ३ ) मंगलाचरणामध्ये गणपति-स्मरणानंतर तावडतोब छत्रपतींची कुलदेवता श्रीतुळजाभवानी हिला वंदन आहे.

( ४ ) त्याचे पाठोपाठ छत्रपती शिवाजीराजांनी आपले सद्गुरु सिद्धेश्वरमहाराज पंडित याना नमन केले आहे. मंगलाचरणाचे तपशील व छत्रपती शिवाजीमहाराजांचे कुलदैवत व सद्गुरु हे तपशील तंतोतंत जमतात.

( ५ ) ग्रंथाची भाषा व्युत्पन्न पांडित्य किंवा कसलेले लेखनपटुत्व न दाखवता संतवाङ्मय वाचून स्वान्तःसुखाय लिहिणाऱ्या संतवाङ्मयाच्या अभ्यासकाचे हौशीलेखन दाखवते.

प्रस्तुत ग्रंथ करवीर छत्रपती २ रे शिवाजी यांचा नव्हे असे सिद्ध होईपर्यंत सिद्धेश्वर महाराज पंडितांच्या-घराण्यातील एतद्विषयक परंपरा खरी मानणे भाग आहे.

### ग्रंथस्वरूप

ग्रंथकार प्रारंभी मंगलाचरणात आपला ' आत्मस्वरूप-चिंतन ' हा ग्रंथ ( श्लेषार्थ : ' माझे अध्यात्मिक स्वरूप-चिंतन ' ) पूर्णतेला जावो ही प्रार्थना करून ( ओव्या १-४ ), ग्रंथातील विषयाचा उपन्यास करतात. [ येथून पुढे कंसातील व कंसाबाहेरील आकडे या पोथीतील ओवी क्रमांचे आहेत ]

आत्मा ही अगम्य वस्तु असल्यामुळे 'तो मनासी अगोचर व वाचेसही बहुदूर' आहे (८) आत्मा एक असला तरी बिंब प्रतिबिंब न्यायाने तो 'अनेक झाला बहुरूप' (१४-१५)

आत्मा जरी एकची म्हणावा। तरी जगदाकार असे स्वभावा॥
येथे कैसा अनुमानावा। येकी येकपण॥२२॥

आत्मा 'शाश्वत व पुराण' असून, ध्याता मात्र 'जन्ममरणाधीन' असल्यामुळे याने आत्मचिंतन कसे करावे? (२६) ही अडचण आहे. मनाने चिंतन करावे तर अरूप असणारा आत्मा चिंतनातीत होतो (२७) बुद्धीने आकलन करावे तर बोध्य–बोधकतेत भ्रांती येऊन त्यामुळे चिंतन उरत नाही. (२९) लाकडाला अग्नी लागल्यावर ते अग्निरूप होते, त्याचे काष्ठपण उरत नाही तसे

चित्त चिंतनी लावावे। तव चित्तचि चिंते पावे।
चित्ताचाच होतसे गोव। तेथे चिंतन कैंचे॥३५॥

वरील प्रश्नाची चर्चा करून यावर ज्ञानोत्तर भक्ती केल्यास 'करतलामलका परी मुक्ती। होती तयासी' (५३). म्हणून

येथे भक्तीच मुख्य प्रधान। तिण (तिने) मुक्ति हाती दीधली जाण।
तेणे होय समाधान। स्वमुखाच॥५५॥

असा ते (ग्रंथकार) निर्णय देतात.

या परमार्थ मार्गात 'गुरूसेवेवीण काही। प्राप्तीचा लेश कदापि नाही (५६)' कारण

आत्मचिंतन करू जाता। सद्गुरूचे पाय तेचि तत्त्वता।
सद्गुरुवीण ठाव रिता। कोठेचि नाही॥५८॥
सद्गुरू तोचि आत्मा जाण। तेथे नाही भिंनाभिंन।
येक सद्गुरूवाचूनि आन। रिता ठावचि नाहीं॥६०॥

ध्येय, ध्याता व ध्यान ही त्रिपुटी सद्गुरूना अर्पण करणे हेच खरे आत्मचिंतन आहे. (६४)

सद्गुरूमूर्तिचे ध्यान। तेचि जाणावे आत्मचिंतन।
तेणेचि ठसावे मनीश्रवण। सहज मनन मग घडे॥७२॥
सद्गुरूचे नामस्मरण। तेचि मानी नाम संकीर्तन।
त्याचे तुटे भवबंधन। न लग साधन आणिका॥७३॥

सद्गुरूप्रणीत परमार्थ मार्गाचे महत्त्व विशद करून ग्रंथकार आपला निर्णय देतात:

भवबंधना पासूनि मुक्तता। सद्गुरूवाचूनि न होय तत्त्वता।
अन्यमार्ग आचरिता। दुःखची पावे॥१००॥

या ग्रंथात सद्गुरू हा शब्द मानव देहधारी सिद्धेश्वर-महाराजांच्या स्थूल शरीराला उद्देशून नसून ते ज्या सत्तेचे-परब्रह्माचे प्रतीक आहेत त्या 'सत्पदार्थाला' उद्देशून आहे.

'सत्पदार्थ अद्वया। शुद्ध परब्रह्म जाणावा।
तोचि सद्गुरू मानावा। आत्मचिंतन करणार्नी॥१०५॥

या ग्रंथाला अधिकार वाचक

'आत्मचिंतनाची जयास गोडी। तेणे करावी या ग्रंथाची आवडी' (१०७) असे सांगून, ग्रंथकारानी

एवं आत्मचिंतन निरूपण। जीवशीव अभिन्न।
केले सद्गुरुचरणी अर्पण। शिवराचे यथामति॥१०८॥

असा समारोप केलेला आहे.

प्रस्तुत ग्रंथात गुरुभक्तीचे महत्त्व सांगितले असले तरी ती गुरुभक्ती आंधळी नाही. छत्रपती २ ऱ्या शिवाजी महाराजांनी श्रीसिद्धेश्वर महाराजांचा अनुग्रह घेऊन त्यांच्या योगक्षेमाची व्यवस्था केली असली तरी ते त्यांच्या मानवीदेहापलिकडील स्वरूप पाहतात. सद्गुरू हे परब्रह्माचे प्रतीक–स्वरूप–ही कल्पना केवळ याच अध्यात्मिक प्रकरणात नसून, शिवराजानी 'आत्मसुखोल्लास' नावाच्या दुसऱ्या (अद्याप अप्रकाशित असलेल्या) चार-अध्यायी प्रकरणात देहचतुष्टयाचे वर्णन झाल्यावर स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण या चार देहात भिन्न भिन्न पातळीवर सद्गुरू उपासना कशी करावी हे सांगताना, सद्गुरू म्हणून सिद्धेश्वरमहाराजांचा नामनिर्देश केला असला तरी सद्गुरुस्वरूपाचे जे वर्णन आहे ते परब्रह्माचे प्रतीक असल्यासारखे आहे.

१८ व्या शतकाचे उत्तरार्धातील धामधुमीचे काळात ५० वर्षे प्राणपणाने स्वराज्याचे रक्षण करणाऱ्या या छत्रपतींचा किरकोळ पत्रव्यवहारही प्रसिद्ध होतो तर त्यांची अध्यात्मिक बाजू प्रकट करणारा हा ऐतिहासिक पुरावा उपेक्षित राहू नये या अपेक्षेने हा परिचय लिहिला आहे. या आध्यात्मिक प्रकरणाची प्रत इतर कोणाकडे उपलब्ध असल्यास मला कृपया कळवावे ही विनंती.

प्रस्तुत आध्यात्मिक प्रकरणाची एकुलती एक असणारी ही प्रत मला अभ्यासासाठी दिल्याबद्दल माझे स्नेही श्री. यशवंतराव महाराज पंडित यांचा मी आभारी आहे.

• • •

# शाह मिरांजी आणि त्यांची भाषा

● देवीसिंग व्यंकटसिंग चौहान ●

शकाच्या पंधराव्या शतकाच्या आरम्भकाली बीदर येथून राज्य चालविणारी बहामनी सत्ता, महमूद गावान या पराक्रमी व मुत्सद्दी मुख्य प्रधानाच्या निष्कारण व निर्घृण वधानंतर ( शक १३९३ ) खिळखिळी झाली. ज्या परदेशी व दकनी मुसलमानांच्या अंत:कलहामुळे गावान याचा वध करण्यात आला ती परिस्थिती मात्र सुधारण्याऐवजीं चिघळत गेली. अहमदनगराच्या भैरी निजामशहाने प्रथम बंडाचे निशान उभारले व तो बहामनी केंद्रीय सत्तेपासून स्वतंत्र होऊन राज्य करू लागला परदेशी तुर्की वंशातील इराणी यूसुफ आदिलखान या मातवर सरदाराने बीदरशी नाते तोडून, आपली राजधानी विजापूर येथे शके १४१२ पासून स्थापन केली, व तो अलगपणे राज्य करू लागला. जरी तो स्वतंत्रपणे वागू लागला तरी त्याने बरीदशाह या आक्रमकाच्या विरोधात बहामनी राजाशी सलोख्याचे संबंध कायम ठेविले. स्वतंत्रपणे वागत असला तरी त्याने आपल्या नावावरोवर शाह ही पदवी मात्र धारण केली नाही. तो यूसुफखान असेच म्हणवून घेई.

फिरिश्ता ( मुहम्मद कासिम हिंदूशाह ) या इतिहास लेखकाने असे सांगितले आहे. की यूसुफखानाने, आपले स्वतंत्र राज्य विजापूर येथे स्थापन केल्यानंतर, पर्वताच्या किल्ल्यात स्वतंत्रपणे राज्य चालविणाऱ्या मुकुंदराव नामी मराठा राजावर स्वारी करून त्याचा पराभव केला. मुकुंदराव आणि त्याचा भाऊ पूर्वी बहामनी राज्यात सरदारकी करीत. मुकुंदराव आणि त्याचे सर्व कुटुंब यूसुफखानाच्या हाती सापडले. यूसुफखानाने मुकुंदरावाच्या बहिणीवरोवर लग्न केले. तिच्यापासून झालेल्या संततीनेच विजापूरची आदिलशाही पुढे चालविली विजापूरला अशा तऱ्हेने नवीन स्थिर राज्य स्थापन झाल्यावर हळूहळू येथे हिंदी भाषेचा विकास होऊ लागला. जे मुसलमान राज्यकर्ते दक्षिणेत– महाराष्ट्र, कर्नाटक , आंध्र इत्यादी प्रदेशातून राज्य चालवीत होते, त्यांच्यापैकी काही सुसंस्कृत लोकांना फार्सी भाषा येत असली तरी बहुजन मुसलमान केवळ खडीबोली ही दिल्ली-डेहराडून या प्रदेशातील बोलीच बोलत असत. त्यांच्या व्यवहारांसाठी दक्षिणेतील मराठी, कानडी, तेलगू आदि भाषा उपयोगी पडत नव्हत्या. हे मुसलमान खडीबोली ही बोलीच वापरीत. या बोलीत बहामनी काळात साहित्य-निर्मिती होण्यासही आरम्भ झालेला होता. गुलबर्गा व बीदर येथे निर्माण झालेल्या कांही हिंदी कृति आज उपलब्धही आहेत. याच खडीबोलीला दक्षिणेतील मुसलमानांनी आरम्भी हिंदी असे नांव दिले. परंतु नंतर त्यांनी त्या भाषेला, ती दक्षिणेत वाढत होती म्हणून, दक्षिणी अथवा दक्खिनी, दक्किनी, दकनी असे नाव दिले. शकाच्या गेल्या शतकाच्या आरम्भी याच याच दक्खिनी हिंदीला मुसलमानांनी उर्दू असे नांव दिले. बहामनी सत्तेनंतर तिच्या जागी स्थापन झालेल्या विजापूर येथील आदिलशाही आणि गोवळकोंडा येथील कुतुबशाही आमदानीत या दक्खिनी हिंदीचा खूप विकास झाला. तिला दोन्ही ठिकाणी राजाश्रय मिळाला. अहमदनगरची निजामशाही शक १५५८ मध्ये नष्ट झाली. गुजराथमधील स्वतंत्र मुसलमानी सत्ताही मोगलांच्या वाढत्या केंद्रीय सत्तेला बळी पडली. म्हणून नगर आणि अहमदाबाद येथील मुसलमान साहित्यिक विजापूर येथे आश्रयार्थ येऊन राहिले. म्हणून विजापूर येथे या दक्खिनी हिंदीच्या विकासाला विशेष गति मिळाली. या आदिलशाही घराण्यात पहिल्या ९० वर्षात चार बादशहांनी ( वस्तुत: ५ ) राज्य केले. प्रथम इब्राहीम आदिलशाहाचा राज्यकाल शक १४५७ पासून १४८० पर्यंत होता. हा या घराण्यातील चौथा बादशाह. याच नरेशाच्या राज्यकालात शाह मीरांजी हा सूफी साधु धर्मप्रचाराचे व दक्खिनी हिंदीच्या साहित्यनिर्मितीचे कार्य करीत होता. शाह मीरांजी याचा देहान्त हिजरी ९०२ मध्ये ( शक १४१९ ) झाला असे स्वर्गीय डॉ. अब्दुलहक याने प्रतिपादिले होते. परंतु हा मृत्युकाल चुकीचा आहे असा नवीन संशोधनाचा निर्वाळा आहे. अलीगढ तारीखे–अदबे–उर्दू या उर्दू साहित्येतिहास ग्रंथात शाह मीरांजी याचा मृत्युकाल

शक १४८५ ( हिजरी ९७० ) असा दिलेला आहे. हाच काल योग्य आहे असे ऐतिहासिक पुराव्यांवरून देखील दिसून येते. कारण शक १४१९ ( हिजरी ९०२ ) मध्ये आदिलशाही राज्याने नुकतेच मूळ धरले होते. त्या प्राथमिक अवस्थेत मीरांजीसारखा कवि निर्माण होणे कठीण होते. दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी की या कवीची समाधि विजापूर नगराच्या शाहपूर नामी उपनगरात आहे. या शाहपूरची नवीन उभारणी प्रथम आदिलशाह याने केलेली आहे. हा अली आदिलशाह शक १४८० त गादीवर आलेला होता. तिसरी अत्यंत महत्त्वाची गोष्ट अशी की पहिल्या मृत्युतिथीच्या काळात दक्खिनी हिंदीवर मराठी भाषेचे विशेष संस्कार विजापूर येथील नवीन वातावरणामुळे होणे अत्यंत दुरापास्त होते. उलट पक्षी शाह मीरांजी यांच्या भाषेत मराठी भाषेचा फार मोठा प्रभाव दिसून येतो. हे आपणांस पुढे सविस्तरपणें पहावयाचे आहे. तूर्त एवढे सांगून ठेवणे पुरेसे आहे की शाह मीरांजी यांच्या भाषेच्या अंतर्गत पुराव्यांवरून देखील पहिली मृत्युतिथि अस्वीकार्य असून त्यांचा देहान्त शक १४८५ मध्येच होणे सुसंगत आहे. म्हणजे शाह मीरांजी हा एकनाथ महाराजांचा समकालीन होता; हे दिसून येते.

### बहुजन समाजातील कवि

शाह मीराजी हा सूफी १२ वर्षे मदीना येथे जाऊन राहिला होता असे डॉ. अब्दुलहक यानी आवर्जून पुनः पुनः सांगितले आहे. आपल्या " उर्दू " या त्रैमासिकातील या कवीवरील लेखात तो मदीना येथे १२ वर्षे राहिला, असे ते सांगतात ( पाहा कदीम उर्दू पृ. ६ ) तसेच, त्यानी उर्दूच्या विकासात सूफींचे कार्य या उर्दू प्रबंधात तर आणखी पुढें मजल मारली आहे. त्यांनी या कवीला केवळ अरबीच बनविले आहे. त्याला आधार त्यानी कोणाची तरी सूफी कवीविषयीची टिपणे, चरित्रे याचा केलेला आहे. त्यांनी म्हटले आहे, " आप मक्कामें पैदा हुए और कुछ दिनों बाद हिंदुस्तान आए " ( पृ. ४९ ) अनैतिहासिक व कल्पनारम्य धार्मिक गप्पांवर विश्वास ठेवून, मुहम्मद पैगंबराने त्यांना ( मीरांजी ) भारतात जाण्याचा आदेश दिला असेही डॉ. अब्दुलहक यांनी सांगावयास मागेपुढे पाहिले नाही ( पृ. ५० ). त्याच्या भाषेत अरबी वा फार्सी शब्द फारच कमी प्रमाणात असून, मराठी शब्द, वाक्प्रचार व भारतीय भक्तिपरम्परा यांचे सुंदर दर्शन होते. दक्खिनी हिंदीत भारतीय शब्द, कविसंकेत आलेले अलीकडील मुसलमानांना समजत नाहीत व वापरलेले मनाला पसंतही पडत नाहीत. म्हणून वरील प्रकारच्या कंड्या ठिकठिकाणी पिकविलेल्या दिसून येतात. हे असो.

मीरांजी याचे हे नांव अरबी परंपरेतले मुळीच नाही. अमीर म्हणजे सरदार या अरबी शब्दाचे मीरान् हे षष्ठीचे रूप आहे. मीरां हा शब्द खरा मीरान् असा असून त्याला आधुनिक आर्य भारतीय भाषातील जी हा आदरवाचक प्रत्यय लागलेला आहे. जी हा प्रत्यय बहुधा सर्वच भारतीय भाषा व बोली यामध्ये आज दिसत असला तरी मराठीतील या शब्दाची परंपरा फार जुनी आहे. मराठीत जी हा प्रत्यय सर्व प्रथम शक ११२९च्या पाटणच्या मराठी शिलालेखात " धामोजी " शब्दात वापरलेला आहे ( पाहा शं. गो. तुळपुळे, प्राचीन मराठी कोरीव लेख क्रमांक २१, पृ ११३. ) बाबाजी, मालोजी, शिवाजी इत्यादी महाराष्ट्रीय ऐतिहासिक नावातील जी प्रत्ययाची परंपरा सर्वपरिचित आहे. दक्खिनी हिंदीचा विकास महाराष्ट्रात किंवा महाराष्ट्राच्या परिसरात, ५०-७५ मैलांच्या आंत असलेल्या कानडी प्रदेशातच आरंभी झाला. त्यामुळे या जी प्रत्ययाने दक्खिनी हिंदीत देखील बऱ्याच प्रारंभकाली प्रवेश केला. मुसलमान कवि व सूफी यांनी ही ' जी ' प्रत्यययुक्त नांवे धारण केली. हा सांस्कृतिक प्रभाव मुसलमानावर सर्वत्र दिसून येतो ' पिरतनामा ' या छोट्याशा काव्याचा लेखक फीरोज बीदरी याने आपल्या काव्यात ' मख्दूमजी ' या सूफीचा अनेक वेळा उल्लेख केलेला आहे. हा फीरोज मीरांजीचा समकालीन असून त्याने आपला पिरत-नामा शक १४८८ च्या ( हिजरी ९७३ ) अगोदर लिहिलेला होता. पिरतनाम्याची संहिता चर्चेसह राष्ट्रवाणी पुणे, या हिंदी मासिकात आम्ही फाल्गुन १८८८ आणि चैत्र १८८९ च्या अंकात प्रस्तुत केली आहे.

शाह मीरांजी यांची तीन छोटी छोटी भक्तिपर काव्ये आणि एक गद्यात वेदान्तपर प्रश्नोत्तररूपी चोपडे आहे. परंतु या लिखाणाला दक्खिनी हिंदीतील आरंभीचे साहित्य म्हणून बरेच महत्त्व आहे. मीरांजी यांचेच आदिलशाही राज्यातून लिहिले गेलेले प्रथम साहित्य होय. यांच्या अगोदर शाह अश्रफ या जालना जि. औरंगाबाद येथे राहाणाऱ्या एका सूफी साधूने

नौ-सर-हार (नऊ सरांचा हार) असे एक वरेच दीर्घ काव्य शक १४२६ (हिंजरी ९०९) मध्ये लिहिलेले उपलब्ध, पण अप्रकाशित आहे. पण हा अश्रफ अहमदनगरच्या निजामशाहीत राहाणारा होता. त्याला आदिलशाही राज्यातील समजणे कठीण आहे या दृष्टीने आदिलशाहांच्या राज्यात, ज्याची कृति उपलब्ध आहे असा लेखक म्हणून शाह मीरांजीला वरेच महत्त्व आहे. शिवाय त्याच्या लिखाणांवरून मुसलमान सूफींच्या भक्तिविषयक काय काय कल्पना होत्या हेही आपणाला कळते. त्याच्या भाषेवरून तत्कालीन दक्खिनी हिंदीला मराठीच्या ऋणाचीही कल्पना करता येण्यासारखी आहे.

### मीरांजी याची भाषा हिंदी

शाह हे पद सूफी पंथाच्या पूज्य व्यक्तीस लावण्यात येते. मीरांजी यांनी शहादतुल हकीकत नांवाचे एक काव्य ५६३ द्विपंक्तीचे लिहिलेले आहे. या नावाचा अर्थ आहे सत्यदर्शन किंवा सत्याचा साक्षीपुरावा. ईश्वरप्राप्तीचा मार्ग असे ही त्यास म्हणता येईल. या काव्यांचे वृत्त केवळ भारतीय अर्थात हिंदी आहे असे डॉ. हक यांनी दोन ठिकाणी सांगितलेले आहे. शाह मीरांजींनी आपल्या पीर अथवा गुरूचे नाव कमाल असे काव्यात दिले आहे. डॉ. हक त्याला शाह कमाल वियावानी असे म्हणतात. मीराजीच्या ओळी अशा.

इस कमालियत[1] के संग इस खान्वादे[2] के अंग
उन कमाए अपना हाल[3] तो होए पीर[4] कमाल
कुच थे नसीव मेरे पग देखे तो उन केरे[5]

(अर्थ – १ प्रावीण्य, २ घराणे, वंश, ३ अवस्था, ४ गुरु, ५ अवधी प्रत्यय चा, ची, चे).

शाह मीरांजी आपल्या भाषेला हिंदी म्हणून उल्लेखितात.

हैं अरवी वोल केरे[1] अउर[2] फारसी वहुतेरे[3]
यो हिंदी वोलूं सब उस अर्तों[4] के सवव[5]
यो भाका[6] भिलसू[7] वोली पन मन का भावत[8] खोली
यों गुरुमुक पंद पाया तो ऐसे वोल चलाया
जे कोई अच्छे खासे[10] उस वयान[11] केरे[1] प्यासे
वे अरवी वोल न जाने ना फारसी पछाने
यो उन को वचन हेत[12] सन्त वूझें[13] रीत
यो देखत हिंदी वोल पन मानी[14] है निपतोल[15]

(अर्थ – १ चा, ची, चे, २ आणि. संस्कृत अपर पासून, ३ वहुतेक, अनेक. ४ अर्थ, ५ कारण, ६ भाषा, ७ ओवडधोवड, ८ भाव, ९ उपदेश, १० विशेष, ११ व्याख्यान, आख्यान, वर्णन. १२ हेतु, प्रयोजन, १३ समजणे, जाणणे, सं. वुध, १४ अरवी शब्द – अर्थ, १५ अतुलनीय, निरुपम)

आपण या ओवडधोवड भाषेचा उपयोग केला तरी भाव समजून घेण्यास ती अत्यंत उपयुक्त आहे, असा मीरांजीचा युक्तिवाद आहे. मराठी वाचकांना हा युक्तिवाद सर्वस्वी परिचित असाच आहे. मुकुंदराज, फादर स्टिफन्स, ज्ञानेश्वर इत्यादींच्या एतद्विषयक उक्ती सर्वांसमोर आहेतच. त्यांचा येथे पुनरुच्चार अनावश्यक होय. मीरांजी पुढे म्हणतात.

कडवे पन[1] सूरस फल पाके[2] जूं फनस
ना देखत वूरा लेखो ले मगज[3] चाक[4] देखो
जे मगज[3] मीठा लागे तो क्यों मन इस थे[5] भागे[6]
त्यों[7] इस में अरत[8] नीच[9] सव कुरान केरे वीच[10]
वो मगज मानी[11] लेवो सव छाल छांड[12] देवो
या[13] वो देखे झारा[14] वो माटी[15] का पसारा[16]
ना माटी उस को हान[17] वो राखे समेट[18] आन[19]
यो छान[20] सुन्ना[21] लेवे अउर[22] वाजे[23] टाक[24] देवे
त्यौं[25] भाका माटी जानों जर[26] मानी दिल में आनों[19]
तो जिस को भावे जोड[27] ना जासी[28] यो गुन छोड[29]
है करोडन[30] केरा हीरा घुड[31] ऊपर पडिया[32] नीरा[3]
कुइ सुजान[34] भागों[35] पावे तो क्यों ना लेह[36] उचावे
घुड भाका छोड दीजे चुन मानी मानिक लीजे

(अर्थ–१ पण, परंतु, २ पिकलेले, पक्व झालेले, ३ फळातील मांसल भाग, गाभा, ४ चाखणे, ५ राजस्थानी, गुजरातीतील पंचमीचा प्रत्यय, अर्थ-पासून, ६ भागणे पळणे, ७ त्या प्रमाणे, ८ अर्थ, ९ नित्य, नेहमी, १० मध्ये, ११ साल, सालपट १२ सांड, टाकून देणे, १३ संस्कृत 'वा' पासून फार्सी शब्द-अथवा, १४ झाडा तपासणे, १५ मृद् मृत्तिका, १६ व्याप, सं. प्रसृ, १७ हानि, तोटा, १८ सं. समेत्य, एकत्र येणे, १९ आणणे, २० गाळणे, तपासणे, २१ सुवर्ण, सोने २२ आणि २३ अरवी शब्द–काही २४ टाकणे, सं. त्यक्त, २५ त्याप्रमाणे, २६ फा. सोने, सं. हिरण्य शब्दापासून, २७ संग्रह, जोडणे, २८ जाएगा, जाईल (भविष्यकालाचा सी प्रत्यय), २९ सोडणे, टाकणे ३० कोटी मोलाचा, षष्ठी ३१ हिंदी शब्द, अर्थ - उकिरडा, ३२ सं. पतित, पडलेला. ३३

केवळ, शुद्ध, ३४ जाणता, ३५ भाग्याने, (अवधीतील हूं, ऊं प्रत्यय), ३६ घेणे)

आपल्या या काव्याच्या नावाविषयी मीरांजी म्हणतात :—

इस नाम है तहकीक[1] सुन शाहांदतुत्तहकीक[2]
इस का मगज[3] दरिया[4] जे देख नित रहे भरिंया[5]
सब हीरों केरी[6] खान[7] ना मोत्यों केरी वान[8]
जे गवास[9] बोध सेवे तो सालिम[10] सोध[11] लेवे
जे होवेगा मच्छरा क्या जानेगा विचारा

(अर्थ– १ सत्य, खरोखर, २ सत्यदर्शन, ३ गाभा, ४ समुद्र, ५ भरलेला, सं. भृत पासून ६ अवधी प्रत्यय– चा, ची, चे. ७ खाणी, ८ दुर्भिक्ष, मराठी वाण, ९ समुद्रात बुडून मोती काढणारा (अरबी शब्द) १० पूर्ण, ११तपास, शोधणे, १२ मासेमारू, मासे धरणारा)

वरील पंक्तीत नीच म्हणजे नित्य, झारा-झाडा म्हणजे तपासणी, पसारा–व्याप, टाक–टाकणे पासून, वान म्हणजे वाण, दुर्भिक्ष आणि सोध म्हणजे तपास हे केवळ मराठी शब्द आहेत. हे जरी तद्‌भव असले तरी त्यांची बनावट व रूप केवळ मराठी होय.

## खुशनामा

शाह मीरांजी यांचे दुसरे काव्य खुशनामा नावाचे आहे. येथे खुश हे एका निष्काम, विरक्त व ईशभक्त अशा तरुण मुलीचे नाव आहे. खुश म्हणजे सन्तुष्ट, आनंदी हे सर्वांना ठाऊकच आहे. हा फार्सी शब्द आहे. नामह हाही फार्सी शब्द असून सं. नामन पासून व्युत्पन्न असून, त्याचा अर्थ ग्रंथ असा आहे. खुशनामा म्हणजे खुश या व्यक्तीविषयी ग्रंथ– असा आहे. हे खुशनामा काव्य केव्हा लिहिले गेले हे ठाऊक नसले तरी प्रतलेखनाचे वर्ष मात्र शक १५८० (हिजरी १०६८) असे आहे. या काव्याचा आरंभ ईशवंदनाने झाला आहे. तो असा.

सिफत[1] करूं मैं अल्ला केरी[2] जे पुरे[3] पुरन[3] पुर[3]
कादिर[4] कुदरत[5] अंगीकारू[6] ना नीडे[7] ना दूर।,
ना उस रूप, ना उस दीख[8], ना उस थान[9] मकान[10]

(अर्थ– १ वर्णन, २ चा, ची, चे, ३ पूर्ण, ४ शक्तिमान, ५ शक्ती, समर्थता, ६ स्वीकरणे, अंगीकार करणे, ७ जवळ, सं. निकट पासून, ८ दिशा, दिक्, ९ स्थान, ठिकाण, १० अरबी शब्द– स्थान)

या काव्याचे नांव, वृत्त आणि दोहांसंख्या स्वतः कवीने खालील दोह्यात सांगितलेली आहेत.

इस खुश-नामा धरिया नाम दोहा एक सौ सत्तर
दिसा ज्यादा पर है सुने तो लहे खुशीका छत्तर। ३

या ग्रंथाने खुशनामा हे नाव धारण केले आहे. यात १७० दोहे आहेत. ते अधिक दिसतात. परंतु ते ऐकले तर सोन्याचे छत्र लाभते. यानंतर खुश या युवतीची कुळीमुळी सांगितलेली आहे. डॉ. अब्दुल हक यांच्या मते ही मुलगी काल्पनिक असावी किंवा त्यांची मुलगी किंवा नातेवाईक असावी याची चर्चा मागाहून करू. आता कुळी पाहा.

जात मियां की चुगता जानों बाप तुरक अफशाक
खुश की जात अलवी जानों जिस थे नाम रजाक। ४

तिच्या स्वामीची बापाची जात चुगता (एक तुर्की जमात) तुर्की अफशाक जमात आहे. (परंतु) खुशची जात अलीसंबंधी आहे, आणि तिला रजाक असे नाव आहे. कदाचित हे भारतात आलेल्या मुसलमान जमातींचे वांशिक वैशिष्ट्य सांगितलेले असावे. प्रथमतः भारतात तुर्क सरदारांनी हल्ले केले व उत्तर भारतात राज्य स्थापिले, म्हणून या मुलीला तुर्कवंशीय म्हटले असावे. आदिलशाही वंशाचा संस्थापक यूसुफ आदिलखान हा तुर्कवंशीय होता. हे मागे आलेच आहे.

सबरस (सर्व रस) नावाचा एक ग्रंथ मुल्ला वजही या साहित्यिकाने शक १५५७ (हिजरी १०४५) मध्ये याच भाषेत हैद्राबाद येथे लिहिला. ग्रंथात नजर या एका पात्राची कुळी अशी वर्णिलेली आहे. " परेशान सा दिसता, हैरान सा दिसता कुछ गंवा लिया त्यूं दिसता, किसी की चोरी किया त्यूं दिसता. दोनों हैरान् दोनो सरगर्दान्, सकते नैं हैं एकस कूं एक पछान. **नजर की मां थी हिंदुस्तानी सियाह पेशानी; बाप था तुर्कस्तानी** " (अब्दुलहक प्रति पृ. ८६) (अर्थ–कावरा बावरा झाल्यासारखा दिसतो, हैराण दिसतो. काही गमावल्यासारखा दिसतो, कोणाची चोरी केल्यासारखा दिसतो. दोघेही हैराण, दोघांच्या डोक्यात चक्कर, एक दुसऱ्याला ओळखू शकत नाहीत. नजरची आई हिंदुस्तानी होती, तिचे कपाळ काळसर होते, त्याचा बाप तुर्कस्तानी होता).

भारतात आलेले मुसलमान ईराणी, तुर्क मोगल, क्वचित अरब होते. त्यात भारतीय रक्त मिश्रित. वंशदृष्ट्या

त्यांची ओळख ठेवणे अत्यंत कठीण. याच वर्णसंकराचे हे गोंधळात पाडणारे चित्र वजही या लेखकाने काढले आहे काय? शंभर वर्षे अगोदर होऊन गेलेल्या मीरांजीनेही हेच वंशवर्णन केले आहे काय ?

### खुश हिचा स्वभाव

खालील दोह्यात कवीने मुलीचे स्वभाववैशिष्ट्य रेखाटले आहे.

घाली भोली जीव[1] जिन्हाली[1] मुहव्वत केरा नूर[2]
पिरम पियारी सात[3] संघाती[4] तलना[5] होए दूर। ५
जव वो आई अत संसार खुशी सो हुई तमाम
पगों तव गुरु के लागे लहिया[6] खुश कर नाम ! ६
हंसा वोनी[7] सूझ[8] नैर्नी[8] गौर वर्न कर करवे
वहुत सत्या[9] पन यो सत अजव कलजुग मांहीं सर्वे। ७
शह वोली गुनों की सव पितर लगावे यो मन मोही
कौन वखाने लक्खन उसके निपाया[11] जाने सो ही। ८
लाडों[12] लाड चावों[13] चाव सव गोतों[14] की प्यारी
सत संभाले अैन[15] जिन्हाले[1] मुहव्वत की हमारी। ९

अर्थ–१ जिवाला जिन्हाळा, आपुलकी, प्रेम लावणारी, २ प्रकाश, तेज, ३ साथ, सोवत, ४ मित्र, संगाती, ५ तळमळणे, शोष, ६ प्राप्त झाले, ७ या शब्दाचा पाठ चूक असावा, ८ समजूतदार डोळ्यांची, ९ सती, पतिव्रता, १० मध्ये, आत, ११ निपजविणे, निर्माण करणे, १२ लाडाने १३ प्रेम, आपलेपणा, १४ आपल्या वंशातील लोक, गोत, १५ निव्वळ ).

ही मुलगी इतर मुलींप्रमाणे साजशृंगार करीत नाही. तिच्या मनात ईश्वराचे ध्यान चाललेले असते. त्याच्याच रंगात ती रंगलेली असते.

कभी न रंगी मेंधी[1] रंगों[2] भूलों[2] वास न आया
रंग न रंगिया दंतों उसके भीनी[3] न हल्दों[4] काया[5]। १०
कहे मुंझ सीर सुहाग[6] अल्ला का छत्तर रह्या सुहावा[7]
अव क्यों सिर सुहावे दूजा तुम कों नाहीं ठावा[8]। ११
उस के रंगों रंगी साडी दूजा रंग न वानी [ मानी ]
उसके पासा[9] हमकों वासा[10] फूल फुकट कें आनी। १२
ऐसी वात करे गुनवंती मूरख वूझें सुद्ध
यही मन अपने आवे छंद सो हीं सिखावें वूध। १३

( अर्थ–१ मेहंदी, २ रंगाने, भुलीने, चुकून, ३ मंद, हलका, ४ हळदीने, ५ शरीर, देह, ६ सौभाग्य, अहेवपण, ७ शोभादायक, ८ ठाऊक, माहीत, ९ समीप, पाशी, १० वास, सुगंध, )

जेव्हा लोक तिला अशा बेपर्वाईच्या जीवनाबद्दल टोमणा देत, तेव्हा ती म्हणे मला हाच रंग आवडतो. मला जग आणि त्याच्या सुखलोलुपतेशी काहीं कर्तव्य नाही.

कहें विटिया अय शोख-दीदा[1] सुन जे नेकी पंद[2]
भोग विलास कर सूख लैं छोडे वाजे[3] छंद ॥१४
कहे, यो सव हुकुम खुदा का जे तुम आखें[4] यूं
हम कों भावे यक अल्ला सो करे वो भावे[5] त्यूं ॥१५
ना हम अछें[6] सुख संसारा ना हम अछें चाव[7]
हम तो रावन[8] लोडें[9] उस सूं जे है रावन[10] राव[11] ॥१६
जे निर्गुन गुनों का सवीं गुन कों सो वुझे[11] अव
पुन पाप सट दीजे आप शाह[12] सूं मेला[13] होए तव ॥१७
जीव पछाने अमर[14] खुदा[15] का वही अमर[16] मअरूफ[17]
राह[18] खुदा की वूझ[11] न देखें धावे चारों धीर[19] ॥१८
एक छोड जी वहूतों लागें आंकों नाहीं पीर[12] ॥१९

( अर्थ–१ मिस्कील डोळ्यांचा; काममग्न, २ उपदेश, ३ अरवीशब्द वाज-काही ४ सं. आ + ख्या धातूपासून, सांगणे, म्हणणे, ५ भावणे–आवडणे, ६ असणे, ७ इच्छा, कामना, ८ राजा शब्दापासून राव, राजाशी अर्थात् ईश्वराशी, ९ आवश्यकता असणे, इच्छिणे, १० राजांचा राजा, ईश्वर, ११ समजणे, जाणणे, १२ फा. शह. संस्कृत क्षत्र शब्दापासून, राजा येथे ईश्वर, १३ मिलाप, संयोग, तादात्म्य १४ अरवी शब्द, आज्ञा, १४ खुदा हा फार्सी शब्द वैदिक संस्कृत स्वधा शब्दापासून व्युत्पन्न, ईश्वर, स्वामी, १६ अमर, चिरंजीव, १७ ज्याने जाणिले तो भक्त, १८ संस्कृत रथ्यापासून, वाट मार्ग, १९ हिंदी– दिशा, वाजू, कडे २० संस्कृत अक्ष डोळा, २१ गुरू )

### सद्गुरुवर्णन

या नंतर कवीने सद्गुरूचे वर्णन केले आहे.

पीर वही जे प्रेम लगावे नूर[1] निशानी[2] ऐन[3]
मुनज्जा[4] की सुद्ध[5] सिखावे जहां दीस ना रैन[6] ॥२०
फेल[7] सुहावा पंथ अल्ला का जिस राह गए रसूल[8]
गुरुमुख पंथ पछानूं सो है जिय जीवन का मूल ॥२१
जिस मारग थें[9] जीव संचरे सो ही मारग सार[10]
मारग छोड चले कौ, मारग तन का हीं विचार ॥२२

( शब्दार्थ– १ अरवी-प्रकाश, तेज, २ खूण, चिन्ह, ३ निव्वळ, केवळ ( अरवी ), ४ प्रकाशमान, तेजोमय,





५ शुद्धि, शोध, तपास, ६ सं. ९ रजनीपासून, रात्र, ७ अरबी–क्रिया, कृति, ८ पैगम्बर, राजस्थानी-गुजराती, अर्थ आहे पासून १० सारभूत, निर्मळ )

### भोंदू गुरूंचे वर्णन

आता भारतीय भक्तिपरम्परेतील भोंदू गुरूचे वर्णन पाहा

करें जभीं[1] वो तीरत पट्टन[2] योग[3] अभ्यासें[3] ध्यान[3]
पांचों[4] चीज[5] रिया[6] सूं राखें क्यों कर दीजे मान ॥ २३
चंदर सूर के अरथ दिखावें करे अचंभा जप
जाकिर[7] हो मन दम[8] चलावें यो वी[9] ध्यान अलेप[10] ॥ २४
लुंचत मुंडत फिरें फुकट तिरत करें या हज्ज
थान[11] देख जे देवें मान वो वी मुरख निलज्ज[12] ॥ २५

( शब्दार्थ– १ जबहीं, जेव्हा, २ पट्टन–नगर तीर्थाचे ३ योगाभ्यास, ध्यान–हा मराठी भाषेतील तृतीयायुक्त शब्दप्रयोग येथे जशाचा तसा वापरलेला ध्यानी येईलच. ४ पंचेंद्रिय विषय, ५ वस्तु, ६ ढोंगीपणा, ७ ईश्वराचा उच्चार करणारा, भक्त, ८ श्वास, योगाभ्यास, ९ मराठी वी म्हणजे सुद्धा, १० अलिप्त, ११ स्थान, १२ निर्लज्ज. )

हेच वर्णन पुढे करीत कवि म्हणतो.

या अनजानो[1] पीर मिला या देख रियाई[2] मान
टोपी शजरा[3] लेकर नाच्या[4] फूल शकर[5] कों हान ॥ २६
ऐस्यां केरा गरव[6] न राखें जे तूं होसी[7] सूरा
मान राख मुरशद[8] मिलावे जिस है ग्यान सपूर[9] ॥ २७
थान[10] देखतें लागा वालक मूख न आवे खीर[11]
जिस के अंगों[12] [ अंगों ] भरम न जावे उस क्यों कहना पीर ॥ २८
या यखादा जाने टोना[13] कूड[14] को जंतर भाव
या करामत[16] इब्लिस[17] केरी या सेन्सारी[18] भाव[19] ॥२९
नफ्फा ऐसा लागे तुझ इसके मन कूं हान
विन अल्ला अउर न वोले वही पीर पछान ॥ ३०
भूका खाने दौडे देख महंक[20] भरिया खान[21]
ना रवा[22] सा देखे तो खाते क्यों ईमान[23] ॥ ३१
बे-ईमानी काफिर लोग इस दुनियां कू भूल
भूक लगे पर वो वी खावें वो क्यों पडे कबूल ॥ ३२
राजधन कूं देवे मान कर हत्यूं फकीर
जरम[24] न चाखे ताक जिन्हुं[25] वो क्या वूझें खीर[11] ॥ ३३
नफस[26] हवा[27] की मस्ती राखें नान्यां[28] सीते[29] हावा[30]
नान्यां देख मदन क्यां मात्यां मयन[31] रूप उचावा ॥ ३४
दिन रात उन अऊर न सूझे विन पुरुस के चाले[32]
वीव्यां[33] कूं वी वही कर जाए जैसे अपने ताले[34] ॥ ३५
जिन कूं शहवत[35] केरा हावा[30] उन कू वैसे पीर
जिन[36] के पीर शयातीन[37], वे तो ना आवेंगे हक धीर ॥ ३६
सुव्वर[39] के गल[40] बांध्यां मशक[41] वो क्या उस कू जाने
उस के ताई[42] सरज्या[43] वो सो ही पछान माने ॥ ३७
या गधडे पर कुरान लाद्या एक न वूझे वोल
लायक अपने करे वयान[44] लई[45] मू कर अपना खोल ॥ ३८

( शब्दार्थ – हिंदी रूप अजाणचे. प्रथमान्त ओकार येथे लक्ष्य आहे. २ ढोंगीपणा, वाह्योपचार, ३ कापडे. अरबी शब्द. यापासून सदरा आला असे दिसते. ४० म्हाटना हिंदी–पढ्न जाणे. ५ शर्करा, साखर. ६ गर्व, मोठेपण. ७ होईल, भविष्यकालाचे रूप ८ गुरु. ९ सम्पूर्ण. १० स्तन, कुच. हे केवळ मराठी रूप होय. ११ दूध, स. क्षीर शब्दापासून. क्षीरचे फार्सी रूप शीर होय. १२ अंगाने ( अवधी व दक्खिनी तृतीय ). १३ जादू, १४ गावंढळ, मूर्ख १५ जन्तर म्हणणे जादू, हातचलाकी, १७ भूत, पिशाच्च, १८ संसार, भवसागर; १९ भाव-माया, मोहजाल, हा केवळ मराठी शब्द होय. २० सुवास. सुगंध, २१ खाद्य पदार्थ, पक्वान्न. २२ ना रवा म्हणजे त्याज्य, वर्ज्य, निंद्य. २३ श्रद्धा. २४ जन्मचे रूप दक्खिनीत सापडते. मराठीत ते जलम असे ग्रामीण रूप. २५ जिनहूं–जिसने, तृतीया. २६ कामुक मन. २७ अभिलाषा, काम्यता, २८ नारी शब्दाचे अनेकवचन. २९ सी आणि ते पासून दक्खिनी प्रत्यय, अर्थ होतो पासून. ३० हाव, अभिलाषा. ३१ मयन–मदन, अपभ्रष्ट रूप काम ३२ चाळे, निंद्य कर्म. ३३ पत्नी. ३४ अरबी शब्द तालअ म्हणजे दैव, भाग्य. ३५ कामुकता, स्त्रैणता विषयैकता. ३६ पिशाचयोनि. ३७ अरबी शब्द शैतान या मूळ शब्दाचे अरबी अनेक वचन, भूत, पिशाच ३८ सत्य, ईश्वर. ३९ डुक्कर, सूकर. ४० गळा. ४१ कस्तुरी. ४२ साठी, करिता. हा दक्खिनी शब्द. ४३ सं. सृज्–निर्माण करणे. ४४ फार्सी शब्द–वर्णन, कथन, ४५ लई म्हणजे खूप, पुष्कळ. हा केवळ मराठी शब्द. दक्खिनीत नित्यप्रयुक्त. नको, लई, च हे शब्द दक्खिनी हिंदीची किल्ली होत असे काही उर्दू विद्वान् मानतात.)

डॉ. हक यांनी हा मूळ प्रबंध काव्यसहित पाहून लिहिला. ते म्हणतात असेच हे गुरूचे वर्णन चालू राहते. खुशनूद ही मुलगी शेवटी आपले गुरु मीरांजी याना विनंती करते कि तुम्ही माझ्या दयनीय अवस्थेवर दया करा. मला हा संसार आणि त्याच्या विषयांशी काही कर्तव्य नाही. मी तर आपल्या प्रेमाची तृषार्त आहे. आणि तुम्हीच माझा आशाविन्दु आहात. ती ईश्वराची प्रार्थना करते आणि त्याला असे आळविते– .

मुंज ना लोडे अलवान[१] निअमत[२] पहुप[३] परिमल पान
रूखी[४] सूखी[५] ऊपर खूशी[६] काह[७] बडाई मान ॥ ३९
ना मुंज लोडे पाट[८] पितंवर[९] यो जरजरी[९] सिंधार[१०]
फाटी तूटी कंवली[११] नीकी[१२] कलमा[१३] जपनहार[१४] ॥ ४०
ना मुंज लोडे पलंग निहाली [१५] सोफे[१६] माडी वाग[१७]
हस्रत[१८] राख जिवना मरना यो तो कस्मल[१९] दाग[२०] ॥४१
जे न काया[२१] धूल मिळावें कभू[२२] न परगट शौक[२३]
जे न इश्कों आंझू ढाले कभू न पाया शौक । ४२
तेरी वात अल्ला सूं अछे यानी छोडे काम
भावे[२५] सो उस मांग लीजिए सुन कर हाल[२६] तमाम॥४३
हस्रत मेरी कुछ न उवरी[२७] दौलत[२८] मुर्शद केरी
कहे करीमां क्या न लोड[२९] पुरवे आसा मेरी ॥ ४४
तूं कादिर[३०] कर सव जग माने सव कूं रोजी[३१] देवे
तू सभोंका दाना [३२] वीना [३३] सव जग तुज कूं सेवे ॥४५
सब की चिंता तुज कूं लागे जैसे जीव जीवन
सव का जान सुजान तूंहीं दे जे जे जिस के मन ॥४६
सवहों कूं तूं देख संभाले तूंही मारनहर

यूं के[३४] करता कौन कहे दे तुहीं अदिख[३५] विचार।४७

( शब्दार्थ– १ अरवी शब्द लौन याचे अरवी अनेक वचन, अर्थ रंग, वर्ण. २ ईश्वराचे देणे, देणगी. ३ सं पुष्पचे तभ्दवरूप, फूल. ४ सं. रुक्षचे, तभ्दरूप शुष्क. ५ सं. शुष्कचे रूप. वाळलेला. ६ सन्तोष, आनन्द, ७ कशाला ८ सं. पट्ट शब्दाचे रूप पाट आणि पीताम्वर उंची वस्त्रे. ९ सं. हिरण्य पासून फार्सी तव्दव रूप जर, जरी म्हणजे जर, सोन्याचे, जरजरी म्हणजे जरीचे वस्त्र. १० श्रृंगार. ११ घोंगडी. १२ चांगली, निरागस. १३ कुराणातील एक श्लोक. १४ जपणारी. १५ तक्क्या, उशी. १६ सोपा या मराठी शब्दाचा अपभ्रंश व अनेक वचन. १७ उद्यान, वाटिका, मनःस्थ अपूर्ण कामना. याला मराठीत वा इंग्रजीत समानार्थी प्रतिशब्द नाही. १९ कश्मल, निंद्य त्याज्य, २० डाग, कलंक, काळिमा, २१ शरीर, देह, २२ कधीही. २३ मनातील कामना, इच्छा. २४ कम्–कामयते, अभिलाषा, कामना. २५ भावेल, आवडेल. २६ अवस्था २७ उरणे, शेष राहणे. मराठीत उर्वरितचे रूप उरणे होते. ते दक्खिनी हिंदीत उवरना असे होते. २८ अरवी–संपत्ति, धन. २९ आवश्यकता, गरज. ३० समर्थ, शक्तिमान्. ३१ दैनंदिन अन्नप्राप्ती. ३२ ज्ञाता, जाणणारा. ३३ पाहाणारा, साक्षी. ३४ मराठी प्रमाणेच दक्खिनी, व्रज, अवधी इत्यादीत के शब्दाचा अर्थ का, कसा असा होता. ३५ अधिक, जास्त. )

### वैराग्याचे तत्त्वज्ञान

वरील काही दोह्यात कवीने आपले वैराग्याचे तत्त्वज्ञान सादर केले आहे. खुश म्हणते मला या संसारातील वैभव, पंचपक्वान्ने यांची गरज नाही. मला वाळलेली सुकलेली भाकरी पुरे. मला मानाची इच्छा नाही. मला पाट पितांवर नको. मला सुवर्णश्रृंगार नकोत. मला फाटकी घोंगडी पांघरून ईश्वरचिंतन करीत राहाणे हेच आवडते. सोपे, माड्या, उद्यान, पलंग गाद्यागिर्द्या हे कश्मल कलंक आहेत. जगणे आणि मरणे यांची मनातील सुप्त कामना–हस्रत हा शुद्ध जीवनावरील कलंक होय. जे शरीर धूलिधूसर बनले नाही त्याला प्रेम दिसावयाचे नाही. ज्याने प्रेमाचे अश्रू ढाळलेले नाहीत त्याला प्रेमप्राप्ति नाही. माझी कामना ईश्वराच्या ठायीच आहे. तुला जे पाहिजे ते तूं त्याचे जवळच माग. मी निष्काम झाले. माझे धनसर्वस्व माझा गुरूच होय. तूं सर्वशक्तिमान् आहेस. तूंच सर्व प्राणिमात्रांचा अन्नदाता आहेस. तू सर्वसमर्थ व सर्वसाक्षी आहेस. सर्वजण तुझी सेवा करितात. सर्व प्राणिमात्रांची चिंता तूंच वाहतोस. ज्याला जे पाहिजे ते तूं त्याला देतोस. तूं हे सर्व कसे व का करतोस हे कोणास कळावयाचे? ते कळण्यासाठी तूं आम्हाला अधिक बुद्धि, अधिक विचार दे.

हाच विचार, महाराष्ट्रातील लहान मोठ्या साधुसंतांपैकी प्रत्येकाने मांडलेला आहे. व तो मीरांजीच्या निदान तीन चारशे वर्षे अगोदरपासून महाराष्ट्रात व मराठी वोलीत व्यक्त होत आलेला आहे.

### विश्वातील विषमता

यानंतर भक्ताला दिसणाऱ्या जगातील विषमतेचे चित्र मीरांजींनी रेखाटलेले आहे ही विषमता देवानेच निर्माण केली. त्याची शक्ति कतुमकर्तुमन्यथा कर्तुम् अशी आहे.

अनुक्रमणिका



एकस माटी मोली[१] देवे एकस माटी बाज[२]
कीतों[३] भीक मंगावे[४] कीतों देवे राज॥ ४८
कीतों पाट पितंबर देता कीतों सिर की लाया[५]
कीतों धूप तलावे[६] कीतों ऊपर छाया ॥ ४९
कीते पलंग निहाली[७] ऊपर कीते पडें तल्हार
कीतों को धड[९] कोंपट[१०] नाहीं कीतों कू धौलार[११] ॥५०
कीते ग्यान भगत वैरागी कीते मुरख गंवार
यक जिन्न[१२] एक मानुस कयता[१३] एक पुरुस एक नार॥५१
एक फिरिश्ता[१४] यक शैतान[१५] यक चोर एक साव[१६]
एक झाड यक पथ्थर माटी एक अगिन एक वाव[१७]॥ ५२
अर्श[१८] व कुर्सी लूह[२०] कलम[२१] दोजख[२२] बिहिश्त[२३] निपाया[२४]
आस्मान सूर[२५] चंदर तारे सब पर हुकुम[२६] चलाया ॥५३
तुझ थे ही कुदरत[२७] कूं जोर[२८] तुझ थे नूर[२९] नुराना[३०]
तुझ थे सबका सभींपना[३१] तुज विन सभीं बेगाना[३२] ॥५४
तुज विन कोइ न मार जिवावे[३३] तुज विन कोइ न आस पुरावे[३४]
आलम[३५] ऊपर वाया वहना[३६] करे हुकुम सूं जैसा भावे ॥५५

( शब्दार्थ–१ मोळी, लाकडाचा भारा. हा केवळ मराठी शब्द-तो हिंदीत नाही. २ विना, वर्ज्य शब्दापासून तद्भव ३ कित्येक, कितीक, कितने. ४ मागावयास लावतो. ५ सिर कीं लाया म्हणजे डोक्याची लाही होणे या मराठी म्हणीचा वापर. लाही होणे, जळणे करपून जाणे. हाच अर्थ पुढील चरणात स्पष्ट केला आहे. ६ तलावे म्हणजे तळवितो. प्रयोजक तळणे शब्दाचे रूप तळणे म्हणजे एखादी वस्तु फार वेळ उन्हात पडून राहिली म्हणजे ती निःसत्त्व होते. चांगल्या उपयुक्त वस्तु तळू देत नाहीत. ७ तक्क्या, लोड, उशी, ८ तल आणि कार, तल्हार, अर्थ खाली. ९ हा केवळ मराठी शब्द होय. हिंदी आदीत नाही. अर्थ सुरक्षित. १० खोपट, झोपडी, तणार ११ धवलाकार चुनेगच्ची घर, यौगिक अर्थ माडीचे घर, प्रासाद, १२ अरबी शब्द-भूत, पिशाच्च १३ कृ. धातूपासून करणे मधील र चा अ–य होऊन हे रूप हिंदीत रूढ आहे. १४ देवदूत. १५ पिशाच्चयोनि, १६ साधुपासून, सज्जन, १७ वायु, वारा, १८ आकाश १९ पाताल, २० लिहिण्याची पाटी, २१ लेखनी, २२ नरक. २३ स्वर्ग, २४ निष्पद्येत निर्माण करणे. २५ वैदिक संस्कृतात सूर हा शब्द सूर्यासाठी आहे. हा सूर्य शब्दाचे तद्भव रूप नव्हे. २६ अरबी हुक्म-आज्ञा, २७ निसर्ग जगत. २८ शक्ति. २९ अर्वा, प्रकाश ३० प्रकाशमय. ३१ सर्वपणा. ३२ एकलकोंडा. मित्रांपासून वियुक्त. ३३ जिवविणे प्रयोजक रूप. ३४ पुरविणे. ३५ जग, विश्व. ३६ वाया वाईचे अनेक वचन. वाई शब्द भगवती पासून तद्भव. बहना, वास्तविक बहनां, बहनचे अनेक वचन, भगिनी ).

## ऐतिहासिक उल्लेख

पुढील दोह्यात कवीने एका ऐतिहासिक घटनेकडे अंगुलिनिर्देश केला आहे असे मला निश्चयाने वाटते. दोहा असा.

बिहिश्त म्याने आग उचावे, दोजख सके बुझावे
पकड भिकारी तख्त बिठावे राजे राखे गरद मिलावे।५६

सर्व शक्तिमान तू स्वर्गात आगीचा लोळ निर्माण करतोस आणि नरकात रसरसत असलेला अग्नि तू विझवू शकतोस. एखाद्या भिकारी माणसास पकडून तू सिंहासनावर बसवितोस आणि सुरक्षित राजाला तू धुळीस मिळवितोस. येथे दुसऱ्या चरणातील सुरक्षित राजा ताजुद्दीन फीरोजशा बहामनी होय. तो त्या वंशातील आठवा राजा असून त्याने गुलबर्गा येथे शक १३२० ( हिजरी ८०० ) पासून शक १३२४ ( हिजरी ८२५ ) पर्यंत राज्य केले. या नरेशाच्या शेवटच्या कालात ख्वाजा मुहम्मद हुसेनी बंदेनवाज गेसूदराज हा सूफी साधु दिल्लीहून शक १३२१ ( हिजरी ८०१ ) मध्ये दक्षिणेत आला. तो काही काल दौलताबाद येथे आपल्या बापाच्या कबरेचे दर्शन घेण्यास राहिला. फीरोजशाह बहामनीचे त्याला बोलावणे आल्यावरून तो गुलबर्गा ( म्हैसूर राज्य ) येथे राहावयास गेला. तो मोठा साधु पुरुष होता. व जनमानसात त्याच्याविषयी अत्यंत आदर वसत होता. फीरोजशाहाच्या स्त्रैणपणामुळे बंदेनवाज थोडासा राजाविषयी नाराज होता. फीरोजशाहाचा धाकटा भाऊ अहमद हा बंदेनवाजाच्या भक्तीला लागला. फीरोजनंतर गादी आपणाला मिळावी अशी अहमदाची इच्छा होती. परंतु फीरोजशाहाने गादी आपल्या थोरल्या पोराला द्यावयाचे ठरविले होते. थोड्याच दिवसात फीरोज आजारी पडला. या संधीचा फायदा घेऊन अहमदाने असन्तुष्ट सरदारांना एकत्र केले. सैन्याची जमवाजमव केली. या सर्व भानगडीला आपला प्रिय व शिष्य म्हणून अहमदाला बंदेनवाजाचा पाठिंबा होता. लवकरच फीरोज मरण पावला. फीरोजचा

मुलगा नादान, ऐषआरामी व निष्क्रिय होता. झालेल्या चकमकीत अहमद यशस्वी झाला व बहामनी घराण्याची गादी त्याला प्राप्त झाली. काही वर्षानंतर अहमदाने आपली राजधानी गुलबर्ग्याच्या उत्तरेस असलेल्या बीदर या शहरी नेली.

अहमदशाह हा फार साधुवृत्ति होता. राजा झाल्यावर ही तो सौजन्याने वागला. म्हणून त्याला वली म्हणजे साधु अशी उपाधि मिळाली. तो इतिहासात अहमदशाह वली म्हणून ओळखला जातो. त्याने शक १३५७ ( हिजरी ८३८ ) मध्ये आपला मृत्यु होईपर्यंत राज्य केले. हा वृत्तांत मुहम्मद कासिम हिंदुशाह फिरिस्ता याने आपल्या तारीखे-फिरिस्ता या ग्रंथात दिलेला आहे.

खाजा बंदेनवाज हा दक्षिणेतील मुसलमानाचा सर्वात पूज्य असा सूफी झालेला आहे. विजापूरचे बादशाह गुलबर्गा येथे बन्देनवाजाच्या यात्रेला जात. हाच बन्देनवाज दक्खिनी हिन्दी अथवा खडी बोलीचा आद्य उपलब्ध गद्य लेखक आहे. त्याची चार छोटी छोटी पुस्तके, चोपडी उपलब्ध आहेत. मीराजुल आशिकीन अर्थात प्रेमिकांची, भक्तांची साधना हा त्याचा महत्त्वाचा गद्य ग्रंथ. त्यात इस्लाम धर्मानुसार भक्तिविवेचन आहे. त्या भक्तिमार्गात भारतीय भक्तिमार्गाचा चांगलाच प्रभाव दिसून येतो. असे आहे म्हणून त्याने आपल्या भक्तगणास अशी धोक्याची सूचना दिली आहे की याला "**साधना**" म्हणून नका. तसे म्हटल्यास कुफ्र म्हणजे धर्मपाखंडीपणा पदरी येतो. दुसरे १०० ओळीचे एक गद्य चोपडे आहे. त्याचे नाव शिकार- नामा, यात ज्ञानेश्वरांच्या नावावर चालत आलेल्या खालील कूटाच्या आधारावर एक रूपक रचून, विषय व त्यांची साधनरूप इंद्रिये यांची शिकार कशी करावी याचा शिकार-नामा ग्रंथिला आहे. ज्ञानेश्वरांचे हे कूट शिकारनाम्याला आधारभूत आहे.

कांट्याच्या अणिवर वसति तीन गाव ।
दोन ओसाड एक वसेचिना । १ ।
वसेचिना तेथे आले तीन कुंभार ।
दोन थोटे एक घडीचिना । २ ।
ज्ञानदेव म्हणे याचा तो अनुभव ।
सद्गुरुवांचूनि कळेचिना । ३ ।

असो. वरील फीरोजशाह आणि खाजा बंदेनवाज याच्या या लोकसमजाचा उल्लेख मीरांजीपश्चात् दोन आणखी कवींनी केलेला आहे. ते दोघेही विजापूर निवासीच होते. त्यांपैकी एक अब्दुल हा दिल्लीकर असून द्वितीय इब्राहीम आदिलशाह ( राज्यकाल शक १५०२ ते १५४९-हिजरी ९८८ ते १०३७ ) याच्या बोलावण्यावरून तो बियापूर अर्थात् विजापुराला आला व त्याने शक १५२५ ( हिजरी १०१२ ) मध्ये इब्राहीम नामा नावाचे पद्यात बादशहाचे चरित्र लिहिले. त्याचा परिचय आम्ही महाराष्ट्रेतिहास परिषदेच्या प्रथम अधिवेशनात हिंदीतील इतिहास साधने' या प्रबंधात करून दिला आहे. ( पाहा इतिहास आणि संस्कृति क्रमांक ८, शक १८८८ ) अब्दुल कवीनेही खाजा बंदेनवाज याला आदरांजलि वाहिली आहे. वरील इतिहासिक घटनेचा अब्दुल याने स्पष्ट नावानिशी उल्लेख केलेला आहे. बंदेनवाज यांची स्तुति करित असताना अब्दुल म्हणतो.

किया शाही सूं दूर फीरोज धर
नवाज्या सो अहमद गदा शाह कर। बैत ६६

तूं ( खाजा बंदेनवाज ) फीरोजला धरून राज्यापासून दूर केलेस, भिकारी ( गदा ) असलेल्या अहमदला राजा करून त्याची प्रतिष्ठा वाढविलीस ( नवाज्या ).

दुसरा उल्लेख करणारा कवि मुल्ला नुस्रती होय. हा छत्रपति शिवाजी महाराजांचा प्रतिस्पर्धी द्वितीय अली आदिलशाह याचा राजकवि. याचा मृत्यु छत्रपतीच्या राज्यभिषेकवर्षी म्हणजे शक १५९६ ( हिजरी १०८५ ) मध्ये झाला. नुस्रतीने आपल्या 'गुल्शेन इश्क' प्रेमोद्यान या प्रथम काव्यात सहाव्या सर्गात खाजा बंदेनवाज याची स्तुती केलेली आहे. बंदेनवाजविषयी आपला अत्यादर व्यक्तवीत नुस्रती म्हणतो.

जवां धो के फुलनीर सूं मुख में लावुं
यो सय्यद मुहम्मद हुसेनी का नावूं।
जिते आशिकां में अच्छे सरफराज
जिते जग का मख्दूम बंदानवाज।
तेरे मिहर सीते गदा होय अमीर
तिरे कहर ते पल में होए शह फकीर।
किया पल में फीरोज शह कुं तबाह
घडी मेंच सुलतान अहमद कूं शाह।
( बैत २, ३, १७ व १८ )

आपली जीभ गुलाबपाण्याने धुवून मी आता या सय्यद मुहम्मद हुसेनी याचे नाव, उच्चारीत आहे. जेवढे म्हणून भक्त झाले त्यात तू शिरोभूत आहेस. जगात जेवढे वंद्य पुरुष झाले त्यात तूं सेवकांची प्रतिष्ठा वाढविणारा (बंदा नवाज) आहेस. तुझ्या कृपेने भिकारी सरदार बनतो आणि तुझ्या शापाने राजा एका पळात फकीर होतो. तू फीरोजशाहाला एक पळात नष्ट केलेस. एका घडीतच अहमदला तूं राजा बनविलेस.

वरील विचाराला अनुसरूनच मीरांजी कवीने पुढील दोह्यात ती कल्पना अधिक विशद केली आहे.

फहमंदां[1] कूं करे दिवाने मुख्यां[2] कूं लई[3] दुख में भाने[4]
कर कर बंदगी[5] जरम[6] गंवावे फिर पडते च अजब क्या राने[7]। ५७

(अर्थ–१. समजतदार, २. मुर्खा लोक, ३. फार. पुष्कळ हा केवळ मराठी शब्द. ४. घालणे, ५. सेवा, ६. जन्म, जन्म शब्दाचे मराठी ग्रामीण जलम असे होते. ७. राजा रूप) हे बंदेनवाज, तुझी शक्ति अशी आहे की तूं जाणत्यांना वेडा करतोस; सुखी असलेल्यांना फारच-लई दुःखात लोटतोस; जन्मभर सेवा कर करून राजेदेखील पतन पावतात यांत आश्चर्य कसले?

## आळवणी

या नंतर खुश ही भक्त युवती आत्मपर विचार प्रगट करते.

मैं इस कारन बहुत डरूं, डर कर जावूं कहां
जहां जहां मै छुपन लोडूं तूंही तहां तहां ॥५८
अब ना छुपूं अब ना डरूं, डरूं तो कहां लग डरूं
हमीं गरीब निपाए तिरी आस थे[1] आसा धरूं ।.५९
माता जे बालक थे रूसी, जाना उन्हें किधर
आप जिस मारग लासी[2] मीरां[3] मैं जावूं तिधर ॥६०
तू रहमान[4] रहीमा[5] मेरा मिहर[6] मुहब्बत-[7] भऱ्या
मैं तो बांदी बर्दी[8] तेरी तुईं[9] मुंझ हातों धऱ्या ॥६१
ना मैं कयती[10] बंदगी[11] तेरी ना धड[12] कयती याद
दायम[13] कयती आगल[14] तेरे सलगों[15] थे फिर्याद[16] ॥६२
तुईं बी मेरे लाड चलाया कभूं न हुवा उदास[17]
अब संदेसा[18] [संदेहा] तोड गुसाईं तेरी मुंज कूं आस ॥६३

(शब्दार्थ–१ अवधी, राजस्थानी, गुजरातीतील पंचमीचा प्रत्यय, अर्थ होतो पासून. २ भविष्यकाळ, आणील.
७

३ कविनाम मीरांजी. ४ दयाळू. ५ दयाळू. ६ मित्र, सूर्य. हा फार्सी शब्द सं. मित्र पासून व्युत्पन्न आहे. ७ अरबी-प्रेम येथे अरबी शब्दाला मराठी शब्द जोडून केलेला समास लक्ष्य होय. ८ वाढविलेली दासी. ९ तुही, तूच, १० करता याचे अपभ्रष्ट रूप, करते ११ दास्य, सेवा, १२ हा केवळ मराठी शब्द, सुरक्षित १३ फार्सी शब्द नित्य चिरकालीन १४ पुढे १५ हा केवळ मराठी शब्द सलग म्हणजे जोडीदार, गडी मित्र. सलगों-सलगांने हे सलगीचे तृतीयेचे रूप १६ तक्रार, आक्षेप, १७ उन्मनस्क, तटस्थ, अनमान करणारा. १८ येथे संदेह हाच पाठ योग्य आहे. फार्सी लिपीत दोन्ही शब्दांची लेखनकामाठी सारखीच आहे. लिपिकाराच्या अज्ञानामुळे अपपाठ शिरला. अर्थ सरळ आहे. १९ गोसावी, गोस्वामीपासून तद्भव रूप.)

हा काव्याचा शेवटचा भाग. येथे डॉ. हक यांनी असे लिहिले आहे की खुशनूदची ही प्रार्थना मान्य होते. देवदूत तिला ही वार्ता पोचवितात. ती कृतार्थ होते. देवदूत स्वर्गातून येतात. आकाशातून ते तेजोमय अशा थाळ्या घेऊन येतात. त्यात सुगंधी पुष्पे भरलेली होती. सुवासाने पृथ्वी व आकाश दरवळून गेली होती. खुशनूदीचा हा अंतिम काळ होता ती या जगाला आता रामराम करणार होती. ती स्वर्गाला निघून जाते. मीरांजीनी तिच्या भक्तीची व नीतिमत्तेची स्तुती केली आहे. कवीने या मुलीचे वय आणि वास्तव्य स्थान दिलेले आहे. त्यांनी या गोष्टींचा उल्लेख खालील दोह्यात केलेला आहे

जिस की थी उस पडी कबूल थान खुशनूद
खुशनूदी जब अल्ला की सबहीं निर्मल दूद ।६४
बरस पांच अउर बारा की एक मास नौ दीन
उस की उमर लेखतें सब लीखा हुवा उस की खीन ।६५
थान किया शाहपूर मांहीं वो तो प्यारा धाम
पीरों केरा कौल हुवा कि तुझ सूं हमें तमाम । ६६

खुशनूद ही अल्लाची होती. त्याला ती पसंत पडली. ज्या अर्थी खुशनूदी ही ईश्वराची होती त्या अर्थी तिज-संबंधी सर्व ही दुग्धाप्रमाणे स्वच्छ व शुभ्र होते. तिचे वय १७ वर्ष, १ मास आणि ९ दिवसाचे होते. सर्व तिचे वय असे लेखितात. हा तिचा क्षण लिहिलेला होता. तिने शाहपूर मध्ये स्थान-वास्तव्य केले. ती तेथे विश्रांती

घेती झाली. शाहपूरचे स्थान प्रिय आहे. गुरुजनांचे असे शब्द आहेत की तुझ्याने हे सर्व प्राप्त आहे.

शाहपूर हे स्थान मीरांजीच्या निवासाचे आहे. मीरांजीला तेथेच पुरण्यात आले. म्हणून खुशनूद संबंधी ही कवीने याच स्थानाचा उल्लेख केलेला आहे. काव्याचे शेवटले दोन दोहे असे.

खुश खुश हालों[1] खुश खुश्यां खुशी रहे भरपूर
यो खुश खुश्यां अल्ला केरा ( केऱ्यां )
नूरन[2] आला[3] नूर[4]। ६७

खंव्या खुश खुशनामा तम्मन[5] हुवा तमाम
खुश सब कोई दायम[6] कायम[7]
जीता खवास[8] अवाम[9]। ६८

( अर्थ– १ हालसे–अवस्थेने. २ नूर -प्रकाशाने ३ श्रेष्ठ. ४ प्रकाश. ५ संपूर्ण. ६ नित्य, चिरंतन, ७ स्थिर. ८ खास ( अरबी ) चे अनेक वचन, विशेष ९ अरबी आम शब्दाचे अनेक वचन – सामान्य लोक. )

खालील दोन दोह्यात कवीचे नाव आलेले आहे.

सुनों **मीरांजी** अगिन–धुन जल बल तलमल पैतूं ( पैठूं )
मेरी अह न आवे किसे जाए किधर मैं छुपूं । ६९
क्या मैं चूकी, के यू कयते, तुम तो जीवजिवन
काहे कयते सख्त **मीरांजी** मुझ गरीब थे मन । ७०

मीरांजी आपण ऐका. ( या भवसागरात ) जळून पोळून, तळमळून मी आता अग्नीत–धुनीत प्रवेश करते. माझा आह कोणाला येत नाही. मी आता कोठे लपू ? मी काय चुकले, मीरांजी, आपण असे का म्हणता तुम्ही तर माझे जीव प्राण ! मज गरीबावर आपले मन असे कठोर का करता ? ( पैठणे–पैठना हा शब्द दक्खिनीत नित्य प्रयुक्त आहे. )

## भाषिक प्रभाव

मराठी भाषेच्या दृष्टीने मीरांजीच्या या काव्याची दोन अंगे महत्त्वाची आहे. एक तर दक्खिनी हिंदीतील हा प्रथम कवी की ज्याच्या काव्यात इतके मराठी शब्द व व्याकरणविशेष आढळून येतात. दुसरी बाब अशी की खुशनूद या पात्राची आध्यात्मिक काया ज्ञानेश्वरभगिनी मुक्ताबाईची दिसून येते. दोन्ही व्यक्तीत इतके साम्य सामावलेले आहे की हे अंग डोळ्यासमोर आल्याशिवाय राहात नाही.

पहिल्यांदा भाषिक विशेष पाहू. मीरांजीला समकालीन असलेले फीरोज बीदरी (राहणारा कर्नाटक प्रदेश, बीदर), विजापूरनिवासी कवी अब्दुल किंवा स्वतः द्वितीय इब्राहीम आदिलशाह याचा ग्रंथ नवरस ( शक १५२२– हिजरी १००८ ) यांच्या काव्यात मराठी शब्दाचे प्रमाण फार कमी आलेले आहे. तेथे मराठी शब्द म्हणताना संस्कृत तत्सम वा तद्भव शब्द अभिप्रेत मुळीच नाहीत. या दोन्ही वर्गातील शब्द सर्वच आर्य भारतीय भाषात विखुरलेले आहे. अशा शब्दांना मी प्रस्तुत प्रसंगी मराठी शब्दात गणीत नाही. तर येथे केवळ, अन्यत्र न सापडणारे बहुधा तद्भव, पण क्वचित देश्य, अशा मराठी शब्दांचाच अभिप्राय आहे. खुशनामा हे समग्र काव्य दुर्दैवाने प्रकाशित झालेले नाही. म्हणून डॉ. हक यांच्या उध्दृत ७० दोह्यांतील शब्दांचाच येथे विचार करता आला. या खुशनाम्यात वरील प्रकारचे केवळ मराठी मातीतून जडणघडण झालेले खालील शब्द दिसून येतात. ते हिंदी कोशात सापडत नाहीत. जिज्ञासूंनी ताडून पाहावेत. खुशनाम्यात खालील मराठी शब्द प्रयुक्त आहे. शब्दाच्या पुढे कंसात मराठी शब्द व दोहा क्रमांक दिलेला आहे. जिन्हाली ( जिव्हाळा ५,१० ). संघाती ( संगाती, सांगाती ५ ), तलणे ( तळणे ५ ), लहना ( लहणे, लाहाणे ६ ), गोत ( गोत ९ ), ठावे ( ठावा, ठाऊक ११ ), फुकट (फुकट १२), अनना ( आणणे १२ ), ए याखादा ( एखादा २६ ), माव ( माव–जादू २६ ), भावना ( भावणे–पसंत पडणे १५ ), थान ( थान–स्थान २५, ६४, ६६, थान ( थान–स्तन, कुच २८ ), हावा ( हाव-अभिलाषा ३४, ३६ ). चाले (चाळे–नखरे ३५), लई ( लई–पुष्कळ ३८, ५७ ), निकी (निके-चांगले ४०), सोफा ( सोपा माळवदातील समोरचा भाग ४१ ), माडी ( माड, माडा माडी ४१ ), उरना ( उरणे–शेष राहणे ४४ ), लाही लहणे, लाहणे–प्राप्त करणे ४९ ), तलाना ( मराठी तळविणे–उन्हात तापत ठेवणे ४९ ) धड ( धड–सुरक्षित ५०,६२ ), कोंपट( कोंपट, खोपट ५० ), साव ( साव, साहू, शाहू साधू शब्दापासून ५२ ), जिवाना ( मराठी जिवविणेचे दक्खिनी रूप ५५ ), पुराना ( मराठी पुरविणे याचे दक्खिनी रूप ५५ ), सलग ( म. सलग, सलगी–मैत्री ६२ ) बी( मराठी बी, हिंदी भी, सं अपि पासून ६३ ).

या शिवाय अगोदर उद्धृत केलेल्या कवितेत नीच ( मराठी निच, नीच–सं नित्य पासून ), झारा ( मराठी

झाडा–तपासणी ) आणि टाकना ( म. टाकणे, त्यागणे ) हे केवळ मराठी शब्द प्रयुक्त झालेले आहे.

उपरिनिर्दिष्ट शब्दांच्या पाहणीने हे स्पष्ट होईल की हे शब्द ग्रांथिक भाषेतील नव्हेत. हे सर्व शब्द मराठी ग्रामीण जनतेच्या दैनंदिन जीवनातले आहेत. त्यावरून ही गोष्ट स्पष्ट होते की मीरांजींचे आयुष्य सामान्य माणसात व्यतीत झालेले आहे.

खुशनूद या काव्यात " योग अभ्यासें ध्यान " असा प्रयोग केलेला आहे. दोहा असा.

करें जभीं वो तीरत पट्टन योग अभ्यासें ध्यान
पांचों चीज रिया सूं राखें क्यों कर दीजे मान।

प्रथम ओळीत जो भक्त तीर्थ पाटण, योग्याभ्यासाने ध्यान करतो, परंतु ( इंद्रियांचे ) पंचविषय ढोंगीपणाने सुरक्षित ठेवतो त्याला मान कसा द्यावा? असा प्रतिप्रश्न कवीने विचारला व उत्तर दिले. येथे " योग अभ्यासें " या शब्दाची मराठी भाषेतील तृतीया विभक्ती प्रयुक्त आहे. हे कोणीही मान्य करील. दुसरा कोणताच अन्वय व अर्थ शक्य होत नाही. तिन्ही शब्द वेगवेगळे घेतले तर अभ्यास या नपुंसक शब्दाचे अनेक वचन होईल. तृतीया टाळावी तर मराठी व्याकरणाचे अनेक वचन गळ्यात पडते. एकूण हा मराठी व्याकरणाचा प्रभाव अभ्यासूंना अवश्य लक्ष्य आहे.

## साहित्यिक देन

या केवळ ७० च दोह्यांत, दोन तीन दोह्यांतून मराठीत पूर्वी व्यक्त झालेल्या विचारांची उसनवारी केलेली स्पष्टतया दिसून येते. दोहा क्रमांक ४६ आणि ज्ञानेश्वरीची ही ओवी ताडून पाहावी. दोहा व ओवी अशा.

सब की चिंता तुज कूं लागे जैसे जीव जिवन.
सब का जान सुजान तुंहीं दे जे जे जिस के मन ।४६

आता ज्ञानेश्वरीची प्रसिद्ध ओवी पाहा.

दुरिताचे तिमिर जाओ। विश्व स्वधर्मसूर्यें पाहो।
वांछिल तें तें लाहो। प्राणिजात ॥१८·१७७४

आणि हा दोहा.

माता जे बालक थे रूसे, जाना उन्हें किधर
आप जिस मारग लासी मीरां मैं जावुं तिधर।६०

आणि त्याची तुलना जनाबाईच्या खालील अभंगाशी करावी.

गंगा गेली सिंधुपाशी। त्याणे अव्हेरिले तिसी ।१
तरि ते सांगावे कोणाला। ऐसे बोले बा विठ्ठला ।२
जळ कोपले जळचरा। माता अव्हेरी कुमारा ।३
जनी म्हणे शरण आले। पाहिजे ते उद्धरिले ।४

मीरांजीच्या काव्यात सद्गुरुवर्णनाचे नमुने अनेक ठिकाणी सापडतात. सद्गुरुचा महिमा आणि ढोंगी गुरुंची निंदा हा प्राचीन कर्त्यांपासून आचार्य अत्रे यांच्या सारख्या आधुनिकांपर्यंत मराठी साहित्यिकांचा बाणा आहे. त्याची उसनवारी मीरांजी कर्त्याने ४७० वर्षांपूर्वी केलेली, अवश्यमेव लक्ष्य आहे असे वाटते.

यूं गुरुमुक पंद पाया। तो ऐसे बोल चलाया॥

ज्ञानेश्वरांचे सद्गुरुवर्णन प्रसिद्धच आहे.

तें बुद्धी हीं कवळितां सांकडें। ह्मणौनि बोली विषयीं सांपडे
परि निवृत्तिकृपाउजियेडें। देखेन मी ॥६·३२
तैसी सद्गुरुकृपा होए। तरि करितां काइ आपु नांहे।
ह्मणौनि अपार मातें आहे। ज्ञानदेओ ह्मणे ।६·३५

अधिक विस्तार अनावश्यक होय.

मराठी, गुजराती, राजस्थानी, व्रज, अवधी आदी सर्व आधुनिक आर्य भारतीय भाषांनी अरबीफार्सी शब्द स्वीकारले. परंतु त्यांचा स्वीकार भारतीय भाषिक परम्परेला धरून झालेला आहे, हे बारकाईने पाहाणाऱ्या सर्वांना दिसून येईल. या फार्सीअरबी शब्दांना भारतीय रूप देऊन त्यांचा वापर झालेला आहे. हे पुष्कळांच्या ध्यानी येत नाही. ज्यादा याचे जास्त-ती, खारिज याचे खेरिज, ताजी (अरबी घोडा) याचे तेजी, मुलाहिज़ा याचे मुलाजा इत्यादी रूपकरणाला भाषाशास्त्रात Assimilation सारूप्यीकरण प्रक्रिया म्हणतात. सर्व विदेशी शब्दांना सारूप्यीकरणाचा संस्कार करून त्यांना भाषेत स्थान मिळाले. तसेच जे शब्द असे घेतले त्यांच्याशी पूर्वीच्या येथील शब्दांशी जसा व्यवहार होता, तोच व्यवहार त्यांच्याशी झाला. त्यांना विशेष अधिकार वा वागणूक नाही. जसे मराठी शब्दांचे समास तसेच या परकीय शब्दांशी मराठी शब्दांचे. जसे पोटभरू हा मराठी समास, तसाच मुहब्बत-भऱ्या ( दोहा ६१ ) हा समास मराठीने बनविला. मुहब्बत शब्द अरबी म्हणून त्याची गय केली नाही. त्याला येथे संस्काराने पूत केले. हीच प्रथा दक्खिनी हिंदीत सर्वत्र दिसून येते. हा विषय राष्ट्रवाणी, पुणे, व सम्मेलनपत्रिका, प्रयोग या पत्रातून आम्ही अनेक वेळा मांडलेला आहे.

### सांस्कृतिक उसनवारी

वर उल्लेखिलेल्या सद्गुरुवर्णनात साहित्यिक अनुकरणाबरोबरच सांस्कृतिक अनुकरणही आहे, हे उघडच दिसते आहे. मुसलमानी संस्कृतीत गुरू पीर, मुरशद आहे हे खरे, इराणातील जरथुष्ट्रधर्म आणि मध्य आशिया व अफगाणिस्तान येथे शकपूर्व कालापासून शकाच्या दहाव्या शतकापर्यंत नांदत असलेल्या बौद्धधर्म आणि आर्यसंस्कृती यांच्या साहचर्याने ईराणी मुसलमानांनी सूफी पंथाला खतपाणी घातले असे संशोधकविद्वानांनी आता निश्चित केले आहे. हा मागील वृत्तांत झाला. परंतु सूफीपंथ महाराष्ट्रात आल्यापासून त्याच्यावर येथील वारकरी पंथ व इतर साधूंचा प्रभाव पडला हे सर्वत्र दिसून येते. आरंभीच झालेल्या खाजा बंदेनवाज याने ईश्वरप्राप्तीचा मार्ग वर्णन केला ( मीराजुल आशिकैन ) आणि या मार्गाला ' साधना ' म्हणू नका, असा आदेश आपल्या स्वधर्मबांधवाला दिला. कारण ते ' कुफ्र ' होते. ते वाक्य असे. " **साधना कहे तो शरअ जाता है** " ( पृ. ७८ ) बंदेनवाज याने ही फार काळजी घेतली. परंतु मीरांजीने अशा प्रकारचा विधिनिषेध विशेष पाळलेला नाही. बंदेनवाजने गुरू शब्द चुकूनही वापरला नाही. मीरांजीचे त्याशिवाय भागतच नाही. भक्तिमार्गातील वैराग्याचे महत्त्व सूफीपंथातही आहेच. परंतु मीरांजीनी हे वर्णन भारतीय संकेतानुरूप केले आहे, हे विशेष होय. ते म्हणतात " गुरुमुख पंथ पछानूं सौ है जिय जीवन का मूल, " तसेच " मारग छोड चले कूं मारग तन का ही विचार " इत्यादी अनेक उदाहरणे सापडतात.

### मुक्ताबाई चरित्र वर्णन

खुशनामा या काव्यात मीरांजीने ज्ञानेश्वरांची बहीण मुक्ताबाई यांच्या चरित्राचे खुशनूदच्या चरित्रवर्णनात अनुसरण केलेले आहे, असे दिसून येते. सर्वप्रथम या दोन मुलींचे वय डोळ्यासमोर येते. खुशनूदचे वय १७ वर्षे १ मास ९ दिवस असे मीरांजींनी दिले आहे मुक्ताबाई ही याच वयात तापीमाईच्या तीरावर पंचत्व पावली. तिच्या दोन मृत्युतिथी देण्यात येतात. शक १२२० तील वैशाख वद्य एकादशी अशी एक तिथी. दुसरी शक १२१९ च्या वैशाख वद्य द्वादशीची आहे. मुक्ताबाईचा जन्म शक १२०१ आश्विन शुद्ध प्रतिपदेचा. पहिल्या मृत्युतिथीप्रमाणे तिचे वय १८ वर्षे ७ मास २५ दिवस होते, तर दुसऱ्या तिथीप्रमाणे ते १७ वर्षे ७ मास व २६ दिवस होते. म्हणजे मुक्ताबाई मरणसमयी १७ वर्षांचीच होती. तसेच खुशनूद ही पण त्याच वयाची. डॉ. हक यांनी खुशनूद काल्पनिक पात्र असावे किंवा कवीची नातेवाईक असावी असे दोन्ही तर्क सांगितले आहेत. दुसरी गोष्ट, मुलीला वेदान्त सांगण्याची प्रथा आम्हाला उर्दू फार्सी साहित्यात कोठेच आढळलेली नाही. ई. जी. ब्राऊन याने असे एखादेही उदाहरण आपल्या साहित्येतिहासात नोंदविले नाही. डॉ. हक यांनी मात्र अशी प्रथा होती असे, कसलाही आधार नमूद न करता, सांगून टाकले आहे ( पाहा कदीम उर्दू पृ. ९ ). भारतीय परंपरेत अशी उदाहरणे किती तरी दाखविता येतील. गार्गी ही तर फारच प्राचीन. एकाने तर आपल्या कन्येला गणितशास्त्रही प्रश्नोत्तर रूपाने शिकविले आहे. मीराबाई, जनाबाई, वेणाबाई, बहिणाबाई या महिलाभक्तांची जुनी परंपरा आज देखील चालू आहे.

देवांच्या आळवणीचा प्रकारही सूफीपंथात आहे. शिवाय मस्नवी–आख्यानकाव्यात देवस्तुतीशी (Doxology) अंगभूत, मुनाजात हा प्रकारही एकप्रकारे देवाची, त्याला समोर प्रत्यक्ष पाहात असल्याचे कल्पून, स्तुति करणेही तोच प्रकार होय. परंतु प्रस्तुत खुशनामा काव्यात शब्दयोजना, भक्तिसंकेत आणि उपमादृष्टांत यांच्या विशिष्ट प्रयोगाने या काव्याला भारतीय भक्तिपंथातील काव्याचे स्वरूप प्राप्त झाले आहे. हे काव्य वाचीत असताना, काही फार्शी अरबी शब्द वगळले तर, आणि असे शब्द फारच कमी आहेत, आपण भारतीय भाषेतील एखाद्या संतमहिलेचे चरित्र वाचीत आहो, अशी भावना अहेतूकपणे मनात येते.

ज्ञानेश्वरांच्या समाधीप्राप्तीचा प्रसंगाच्या, आळंदी येथे नामदेवादी संतश्रेष्ठांच्या सान्निध्यात झालेला सोहोळा मराठी मनाच्या चांगला परिचयाचा आहे. टाळमृदंगाचा गजर, हरिनामाचा सामुदायिक उच्चार आणि दैवी प्रेमाने भक्तीत तल्लीन होणे हे दैवी दृश्य आहे. सर्वत्र चंदनआगरूंचा सुगंध दरवळून ऊर्ध्व दिशेने वाहत आहे. असेच खुशनूदच्या समाधी घेण्याचे वर्णन मीरांजीने केलेले आहे. डॉ. हक यांनी हे उतारे दिलेले नाहीत. पण त्यांचा सारांश व अभिप्राय सांगितला आहे ( पाहा कदीम उर्दू पृ. १५ ). हे प्रसंगवर्णनही चार भावंडांची स्मृती जिवत केल्याशिवाय राहात नाही. ज्ञानेश्वर व मुक्ताबाई ही ईश्वररूप झाली. खुशनूदचेही असेच वर्णन मीरांजीने खालील दोहार्धात केले

खुशनूदी जब अल्ला की सभीं निर्मल दूद।

देवीसिंग चौहान

• • •

# वृकोदर भीम हाच पांडव कथेचा नायक

( उत्तरार्ध )

• अ. ज. करंदीकर •

### याज्ञसेनी आणि युधिष्ठिर

या नीचातिनीच कौरवांच्याकडून स्वपत्नीची विटंबना होण्याला कारणीभूत झालेल्या युधिष्ठिराची नेमकी भूमिका काय होती, याचा इथे थोडा विचार केला पाहिजे. इलियड आणि महाभारत यांचा तुलनात्मक अभ्यास करताना सकृद्दर्शनीच दिसून येते की ग्रीकांची देवराज्ञी हेरा ( Hera ) ही महाभारतातील कुंती. तिचा एक पुत्र हेफास्तियस् ( गभस्ती ) आणि दुसरा आरेस्. हेच कुंतीचे युधिष्ठिर आणि अर्जुन. देवराज्ञी हेरा हिचा सावत्रपुत्र हेराक्लिज हा कुंतीचा भीम. ग्रीक पुराणे सांगतात की झेउस् देवाने पत्नीचे साहाय्य न घेताच आथेने या मतीदेवतेला जन्म दिलेला पाहून त्याच्या विक्रमाशी स्पर्धा करण्याकरिता त्याची राणी हेरा, हिने पति-संभोगावाचून हेफास्तियस्ला जन्म दिला. आपल्या पुराणातून पार्वतीने अशाच प्रकारे गजाननाला जन्म दिल्याचे आख्यान आहे. गजानन हा जसा सौंदर्यासाठी सुप्रसिद्ध नाही, तसाच हेफास्तियस्ही नाही. यासाठी मातेने प्रथम त्याचा त्यागही केला होता. पण मग हा अतिकुशल कारागीर म्हणून प्रसिद्धीला आ यानंतर त्याच्या मातेने रसिका, रतिदेवता आफ्रोदिते हिच्याशी त्याचा विवाह लावून दिला. हेफास्तियस् नुसता कुरूप नसून लंगडाही होता. या लंगड्या लोहारावर रतिदेवतेचे प्रेम नसल्याने त्याचा भाऊ युद्धदेव आरेस् याच्याशी ती चोरून संबंध ठेवीत असे. असल्या अवैध संबंधाची वार्ता लगेच पट्कर्णी होते. तशी ती होऊन हेफास्तियस्च्या कानावर आल्यानंतर त्याने त्या उभयतांना पकडण्याकरिता कोळ्याच्या जाळ्यासारखे अतिसूक्ष्म तंतूंचे पण अभेद्य असे जाळे निर्माण केले. त्या जाळ्यात एकेदिवशी त्या प्रणयी युग्माला पकडल्यानंतर त्यांच्या विलासाचे दर्शन घेण्याकरिता हेफास्तियस्ने इतर देवांना पाचारण केले. त्याच्या उलट युधिष्ठिराने आपल्या द्यूताच्या जाळ्यात द्रौपदीला अडकवून दिल्यानंतर कौरवसभेत आपल्या असहाय आणि अनावृत लावण्याचे प्रदर्शन करण्याकरिता तिला पाचारण केले; या लंगड्या हेफास्तियस्ला जसा आरेस्चा मत्सर वाटत होता, तसाच मनाने पंगू असलेल्या युधिष्ठिराला वीर अर्जुनाचा मत्सर वाटत होता. एकट्या अर्जुनावर खरे प्रेम करण्याच्या अपराधामुळे द्रौपदीला मरण आले, असेही महाप्रस्थानाच्या प्रसंगी युधिष्ठिराने बोलून दाखविले. हा मत्सर धर्माच्या अवतारापेक्षा हेफा-स्तियस्च्या अवताराला अधिक साजेसा आहे. हेफास्तियस् स्वतःच लंगडा होता. पण युधिष्ठिर ज्या यमाचा अवतार मानला आहे, त्या यमाचा पाय सडेल, असा त्याच्या सापत्न मातेने ( संज्ञेने ) अभिशाप दिला होता. अर्जुन ज्या नराचा म्हणजेच सुपर्णाख्यानातील सुपर्णाचा अव-तार, त्याचा वडील भाऊ अरुणही असाच पांगळा होता. या साऱ्या संदर्भावरून अरुण, यम आणि हेफास्तियस् या तीन पांगळ्यांचे पंगुत्व मानसिक पंगुत्वाच्या रूपाने युधिष्ठिराच्या वाट्याला आले होते, असे दिसते. ही गोष्ट लक्षात आली म्हणजे द्रौपदीला द्यूताच्या जाळ्यात अडक-विताना युधिष्ठिरानं हेफास्तियस्च्या अनुकरणाने आपल्या-वर प्रेम न करणाऱ्या, आपल्यापुढे पांडित्य मिरविणाऱ्या स्वपत्नीवर सूड उगविला आहे की काय, अशी शंका येते. विराटाच्या राजसभेतही कीचकाने लाथ मारल्यानंतर आक्रोश करणाऱ्या द्रौपदीलाच युधिष्ठिराने शैलूषीप्रमाणे वर्तन करण्यानिमित्त दोष दिला आहे. हेफास्तियस्च्या प्रसिद्ध कलाकृतीत त्याने बक ( Bacchus ) देवाची पत्नी आरियाद्ने हिच्याकरिता केलेल्या मुकुटाची गणना होते. युधिष्ठिर कलाकार नसला तरी सम्राट् या नात्याने त्याने आर्या याज्ञसेनीला राजमुकुट समर्पण केला होताच. हेफास्तियस्प्रमाणे युधिष्ठिराचा प्रतिस्पर्धी गुडाकेश अर्जुन हाही आरेस् म्हणजे मंगळच होता. आपल्या सार्व-भौमत्वाविरुद्ध कट करण्यात भाग घेतल्याच्या निमित्ताने झेउस् पित्याने हेफास्तियस्ला स्वर्गातून लोटून दिले

अनुक्रमणिका

होते. तीच गति धृतराष्ट्राने राजसूययज्ञानंतर युधिष्ठिराची केली. युधिष्ठिराप्रमाणेच हेफास्तियस्ही इलियडमध्ये शांतिपाठ म्हणताना आढळतो. झेउस्च्या आदेशावरून हेफास्तियस्ने मानवाला अग्नि देणाऱ्या प्रोमेथियस्ला कॉकेशस् पर्वतातील कड्याला खिळून ठेविले होते आणि तिथे नित्य एक गरुड त्याचे हृदय किंवा यकृत तोडतोडून खात असे. प्राचीन वैदिकपरंपरेत वायु हाच अग्नि अशी परंपरा होती. या वायुरूपी अग्नीचा अवतार असलेल्या भीमाला युधिष्ठिराने आपल्या प्रतिज्ञांच्या बंधनांनी वनवासाला आणि अज्ञातवासाला खिळून ठेविले होते.

## धर्मार्जुनांची वेदविरोधी भूमिका

युधिष्ठिराच्या चरित्राच्या उलगडा करताना ग्रीक पुराणांचा संदर्भ सांगणे उचितच आहे. कारण द्यूतप्रकरणांतली धर्मार्जुनांची भूमिका वेदविरोधी असल्याने अन्य देशांतील परंपरांतून त्या भूमिकेचे आधार पाहिले पाहिजेत. द्यूताचे वर्णन करताना दशममंडलातील सुप्रसिद्ध अक्षसूक्तांत म्हटले आहे. ' त्रिपञ्चाशः क्रीळति व्रात एषाम् देव इव सविता सत्यधर्मा उग्रस्य चित् मन्यवे न नमन्ते राजा चित् एभ्यो नम इत् कृणोति ॥ ' तीन तीन, पन्नास पन्नास अशा संचाने फाशांचा खेळ चालतो. ( तो खरेपणाच्या इतक्या ऐटीने की ) जणू काय सत्यस्वरूप सविताच अवतरला आहे. उग्र व्यक्तीच्या मन्यूला, क्रोधाला ते नमत नाहीत. उलट राजाच त्यांच्यापुढे नमतो. ' अन्ये जायां परिमृशन्ति अस्य अगृधत् वेदने वाजी अक्षः। पिता माता भ्रातरः एनम् आहुर्न जानीम नयत बद्ध एनम् ॥ ' तो बलाढ्य फासा ज्याचे धन जुगारीत पार हरून नेतो, त्याच्या जायेवरसुद्धा भलतेच लोक हात टाकतात. त्याचे पिता, माता, भाऊ म्हणतात की याला आम्ही ओळखत नाही, याला निःशंकपणे बांधून न्या. याप्रमाणे वेदांत द्यूत हा अधर्म आहे असे सांगून त्याच्या दुष्परिणामांचे विदारक वर्णनही केले आहे. इतकेच नव्हे तर ' अक्षैः मा दीव्यः कृषिम् इत् कृषस्व ' म्हणजे फाश्यांनी खेळू नकोस, कृषि कर; असा स्पष्ट उपदेशही केला आहे. असे असूनही धर्म द्यूतक्रीडेचा कडेलोट करतो आणि अर्जुन हे द्यूत आपल्याला कीर्तिकर आहे, असे म्हणतो, तेव्हा यांच्या विचारसरणीचे मूळ अन्यत्र शोधले पाहिजे, हे उघड आहे.

## धर्म आणि द्यूत

कौरव पांडवांचे युग प्रचलित युगापेक्षा सरासरी चार सहस्र वर्षांनी पुरातन असल्याने महाभारतातील आख्यानांची पार्श्वभूमि अर्वाचीन वाचकांना कळत नाही आणि त्यामुळे व्यासकृतीसंबंधी त्यांच्या मनात अनेक विकल्प येतात. अशा विकल्पांपैकी या द्यूतप्रकरणासंबंधीचे विकल्प विशेष महत्त्वाचे असल्याने त्यांचा इथे ऐतिहासिक पद्धतीने विचार केला पाहिजे. असा विचार केला म्हणजे कळून येते की द्यूतक्रीडा ही मुख्यतः पशुपालांची क्रीडा आहे. पशुपालांचे जीवन हे कृषकाच्या जीवनाच्या मानाने क्रीडाजीवनच होय. वामन पंडितांचे वनक्रीडेचे वर्णन आठविले तरी वाचकांना कळून येईल की पशु परस्पर चरत असतात आणि पशुपाल आपल्या करमणुकीकरिता नाना प्रकारचे खेळ खेळत असतात. धनी आणि दास यांचा जीवनक्रम समान असला म्हणजे त्या समाजात द्यूतक्रीडेला प्राधान्य मिळते. पशुपालांना आपले सारे धन द्यूतात गेले तरी त्याचे फारसे वाईट वाटत नाही. कारण धनी म्हणून नसल्यास दास म्हणून तरी त्यांचे सारे जीवन त्या पशूतच जावयाचे असते. धनी आणि दास यांचे जीवनक्रम जेव्हा भिन्न होऊ लागतात, तेव्हाच संपत्तीचे संरक्षण करण्याची द्यूतविरोधी मनोवृत्ति निर्माण होते. अशी मनोवृत्ती कृषीच्या विकासासह निर्माण होत असल्याने वरील वेदवचनात द्यूतक्रीडेवरील औषध म्हणून कृषि करण्याचा उपदेश केला आहे. पांडवकौरवांची पशुपालांच्या जीवनाविषयीची आत्मीयता त्यांच्या घोषक्रीडांच्या आणि गोग्रहणांच्या आख्यानातून सुव्यक्त झाली आहे. गोपाळ कृष्णाचे दादा बलराम हे हलधर असूनही पांडवांतील दादांप्रमाणेच द्यूतवेडे होते, ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. आपल्या दैवतांपैकी पशुपति शंकर, वर देण्याच्या प्रकरणी नसले तरी द्यूत खेळण्याच्या प्रकरणी विशेष सावध असल्याने ते आपल्या गिरिजेशीच द्यूतक्रीडा करीत. त्यामुळे त्यांचे पशुपतीचे पद एखाद्या द्यूतकाराला लुबाडता आले नाही.

## पशुपालयुग हे द्यूतधर्मांचे युग

पशुपालात द्यूत निंद्य तर मानले जात नाहीच; उलट धर्म्यच मानले जाते. आमच्या विद्वानांनासुद्धा ही गोष्ट अविदित असेल की द्यूत शब्दाचा एक अर्थ युद्ध असा होतो आणि युद्धात जिंकलेल्या धनाप्रमाणेच द्यूतात जिंकलेल्या धनालाहि कृत ही एकच संज्ञा लावतात. द्यूत आणि युद्ध यांच्या एकरूपतेमुळेच द्यूताला अथवा युद्धाला दिलेले आव्हान पशुपालांच्या राजांना नाकारता येत नसे. पशुपालांच्या युगात युद्ध आणि द्यूत यांची योग्यता

सारखीच होती, इतकेच नव्हे तर यातील एका क्रीडेचे दुसऱ्या क्रीडेत सहज परिवर्तन होत असल्यामुळे त्या दोन क्रीडांत फारसा भेद मानीत नसत. त्या काळात कलहांचा निर्णय एक तर द्वंद्वयुद्धाने होत असे, अथवा दैवाची अनुकूलता कोणत्या पक्षाला आहे,हे पाहून होत असे. केवळ द्वंद्वयुद्धाने सर्व विवादांचा निर्णय करणे ही मात्स्यन्यायाची परिस्थिति. तिच्या मानाने दैवाच्या अनुकूलतेवर विवादनिर्णय करण्याची पद्धती ही अधिक सुसंस्कृत. या पद्धतीचे दोष अर्वाचीन वाचकांस समजावून सांगावयाला नकोत. पण ही पद्धति प्रथम प्रचलित झाली, तेव्हा ती पूर्वीच्या द्वंद्वयुद्धाच्या निर्णयापेक्षा अधिक सुसंस्कृत, अथवा धर्म्य मानली जात होती. अशा प्रकारे मानवसमाजातील न्यायाचा तराजू आत्यंतिक हिंसेकडून अहिंसेकडे झुकला म्हणजे त्या समाजात निर्लज्ज वंचकांचे प्राबल्य होते, ही वस्तुस्थिति शकुनि, दुर्योधन, दुःशासन, कर्ण यांच्या द्यूतसभेतील वर्तनावरून व्यासांनी व्यक्त केली आहे. पण अशा वंचकांनी द्यूताला आव्हान केले असता धर्म आणि द्यूत यांचे परस्परसंबंध ध्यानात घेऊन धर्माला त्यांचे आव्हान नाकारणे का अशक्य झाले, हे वरील विवेचनाने अंशतः तरी कळून येईल. द्यूत हा धर्माचाच एक भाग असल्याने द्यूताच्या वेडानिमित्तच बहुधा युधिष्ठिराला धर्मराज म्हणत असावेत. हे त्याचे वेड वेदप्रामाण्याच्या विरोधी होते, हे पुन्हा एकदा सांगितले पाहिजे. काही समाजशास्त्रज्ञ म्हणतात, ' Civilization originated in games of chance. ' ( पारेतो खं. १ पान ५२३ )

### रक्त पणाला लावणे

द्यूतात दैव प्रतिकूल झाले तर आपले रक्त पणाला लाविले असता ते परत अनुकूल होण्याचा संभव आहे, अशी आर्यांची समजूत असल्याचे नोबेल पारितोषिक मिळविणारी स्वीडनची लेखिका सेल्मा लागेरलोएफ हिच्या एका कथेवरून कळून येते. एका जुगाराच्या प्रसंगाचे वर्णन करताना हिने लिहिले आहे. ' Stake then something that will change the ill luck. Stake the red blood of your own heart, Melchior; stake thy daughter.' या उपदेशाला अनुसरून मेल्शिओर शिंक्रेयरने प्रत्यक्ष कन्या नसली तरी कन्येने स्वेच्छेने निवडलेल्या वराला जावई करून घेण्याचे वचन कथेत पणाला लाविले. तरीसुद्धा तो हरलाच. या समजुतीला अनुसरूनच धर्मराजाने आपल्या कुटुंबातील पुत्र, बंधू यांना आणि शेवटी स्वतःलाहि पणाला लावून हरवून टाकले. पण या साऱ्या रक्ताच्या नातेवाइकांत अन्य गोत्रांतून आलेल्या पत्नीचा समावेश होत नाही, ही गोष्ट द्यूताच्या उन्मादात तो विसरला. या अधर्माकरिताच भीमाने युधिष्ठिराला बजावले. ' एषा ह्यनर्हती बाला पांडवान् प्राप्य कौरवैः । त्वत्कृते क्लिश्यते क्षुद्रैर्नृशंसैर्निकृतिप्रियैः ॥ अस्याः कृते मन्युरयं त्वयि राजन्निपात्यते । बाहू संप्रधक्ष्यामि सहदेवाग्निमानय ॥ ' याप्रसंगी द्रौपदीला स्वयंवरात जिंकणाऱ्या अर्जुनाने भीमाला आवरण्याकरिता हे द्यूत पांडवांना कसे कीर्तिदायक आहे, याचे विवेचन केले. ' आहूतो हि परै राजा क्षात्रधर्ममनुस्मरन् । दीव्यते परकामेन तन्नः कीर्तिकरं महत् ॥ ' स्वतःचे दास्य आणि स्वपत्नीची स्वनेत्रांसमक्ष होत असलेली विटंबना यांनाच महत्कीर्तिकर मानणाऱ्या पशुपालांना अथवा ' नर '—पशूंना नावे ठेवण्यात काहीच अर्थ नाही. त्यांच्या समजुतीप्रमाणे महान् द्यूतात भाग घेणे हे महान् युद्धात भाग घेण्याप्रमाणे महत्कीर्तिकर असल्यास त्यांनी त्या कीर्तीच्या कळसाकडे दृष्टि लावून द्रौपदीच्या विटंबनेकडे दुर्लक्ष्य करणे अपरिहार्य होते. पण धर्मार्जुनांच्या योग्यतेला भीम पोचला नसल्याने द्यूतसभेतील द्रौपदीच्या आगमनापासून त्याची दृष्टि तिच्या विटंबनेवर खिळून राहिली होती. या द्यूतकारांच्या सभेतील द्रौपदीच्या आगमनाने सारी परिस्थिति एका क्षणात कशी पालटून गेली, हे मॉड बॉडकिन् या इंग्रज लेखिकेने Archetypal Patterns in Poetry' या ग्रंथात अन्य निमित्ताने लिहिलेल्या पुढील वाक्यावरून कळून येईल. ' The man loyal to a man's code and outlook, discovers within himself woman alive and eloquent, pulsing with her own emotion, looking out on the world with her own vision. ' पुरुषांचे परस्परांशी वर्तन करण्याचे नीतिनिर्बंध आणि एकंदरीत पुरुषी विचारसरणी यांच्या जाडूच्या वर्तुळात, अकस्मात् एक जीवनसंपन्न, वक्तृत्वात अद्वितीय, स्वतःच्या अनिवार भावनांनी उसळणारी, उचंबळणारी आपल्याच दिव्य दृष्टीने सभोवतालच्या पुरुषी जगाकडे पाहणारी अशी द्रौपदी अनिच्छेनेच नव्हे तर तिच्या शत्रूंनी ओढून आणल्यामुळे प्रविष्ट झाली आणि तिने भीमाच्या अनुकूलतेच्या

या अमेरिकेतील आचार्यांना पुरेशी कल्पना आलेली नाही. या विद्वानांनी द्रौपदीने वस्त्रहरणप्रसंगी केलेले कृष्ण-स्मरण प्रक्षिप्त ठरविले आहे. पण साठाव्या अध्यायात 'कृष्णं च जिष्णुं च हरिं नरंच त्राणाय विक्रोश नयामि हि त्वाम् ॥' असे दुःशासनाने आधीच उपहासाने बोलून दाखविले असल्याने आणीबाणीच्या प्रसंगी द्रौपदीने केलेल्या कृष्णस्मरणाच्या प्रभावामुळे दुःशासनाला लज्जित आणि लांछित व्हावे लागल्याचा प्रसंग व्यासांना रंगवावयाचा होता, हे उघड आहे हे अवधान संभाळून सभापर्वाचे संपादन केले असते तर त्यांच्या हातून ही चूक झाली नसती आणि 'कृष्णं च विष्णुं च हरिं नरंच त्राणाय विक्रोशति याज्ञसेनी। ततस्तु धर्मोऽन्तरितो महात्मा समावृणोत्तां विविधैः च वस्त्रैः ॥' हा श्लोक त्यांनी प्रक्षिप्त ठरविला नसता. दुःशासनाच्या वचनात जिष्णूचा उल्लेख असताना द्रौपदीने तो उल्लेख टाळण्याचे कारण उघड आहे. इतर देवतेची प्रेतपुरीत चाललेल्या छळा-पासून एका देवाने म्हणजे नारायणानेच मुक्तता घडवून आणली होती आणि त्याचेच स्मरण इतरत्रा भारतीय अवतार अशा द्रौपदीने या नरकतुल्य छळाच्या प्रसंगी केले आहे. त्या प्रसंगी नामाच्या प्रभावानेच नरक देवतेला शरण आणले आणि नामानेच दुःशासनालाही शरण आणले.

• • •

## साभार स्वीकार

**मराठी व्याकरणाचे व्याकरण** : कृ. पां. कुलकर्णी–ग. मो. पाटील, ठोकळ प्रकाशन, पुणे ३०; १२ रु.

**स्वानंदजीवन** ( चांगदेवपासष्टीचे विवरण ) : पांडुरंग शर्मा. का. पां. कुलकर्णी, ५३२ अ-नारायण, पुणे ३०; १० रु.

**पदाती** ( कविता ): ना. मा. सरपटवार, विदर्भ साहित्य संघ, वणी शाखा; ( जि. यवतमाळ ), ३ रु.

**नवरोजी ते नेहरू**- गोविंद तळवलकर, मॅजिस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; ५ रु.

**सागर दिग्विजय** : द. वि. जोग, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे ३०; ३ रु.

**रसयात्रा** ( कुसुमाग्रज ) : संपादन वा. भ. बोरकर व शंकर वैद्य, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे ३०; ५ रु.

**टेकडीवरचे पीस** ( कथा ) : विद्याधर पुंडलिक, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ८ रु.

**असं झालं आणि उजाडलं** ( नाटक ) : श्री. ना. पेंडसे, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ५ रु.

**मराठी ग्रंथांचे आदर्श संग्रहालय** : अ. का. प्रियोळकर, मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई ४; ५ रु.

**भारतीय राष्ट्रवादाचे शिल्पकार बाळ गंगाधर टिळक** : गोवर्धन पारीख, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ४ रु.

**आवर्त** ( कविता ) : अनुराधा पोतदार, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४; ३ रु.

**श्री महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांच्या आठवणी** : संपादक व लेखक–प्र. के. टोसर, नागपूर प्रकाशक–रा. धों. कातार, वर्धा रोड, नागपूर; ३ रु.

# देवनागरी लिपीवरील काही आक्षेप व त्यांचे निरसन

● कृ. रा. परांजपे ●

महाराष्ट्र साहित्यपत्रिकेच्या जानेवारी-मार्च १९६८ च्या १६४ व्या अंकात श्री मधुकर ना. गोगटे यांचा ' मराठीसाठी रोमन लिपी ' हा लेख आला आहे. त्यांचे देवनागरी लिपीबद्दल बरेच आक्षेप आहेत, व त्यामुळे ही लिपी आजच्या यांत्रिक युगाला निरुपयोगी आहे, असे त्यांना वाटते. आणि त्यासाठी त्यांनी रोमन ध्वनिचिन्हे वापरून एक ' रोमनागरी ' लिपी सुचविलेली आहे. त्यांचे म्हणणे " लिपीसुधारणा ही मुद्रणाच्या सोयीसाठीच करावयाची असे नव्हे; तर मुळातच सुसंगतीसाठी ही सुधारणा आवश्यक आहे ".

( १ ) श्री. गोगटे यांचा पहिला आक्षेप असा आहे की, " देवनागरी लिपीचा संसार अक्षरांच्या विकृतीवर उभारलेला आहे. मात्रा, वेलांटी अशी स्वरचिन्हे अक्षरांना चिकटवून आपण अक्षरे विकृत करतो. देवनागरीच्या बाबतीत अनेक बाराखड्या आम्हांला नाहक अभ्यासाव्या लागतात. "

या आक्षेपाचा विचार करिताना एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे की, आज छपाईमध्ये असलेली देवनागरीची वळणे ही पूर्वापार एकसारखी अशीच होती असे नाही. मूलभूत तत्त्वे जरी एक असली, तरी सोयीसाठी वेळोवेळी त्यात फरक होत गेलेला आहे. ही लिपी मराठीकरिता महाराष्ट्रात व संस्कृतकरिता भारतात गेली निदान एक हजार वर्षे तरी चालत आली आहे. डॉ. तुळपुळे यांनी संपादिलेल्या " प्राचीन मराठी कोरीव लेख" यातील लिपीपत्राकडे नजर टाकल्यास, देवनागरी अक्षरांची आजच्याहून थोडी निराळी अशी अनेक वळणे पाहावयास मिळतील. हा निराळेपणा कोरण्याच्या सोयीसाठी व कोरण्याच्या लकबीमुळे आलेला आहे. पूर्वी शिळेवर लिहीत असत, तेव्हा बहुतेक शिळांची उंची अधिक व रुंदी कमी असे, म्हणून अक्षराचे घटक एका खाली एक जोडीत असत. नंतर ताडपत्र भूर्जपत्र वगैरे वापरात आल्यावर, उंची कमी होऊन लांबी वाढू लागली त्यामुळे अक्षरांचे घटक एकापुढे एक जोडण्यात येऊ लागले. डावीकडून उजवीकडे असा आडवा आणि वरून खाली असा उभा, हे दोन्ही क्रम देवनागरी लिपीत रूढ आहेत. त्यानंतर लोक कागदावर लिहू लागले व शिळाप्रेस सुरू झाले. त्यामुळे अक्षरांच्या वळणांमुळे आणखी थोडा फरक पडलेला दिसून येतो. शेवटी छपाई सुरू झाल्यानंतर जुळाईच्या सोयीसाठी अक्षरांच्या वळणात व लेखनपद्धतीत पुनः अल्पसा फरक झाला व अजून होत आहे. या सर्व वळणातील छपाईचे खिळे पाडण्यास जी सोईस्कर व सुंदर वाटली ती घेऊन आजची छपाईतील वळणे रूढ झालेली आहेत. त्यातदेखील सुरवातीला कलकत्त्याच्या व मुंबईच्या वळणात फरक दिसून येतोच. म्हणून देवनागरीच्या वळणांच्या युक्तायुक्ततेचा विचार करिताना, केवळ छापील वळणांचाच विचार न करिता, शिलालिखित, हस्तलिखित व छापील पूर्वापार वळणेदेखील विचारात घेतली पाहिजेत. यंत्रानुकूलतेसाठी कांही जुनी वळणे उपयुक्त होत असतील, तर त्यांचे पुनरुज्जीवन करावे लागेल. कारण ती वळणेदेखील देवनागरी लिपीचीच आहेत.

आता श्री. गोगटे यांच्या बाराखडीच्या आक्षेपाचा विचार करिता, देवनागरीतील मूळ स्वरचिन्हांत व बाराखडीतील स्वरचिन्हांत तत्त्वतः फरक नाही. त्यांच्या अवयवांचा क्रम, जागेची बचत करण्याकरिता, कांही मूळ स्वरांत आडवा व बाराखडीत उभा घेऊन स्वरचिन्हे बनविली आहेत, एवढेच.

' अ ' हा मूळ स्वर असून ' इ ' व ' उ ' हे त्याचे जिभेमुळे व ओठांमुळे होणार मुखविकार आहेत. इतर स्वर हे या तीन मूळ स्वरांतून दीर्घत्व, गुण व वृद्धी अशा ध्वनिविकारांनी निर्माण होतात. हे ध्वनिविकार ( Phonetic Change ) त्यांच्या रूपात ही ( Graphic

forms ) दिसून आले पाहिजेत, हे बुद्धिवादास पटले पाहिजे. तसे ते देवनागरी लिपीत दिसून येतात.

क. १ च्या तक्त्यातील पहिल्या ओळीत 'अ' या कंठस्वराचे विश्लेषण दिले आहे. त्यातील आकृती १ हे नादचिन्ह आहे व आ० २ हे ध्वनिकारक चिन्ह म्हणजे अकार रेषा आहे. नाद गतिमान असतो. ( गवई स्वर लावतो अथवा भोंगा वाजतो तसा ). तो खंडित केल्याशिवाय भाषेतील ध्वनी ( Phoneme ) निर्माण होत नाहीत. आ. २ मधील उभ्या रेषेने नाद खंडित होऊन 'अ' हा ध्वनी ( Phoneme ) निर्माण होतो.[१]

अर्धी, जोडलेली आहे. आ. ४ व ५ ही रूपे दृष्टिभ्रम टाळण्याकरिता उपयोगात आणली गेली नाहीत. आ. ६ हे रूप ४२ व्या शतकापासून ८ व्या शतका पर्यंत वापरांत होते. स्पष्टतेकरिता व लकब म्हणून वेलांटी आ. ७ प्रमाणे मागच्या डाव्या बाजूला वाढविली जाऊ लागली व दीर्घ वेलांटी उजव्या बाजूला वाढविली जाऊ लागली.[३] आ. ३ मूलस्वर म्हणून घेतली व आ ७ बाराखडीत घेतली.

तिसऱ्या ओळीत 'उ' चे विश्लेषण आहे. 'उ' च्या उच्चारणात जीभ खाली दबलेली असते, म्हणून ३ या नादचिन्हाचा खालचा कंस उकाराचा निर्देशक मानून

## तक्ता १

| स्वर | विकास | दीर्घत्व |
|---|---|---|
| अ = | ३ + ा | ा |
| इ = | अॅ - अॅ - ॆ = ि | ी - ि - ि |
| उ = | अ - अ - ५ - उ | ऊ - ऊ - ऊ |
| ए = | इ - अ - ऽा - ऽा - ा = े | े ै |
| ओ = | उ - अ - ~ - ा - ॅ = ो | ो ौ |

दुसऱ्या ओळीत 'इ' चे विश्लेषण दिले आहे. 'इ' च्या उच्चारणात जीभ वर उचलली जाते. म्हणून नादचिन्हातील वरचा कंस 'इ' चा निर्देशक धरून तो अकाररेषेला उलटा करून जोडलेला आहे. आ. ३, ४, ५, ६, व ७, ही सर्व 'इ' चीच रूपे होत. त्यांतील तात्त्विक बोध एकच आहे. आ. ३ मध्ये जागेच्या बचतीकरिता, अकार रेषा वर अर्धी व खाली

अकार रेषेला जोडलेला आहे. आ. ८, ९, १०, ११ व १२ ही सर्व 'उ' चीच रूपे होत. यातील ९ व १० दृष्टिभ्रम टाळण्याकरिता उपयोगात आणली गेली नाहीत. ११ वे रूप ४ थ्या ते ८ व्या १० व्या शतकापर्यंत उपयोगात होते. पुढे ते लकब म्हणून आ. १२ प्रमाणे वाढविले जाऊ लागले. आ. ८ मूल स्वर म्हणून व आ. १२ बाराखडीतील रूप म्हणून वापरात आले.

चौथ्या व पाचव्या ओळीत 'ए' व 'ओ' या स्वरचिन्हांचे विश्लेषण आहे. 'ए' मधील 'इ' व 'अ' चा क्रम आ. १५, १६ प्रमाणे डावीकडून उजवीकडे आडवा न घेता जागेच्या बचतीकरिता आ. १७, १८ प्रमाणे, वरून खाली असा उभा घेतला आहे. आ. १८ हे रूप जुन्या लेखातून आढळते, व आ. १९ हे प्रचलित छपाईतील रूप आहे. आ. १३ व १६ मूल स्वर व आ. १८ व १९ बाराखडीतील रूपे आहेत. १९ हे छपाईतील रूप आहे.

'ओ' मधील 'उ' व 'अ' चा क्रमदेखील आ. २२ प्रमाणे न घेता बचतीकरिता आ. २३, २४ प्रमाणे वरून खाली घेतला आहे. 'ओ' मधील उकार ॐ या चिन्हातील घेतला आहे. आ. २० मूल स्वर धरला आहे व आ. २५ बाराखडीतील रूप आहे. कानडी बाराखडीत हाच उकार घेतला आहे.

## तक्ता २

आणि मंडळी

यावरून दिसून येईल की देवनागरी लिपीत आद्य ( Initial ) व मध्य ( Medial ) अशी दोन दोन स्वर-चिन्हे नसून, एकच स्वरचिन्ह लिहिण्याच्या त्या दोन

तऱ्हा आहेत. पाश्चात्यांनी देवनागरीचे विश्लेषण न केल्यामुळे त्यांच्या हे ध्यानात आले नाही. दीर्घत्वाकरिता शेवटच्या मात्रेची पुनरावृत्ती हा एक देवनागरीचा सामान्य नियम आहे. याचा सविस्तर खुलासा माझ्या 'देवनागरी लिपीची घडण' या पुस्तिकेत पाहावा. तसेच इ, ई, उ व ऊ या स्वरांच्या बाराखडीतील जुन्या मात्रा चालू केल्यास त्या मुद्रणसुलभ होतील.[४]

वरील गोष्टी लक्षात घेतल्यास श्री. गोगटे यांच्या काना, मात्रा, वेलांट्यांच्या आक्षेपांचे निरसन व्हावयास व त्या बुद्धिवादास व सुसंगतीस पटण्यास हरकत नसावी. आता त्यांच्या दुसऱ्या आक्षेपाकडे वळू.

( २ ) त्यांचा दुसरा आक्षेप असा आहे " जेव्हा जोडाक्षरांचा प्रश्न येतो तेव्हा त्या विकृतया अतिशयच असंबद्ध ठरतात. अंत्यकान्याची, मध्यकान्याची व विनकान्याची अशी वेगवेगळ्या प्रकारची अक्षरे देवनागरीत आहेत व त्यांचे जोडाक्षरांचे नियम वेगवेगळे आहेत." आणि त्यांचा असा सवाल आहे की " देवनागरी लिपी आजच्या बुद्धिवादाला व द्रुतगतीच्या मागणीला पुरी पडते का ?"

या आक्षेपाचा विचार करिताना हे लक्षात घेतले पाहिजे की, देवनागरी अक्षरात शिरोरेखा आणि लंबरेषा यांचे स्थान फार महत्त्वाचे असून ते पूर्वापार चालत आलेले आहे. शिरोरेखा साधारणतः इ. स. पहिल्या शतकापासून, कोणत्या ना कोणत्या स्वरूपात भारतातील बहुतेक शैलीतून दिसून येते. तिचे स्वरूप कधी जाड बिंदू, कधी द्वि-जिव्हाकृति, कधी पोकळ अथवा भरीव त्रिकोण, कधी पोकळ अथवा भरीव चौकोन व शेवटी आडवी जाड अथवा बारिक रेघ असे दिसून येते.[४] प्रथम ही रेघ आखूड असे, पण नंतर ती अक्षरांच्या पूर्ण रुंदीइतकी लिहिली जाऊ लागली. ब्राम्ही व खरोष्ट्री लिप्यात शिरचिन्ह नव्हते.[५] पहिल्या दुसऱ्या शतकात ते काही ब्राम्ही अक्षरांतही लिहिले जाऊ लागले.[६] चौथ्या शतकापासून मात्र ते सर्व उत्तर भारतीय लिप्यांतील अक्षरात आवश्यक झालेले दिसते.[८] या रेघेचे कार्य शब्दातील एक अक्षर सूचित करण्याचे आहे.

दुसरी गोष्ट म्हणजे या शिरोरेखेला काटकोनात जोडलेली लंबरेषा होय या लंबरेषेला काना असेही म्हणतात. प्रत्येक अक्षरात, मग ते मुळाक्षर असो, किंवा बाराखडीतील अक्षर असो, किंवा जोडाक्षर असो, ही रेघ आवश्यक आहे. 'क' व 'फ' या अक्षरांत ती मधोमध आहे. यांना श्री. गोगटे मध्य कान्याची अक्षरे म्हणतात. ङ, छ, ट, ठ, ड, ढ, द, र, ल, ह आणि ळ, या अक्षरांत ती रेषा अक्षरांच्या डोकीवर शिरोरेखेला जोडलेली आहे. अर्थात सर्व अक्षरांची उंची समान राखण्याकरिता, या रेघेची उंची, इतर अक्षरांतील रेघेच्या निम्मी किंवा त्याहूनही कमी ठेवितात. या अक्षरांनाच श्री. गोगटे विनकान्याची अक्षरे असे म्हणतात. उरलेल्या अक्षरांत ती स्पष्टपणे उजव्या बाजूला पूर्ण उंचीच्या स्वरूपात लिहिलेली असते. यांना श्री. गोगटे अंत्यकान्याची अक्षरे म्हणतात ही लंबरेषा म्हणजे देवनागरी अक्षरांचा पाया म्हणजे **अकार** दर्शक रेषा होय. 'अ' चे उच्चारण झाल्याशिवाय त्याचे इतर स्वरांत रूपांतर होऊ शकत नाही व स्वरांच्या आधाराशिवाय व्यंजनांना अस्तित्व नाही, हा भाषाशास्त्राचा सिद्धांत आहे.[९] हा 'अ' सरळ उभ्या रेघेने व्यक्त केला आहे. या रेघेवाचून देवनागरी अक्षरांना अस्तित्व नाही.

प्रातिशाख्यातून व शिक्षाग्रंथातून स्पर्श, घोष, ऱ्हस्व, दीर्घ वगैरे भेद उच्चारावरून केलेले आहेत. तसेच लेखनावरून अयोगवाह, योगवाह व संयोगवाह असे तीन भेद केलेले आहेत.[१०] यांतील 'अयोगवाह' म्हणजे स्वरचिन्हे किंवा स्वराक्षरे होत. कारण ती 'अ' मूलस्वराचे विकार होत. आणि म्हणून ती **अकार** रेषेलाच जोडलेली असावी लागतात. व्यंजने ही 'योगवाह' आहेत. कारण ती अकार रेषेशी अथवा इतर स्वरचिन्हाशी जोडल्याशिवाय कार्यप्रवण होतच नाहीत. आणि 'संयोगवाह' म्हणजे जोडाक्षरे होत.. कारण ती एकाद्या स्वराशी अथवा स्वरयुक्त व्यंजनाशी जोडून लिहावी लागतात. देवनागरी वर्णमालेतील व्यंजने Monoconsonantal असतात व जोडाक्षरे Multiconsonantal असतात. तेव्हा एक **अकार** रेषा म्हणजे एक अक्षर–मग ते स्वर, व्यंजन अथवा जोडाक्षर कसेही असो–असे हे समीकरण आहे. बाराखडीतील स्वरविकार मात्रा याच **अकार** रेषेला जोडून लिहिलेल्या असतात. जोडाक्षरात व्यंजनचिन्हे अकाररेषा वगळून, उच्चारक्रमाने डावीकडून उजवीकडे जोडत जाऊन शेवटची एकच अकाररेषा ठेवितात, किंवा एकाच वरच्या शिरोरेषेला वरून खाली उच्चारक्रमाने शिरोरेखा गाळून लिहिली

जातात. जेथे अकाररेषा वगळता येत नसेल, तेथे अथवा शब्दाच्या शेवटी, शुद्ध व्यंजन हवे असल्यास, ही अकाररेषा '**हलंत**' चिन्हाने म्हणजे पायमोड चिन्हाने खोडली जाते. ( हा नियम कानडी लिपीतदेखील पाळला जातो. )

शिळेसारख्या आधारावर लिहिताना, ओळीतील अक्षरे कमी होतात म्हणून जोडाक्षरातील अक्षरे एकाखाली एक उभ्या क्रमाने लिहिण्याकडे प्रवृत्ती झाली व ताडपत्रा-सारख्या आधारावर लिहिताना, ओळीत अधिक अक्षरे बसू शकतात म्हणून अक्षरे एकापुढे एक आडव्या क्रमाने जोडू लागले. हे दोन क्रम असल्यामुळे जोडाक्षरांचे **दोनच** नियम आहेत. अर्धकान्याच्या अक्षरांतील अकार रेषेत थोडा फरक करून अथवा ती अक्षरे आडवी लिहून ( हे देवनागरीला मान्य आहे ) व जुन्या वळणाचे इकार व उकार घेऊन अक्षरे एकाच आडव्या क्रमाने लिहिता येतील. तेव्हा देवनागरीतील जोडाक्षरे बुद्धि-वादाला, सुसंगतीला व द्रुतगतीला पटण्यासारखी वाटावयास हरकत नसावी.

आतापर्यंत त्यांच्या सामान्य आक्षेपांचा विचार झाला. याखेरीज त्यांचे काही विशिष्ट अक्षरांबद्दल आक्षेप आहेत. त्यांचा आता विचार करू.

( १ ) '**द्व**' व '**द्ध**' या सारखी काही जोड-अक्षरे विरुद्ध क्रमाची आहेत असा त्यांचा आक्षेप आहे. या जोडाक्षरातील क्रम वरून खाली आहे. 'द' च्या खाली 'व' आणि 'ध' ही अक्षरे, त्यातील शिरोरेखा गाळून लिहिलेली आहेत. लिहिणाऱ्याच्या लकबीमुळे छपाईच्या सोईसाठी त्यांना प्रचलित रूप आलेले आहे. आता छपाईत वाटल्यास ती 'द्व' आणि 'द्ध' अशी विस्ताराने छापावीत. अथवा जोडरेषेचा एक खिळा नवीन पाडून 'द‿व' आणि 'द‿ध' अशी विस्ताराने छापावीत. तशी सोय देवनागरी लिपीत करता येण्यासारखी आहे. पायमोड चिन्ह डोकीवरील अर्ध्या **अकार** रेषेच्या खालच्या टोकाला यावे. 'ट्य' व 'द्य' या जोडाक्षरांच्या बाबतीत देखील तसेच करावे. ती अक्षरे 'ट‿य' 'द‿य' अशी लिहावीत व छापावीत, म्हणजे जोडरेषा हलंत चिन्हाचे काम करील.

त्यांचा तिसरा आक्षेप 'र' चे जोड विषम आहेत असा आहे. ते म्हणतात "ट्र हे अक्षर 'ट्रक' व 'ट्रम' ला चालते, पण Truman ला चालत नाही." 'ट' च्या खाली 'र' आडवे जोडून ( हे देवनागरीला मान्य आहे ) त्याखाली उकार लिहावा. पण तसे केल्यास अक्षरांची उंची वाढते. म्हणून तो शब्द 'ट्रूमन' असा लिहावा. 'ट्र' आणि उकार यांचा क्रम डावीकडून उजवीकडे असा घ्यावा. शिरोमात्रेची पृष्ठमात्रा व अधोमात्रेची पुरोमात्रा करण्याची प्रथा जुन्या हस्तलिखितात पहावयास मिळते शिवाय "चतुर्दिग्योजनीया च मात्रा वर्णस्य संगतौ।" असे एक वचन आहे. तसेही नको असल्यास जोडरेषेचा उपयोग करून 'ट‿रूमन्' असा, किंवा 'ट‿रुमन' असा लिहावा.

( ४ ) गोगट्यांचा चौथा आक्षेप—" 'Organic' हा शब्द देवनागरी लिपीत नीट लिहिता येत नाही. कारण रेफ व चंद्र यांची लढाई जुंपते." पण तो शब्द 'ऑर्गॅनिक्' असा अथवा सावरकरी 'न' घेऊन 'ऑर्‍गॅनिक्' असाही लिहिता येईल. दोष असेल तो सुधारणा न करणारांचा; लिपीचा नव्हे.

( ५ ) रेफामुळे गैरसोय होते, असा एक त्यांचा आक्षेप आहे. पण आता सावरकरी पद्धतीचा प्राचीन 'न' रूढ करता येण्यासारखा असल्यामुळे, रेफाला रजा देता येईल. 'वाऱ्याने कार्य केले' हे वाक्य 'वाऱ्याने काऱ्य केले' असे लिहावे. रेफाचा उच्चार 'र' च्या द्वित्तासारखाच होतो. तसेच 'पापपुण्य' हा शब्द देखील 'पापपुण्ण्य' असा लिहिता येईलच. व ते लेखन उच्चारानुवर्ती होईल.

( ६ ) त्यांचा पुढचा आक्षेप – "अर्धानुनासिक व अनुस्वार यांचा घोटाळा होतो. 'संत' व 'सन्त' या दोन रूपांमुळे कोषात त्यांची जागा बदलते." असा आहे. त्यामुळे काही बिघडणार नाही. जागा बदलली, तरी दोन्ही ठिकाणी अर्थ तोच राहील. इंग्रजीतील Gaol व Jail या शब्दांबद्दल कधी कोणी तक्रार करीत नाही.

( ७ ) गोगट्यांचा पुढचा आक्षेप – "एकच शीर्षबिंदू सर्व अनुनासिकांसाठी वापरला जातो. त्यामुळे शुद्ध उच्चारण होत नाही." अर्धानुनासिके वापरण्यास देवनागरी लिपीची मुळीच आडकाठी येत नाही. पण शीर्षबिंदूने देखील तेच कार्य घडते. शीर्षबिंदूचा उच्चार पुढील अक्षरांवर अवलंबून असतो. तो आपोआप घडतो. इंग्रजीतदेखील अनुनासिक चिन्हे नसल्यामुळे 'N'

अनुक्रमणिका

या एकाच अक्षराने ' म ' खेरीज सर्व अनुनासिकांचे काम भागते. उदाहरणार्थ Panther, And, Pinch, uncle व Button यांचे उच्चार पॅन्थर, ॲण्ड, पिञ्च, अङ्कल् व बट्ण् किंवा बटॅ्न् असे होतात. याच संदर्भात ते म्हणतात की, " ' अन्य ' या शब्दातील " न " आपण " विद्वान् " मध्ये वापरू शकत नाही ( विद्वा‍न ), येथे तो न् अकार घालून पूर्ण करावयाचा व नंतर हलन्त लावून तो अकार काढावयाचा." पण त्यांनी स्वतःच तो छपाईत ' न ' असा वापरूनही दाखविला आहे. तसा कोणाला लिहावयाचा असल्यास त्याला लिपी बाधक होणार नाही. आपण आपल्या नेत्रसुखासाठी प्रथम ' न ' लिहून, मग पायमोड चिन्हाने त्यातील ' अकार ' खोडून ते 'न्' असे लिहितो. ती लिपीची असमर्थता नसून लिहिणाऱ्याची लहर आहे. हे पायमोड अथवा हलंत चिन्हदेखील शुद्ध व्यंजन शब्दाच्या शेवटी हवे असल्यास, अथवा अर्धकान्याची अथवा मध्यकान्याची शुद्ध व्यंजने हवी असतील, तरच उपयोगात आणावयाचे असते. " हलयोगः क्वचित्कार्यः । " असे एक प्राचीन वचन आहे. ते चिन्ह ऊठसूट कोणी वापरीत नाहीत.

( ८ ) त्यानंतर ' रू ' या अक्षराच्या बाबतीत त्यांचे असे म्हणणे आहे की, " उकाराची शेपटी अक्षराखाली लावावयाची, हे आमचे तत्त्व आम्ही ' र ' च्या अक्षराबाबत मात्र अमलात आणीत नाही. तेथे ' रु ' ऐवजी ' रु ' असे आम्ही लिहितो. " ' रु ' यात ' र ' व ' उ ' यांचा क्रम वरून खाली आहे व ' रु ' यात डावीकडून उजवीकडे आहे. पण हे दोन्ही क्रम देवनागरी लिपीत मान्य आहेत. हे तत्त्वाला सोडून नाही. ' मूर्ति ' या शब्दाबद्दल श्री. गोगटे यांना मोठीच आपत्ती वाटते. त्यांच्या मते हा शब्द ' मू-इ-त्-र् ' असा लिहिला जातो, पण त्याचा उच्चार ' मू-र्-त्-इ ' असा आहे. त्यांना तसे वाटण्याचे कारण त्या शब्दातील रेफ व इकारमात्रेचे स्वरूप हे होय. यांपैकी रेफाचा विचार पूर्वीच झालेला आहे. इकार मात्रेचा मात्र थोडा खुलासा केला पाहिजे. वास्तविक इकार व ईकार मात्रा ' ि ' व 'ी' या स्वरूपात शिरोरेखेच्या वरच लिहीत असत.[१२] पण पुढे एकार, ओकार, रेफ या मात्रांचा भ्रम टाळण्याकरिता ऱ्हस्व इकार डाव्या बाजूला व दीर्घ ईकार उजव्या बाजूला साधारणतः आठव्या शतकापासून वाढविले जाऊ लागले. म्हणून ' मूर्ति ' हा शब्द ' मूर्ति ' असा अथवा ' मूर्‍ति ' असा, अथवा प्राचीन ' इकार ' घेऊन ' मूर्‍ते ' असा लिहावा. विस्तारानेच लिहावयाचा झाल्यास तो ' मृ – ूृ – र्‌ – त्‌ ि ' असा किंवा ' म – ू – ‿ – त – ि ' असा लिहावा. अक्षरांतील अकार रेषा मानावयाची नसल्यास इंग्रजीप्रमाणे, " मऊरतइ " असेसुद्धा देवनागरीत लिहिणे शक्य आहे. त्याला लिपीची बाधा पोचत नाही, अथवा तसे व्यक्तविण्यास लिपी असमर्थ आहे असे नाही. आपल्याला ते रुचत नाही म्हणून आपण तसे करीत नाही एवढेच. शेवटच्या तीन प्रकारांनी अक्षरांचे ठोकळे बनवूनही, श्री. गोगटे यांना हवा तसा तो शब्द मांडता येईल. लिपी तयार आहे, आपली मात्र तयारी पाहिजे. ताम्रपत्र, ताडपत्र यांसारख्या साधनांतील जागेच्या बचतीकरिता पूर्वी एकदा आपण वर्णसंकोच करीत असू. आता यंत्रयुगाच्या सोयीसाठी वर्णविस्तार करू या. वर्णविस्ताराचे तत्त्व श्री. गोगटे यांनाही मान्य आहे. व " सवयीने ते अंगवळणी पडेल " असेही ते म्हणतात. तेव्हा ' मूर्‍ते ' असे देवनागरी पद्धतीने अथवा रोमनप्रमाणे ' मऊरतइ ' असे लेखन व मुद्रण त्यांना मान्य व्हावे.

वास्तविक अक्षरबंधनाची म्हणजे निश्चित व नियमित अक्षरे ( Syllables ) तयार करण्याची पद्धत ( Syllabication ) हा एक देवनागरी लिपीचा महत्त्वाचा गुण आहे, हे श्री. गोगटे मान्य करतात. ते म्हणतात, " देवनागरीचा एक महत्त्वाचा गुण म्हणजे तिच्यातील लेखन बव्हंशी ध्वनि-अवयवानुसार ( Syllabic ) होते, व त्यामुळे लेखन संक्षिप्त होऊन वाचनास सुलभता येते, हे मान्य करावयास हवे. " देवनागरी लिपी त्याज्य ठरवून त्याऐवजी इतालिक घ्यावी असे म्हणणारे डॉ. शि. वा. भागवत हे देवनागरी लिपीचा दुसरा एक श्रेष्ठ गुण म्हणजे Vocalisation स्वरयोजन असा सांगून बाराखडीचे समर्थन करितात. ते आपल्या ' फोनेटिक फ्रीक्वेन्सीज इन मराठी ' या प्रबंधात म्हणतात, " Barakhadi or Swarakhadi is in fact a handy device to coin Syllables. Thanks to this Barakhadi one of the most ingenious devices in the history of writing. "

अशा तऱ्हेने देवनागरीचे स्वरयोजन (Vocalisaton) म्हणजे बाराखडी आणि तसेच अक्षरबंधन ( Syllabication ) ही लिपिविज्ञानाची दोन महत्त्वाची तत्त्वे, जी,



भारतीय लिप्या सोडून, जगातील इतर कोणत्याही लिप्यांत नाहीत, ती एकदा मान्य केल्यावर त्या लिपीचा त्याग का म्हणून करावा? ती तत्त्वे यंत्रानुकूल करण्याचा प्रयत्न करणेच अधिक श्रेयस्कर नव्हे का?

आता यंत्रानुकूलतेसाठी व द्रुतगतीसाठी त्यांनी जी 'रोमनागरी' लिपी सुचविलेली आहे, तिचा विचार करू. त्यांनी रोमन लहान व मोठ्या अक्षरांची मिसळ करून व त्यांच्या मते मराठी भाषेला आवश्यक तेवढे ध्वनी घेऊन ती लिपी तयार केली आहे. ती लिपी तयार करताना त्यांनी पुढील गोष्टी गृहीत धरलेल्या आहेत. (१) ऋ, ऌ, ङ, ञ, ष, हे उच्चार मराठी भाषेतून नष्ट झाले आहेत. (२) ऱ्हस्व-दीर्घ हा भेद संदर्भावरून ठरविला जातो. म्हणून दीर्घ अक्षरे असण्याचे कारण नाही. (३) महाप्राण अक्षरे ही 'ह' ची जोडाक्षरे आहेत, म्हणून त्यांची निराळी अक्षरे नकोत. (४) अॅ, ऑ हे स्वर व वर्त्स्य 'च' आणि 'ज' तसेच दंत्यौष्ठ्य 'फ' हे ध्वनी मराठीत नवीन आले आहेत. (५) ऐ व औ हे अ + इ व अ + उ असे जोडस्वर आहेत. (६) न व म या अक्षरांवरून सर्व अनुनासिकांचे काम भागते. त्यांनी एकूण आठ स्वर व चोवीस व्यंजने आवश्यक मानली आहेत. ती पुढे दिली आहेत. त्यांच्याच पुढे मी समान उच्चाराची देवनागरी अक्षरे दिली आहेत. रोमन अक्षरात जशी अकाररेषा नसते, तशीच ती देवनागरी अक्षरात देखील नाही, असे गृहीत धरले आहे. (एकेक अक्षर स्वतंत्रपणे वाचताना मात्र त्यातील अकार नसतानासुद्धा रोमनप्रमाणे आहे असे समजून वाचावयाचा) देवनागरी अक्षरे हीच रोमन अक्षरांची नावे मानली आहेत. श्री. गोगटे यांनी देवनागरी अक्षरात पायमोड चिन्ह वापरले आहे. तसे मी वापरले नाही. अक्षरे मात्र तीच आहेत.

## रोमनागरी वर्णमाला

a = अ, A = आ, e = ए, E = अॅ, i = इ, o = ओ, O = ऑ, u = उ, एकूण आठ स्वर.

b = ब, c = च़ (चार), C = च (चमचा), d = द, D = ड, f = फ़ (फ़ूट) g = ग, h = ह, j = ज़ (जीवन), k = क, l = ल, L = ळ, m = म, n = न, N = ण, p = प, r = र, s = स, t = त, T = ट, v = व, X = श, y = य, z = ज (जहाज) एकूण २४ व्यंजने.

या लिपीतील रोमन अक्षरांमुळे यंत्रानुकूलता व द्रुतगती साध्य होऊन मराठीचा कार्यभाग साध्य होतो असे जर श्री. गोगटे यांना वाटत असेल, तर तीच गोष्ट रोमन अक्षरांच्या समानत्वाची, वरील देवनागरी अक्षरे घेऊनही साध्य झाली पाहिजे. टंकपेटिकेतून उचलून जोडपट्टीवर अक्षरे मांडण्यास रोमन काय अथवा देवनागरी काय गोगट्यांनी सुचविलेल्या रोमनागरी पद्धतीने वेळ सारखाच लागणार. नमुन्यादाखल त्यांनी दिलेल्यापैकी दोन उदाहरणांचे लेखन रोमन व देवनागरी अक्षरात करून पाहू. स्वरयोजन व अक्षरबंधन त्यांच्या पद्धतीनेच ठेवू. आणि त्याचबरोबर देवनागरी पद्धतीनेही तोच मजकूर लिहून पाहू.

Roman-jana GaNa mana adhinAyaka

रोमनागरी-ज़अनअ गअणअ मअनअ अदहइनआयअकअ

देवनागरी-जन गण मन अधिनायक

रो.-Jaya he bhArata bhAgya vidhAta

रो. ना.-जअयअ हए बहआरअतअ बहआगयअ वइदहआतआ

दे. ना.- जय हे भारत भाग्यविधाता

रो - Anandi Ananda gaDe

रो. ना.-आनअनदइ आनअनदअ गअडए

दे. ना.-आनंदी आनंद गडे

रो. ikaDe tikaDe CohikaDe

रो. ना.-इकअडए तइकअडए चओहइकअडए

दे. ना.-इकडे तिकडे चोहिकडे

या उदाहरणांच्या लेखनात व छपाईत जागेची व वेळेची किती बचत हो ते ते सूज्ञ वाचकांनी ठरवावे. मला वाटते श्री. गोगटे यांचीच वर्णमाला घ्यावयाची झाली, तर देवनागरी अक्षरे काय वाईट आहेत? ती ग्राफिक व फोनेटिक दोन्ही दृष्टीने पूर्ण परिचयाची तरी आहेत. त्यापेक्षा अर्धकान्याच्या देवनागरी अक्षरांत, स्वरमात्रांच्या रूपात थोडा फरक केल्यास व त्यांच्या जोडाक्षरात (/) असे एक तिरकस जोडचिन्ह दिल्यास, प्रचलित देवनागरी लिपीतदेखील, श्री. गोगटे यांना हवी असलेली यंत्रानुकूलता व द्रुतगती सहज मिळू शकेल. देवनागरी लिपीचे आधुनिकीकरण करणे बरे तसे केल्यास तिला टाकून देऊन रोमन लिपीवर अत्याचार करण्याची गरज राहणार नाही. श्री. गोगटे कल्पक आहेत, त्यांना देवनागरीचे आधुनिकीकरण करणे सहज जमेल.

मी आजपर्यंत देवानागरी लिपीचा व ती सुधारण्याच्या प्रयत्नांचा जो अभ्यास केला आहे, त्यावरून, पूर्वपरंपरा







# परीक्षणे

## मराठी नियतकालिकांची सूची

मराठी वाङ्मयाच्या क्षेत्रात सूचीचे नवे युग सुरू झाले आहे असे दिसते. डॉ. म. प. पेठे यांची "ज्ञानदेव वाङ्मय सूचि", सौ. पुष्पा भावे यांची "विविध ज्ञान विस्तार लेख सूचि," प्रस्तुत "मराठी नियतकालिकांची सूचि" या सूची या युगाच्या द्योतक आहेत. यांपैकी प्रत्येक सूचीचे स्वरूप वेगवेगळे आहे; आणि "मराठी नियतकालिकांच्या सूची"चा व्याप आणि आवाका अन्य दोन सूचींपेक्षां खूपच विस्तृत आहे.

मराठी नियतकालिके हा महाराष्ट्राच्या सांस्कृतिक, सामाजिक, राजकीय जीवनाचा फार महत्त्वाचा घटक आहे. मराठी समाज आणि मराठी नियतकालिके परस्परांशी फार घनिष्ठपणे निगडित आहेत. त्यांचा अभ्यास झाल्याशिवाय महाराष्ट्राच्या इतिहासाचे पुरे, यथार्थ ज्ञान होणार नाही. मात्र आजवर हे साधन बव्हंशी दुर्लक्षित, अस्पृष्ट राहिले आहे. त्याचा उपयोग करण्यासाठी लागणारी चिकाटी, परिश्रम, ते करण्याच्या प्रवृत्तीचा अभाव हेच याचे कारण असावे. प्रस्तुत सूचीने त्या खोल कालार्णवाच्या तळी गेलेल्या उपेक्षित संचिताचे उद्धरण करून एकत्रितपणे दर्शन घडविले आहे.

शिक्षणसंस्था हे जसे लोकशिक्षणाचे एक साधन, तसेच नियतकालिके हेही जन-जागृतीचे एक साधन म्हणून महाराष्ट्रांत प्रारंभी जन्माला आले-विकसित झाले. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी राष्ट्रीय पुनरुत्थानाचे म्हणून जे उपक्रम आरंभिले, त्यात न्यू इंग्लिश स्कूलच्या स्थापनेबरोबरच, त्या आधीच, "निबंधमाले"चे प्रकाशन यांचा अंतर्भाव होता. मराठी नियतकालिके ज्ञानप्रसाराचे, लोकशिक्षणाचे साधन म्हणून मुख्यतः (बराच काल) चालवली गेली. केवळ धंदा म्हणून त्यांचे संचालन झाले नाही. मराठीमध्ये या साधनाचा अभिमान वाटावा असा विकास झाला आहे. ह्या विकासाचे दर्शन या सूचीत घडते.

**मराठी नियतकालिकांची सूचि** [१८००-१९५०], प्रथम खंड; कालिक वर्णन-कोश. संपादक–शंकर गणेश दाते, दिनकर विनायक काळे, शंकर नारायण वर्दे. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई १४. प्रका० १९६९, पृ. [४] + ४८ + ८ पर्ण-चित्रे + ६२८; किं. ७५ रु.

### परिचय

एका अर्थाने प्रस्तुत प्रथम-खंड हा शारीर खंड आहे. यापुढील नियतकालिकांतील ज्ञानवाहक लेखांची द्विखंडात्मक वर्गीकृत सूची हा अंतरंग खंड होईल. या प्रथम-खंडाचे मुख्यतः तीन भाग आहेत.

(१) वर्णन-विभाग यात मराठीतील इ. स. १८०० ते १९५० अखेर (वस्तुतः १८३२ ते १९५०) या कालखंडातील छापलेल्यांपैकी उपलब्ध झालेल्या पाक्षिकांपासून वार्षिकांपर्यंत १३७० नियतकालिकांची आवश्यक ती सर्व माहिती, थोडक्यात नेमकी दिली आहे. [तिचा तपशील 'प्रास्ताविक सूचने'त संपादकांनी दिला आहे] मुख्य भागातील नोंदीनंतर मिळालेल्या नियतकालिकांची किंवा मुख्य भागातीलही नियतकालिकांची अधिक मिळालेली माहिती वर्णन-विभागाच्या पुरवणीत छापली आहे. हा विभाग या सूचीचा गाभा होय. तो सर्वांत मोठा–पृ. १ ते ४६४ एवढा आहे.

(२) यापुढे संदर्भ-विभाग–पृ. ४६५ ते ५४७. यात या कालखंडातील नियतकालिकांच्या याद्या वेगवेगळ्या वर्गवारीने दिल्या आहेत. (अ) नियतकालिकांची कालानुक्रमाने यादी. त्यावरून मराठी नियतकालिकांचा विकासक्रम, त्यांची महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक जीवनाशी निबद्धता यांचा शोध घेता येईल. (ब) स्थलानुक्रमाने यादी. तिच्यावरून महाराष्ट्राच्या प्रादेशिक प्रगतीचा तलास घेता येतो. (क) जीवनमानानुक्रमाने यादी. त्यावरून मराठी नियतकालिकांचे अल्पजीवित्व, त्यांचे कमी-जास्त आयुर्मान, कोणती नियतकालिके दीर्घजीवी ठरली, कशामुळे, दर्जा आणि जीवनमान यांचा संबंध काय वगैरे अनेक गोष्टींची मीमांसा करता येईल.


अनुक्रमणिका

( ड ) विषयानुक्रमाने यादी.

संपादकांनी अभ्यासकांना जेवढे साहाय्य करता येईल तेवढे केले आहे. त्यांना पुष्कळच सामग्री उपलब्ध करून ठेविली आहे.

(३) तिसऱ्या, 'परिशिष्ट-विभागा'त (पृ. ५४८-६२८) या कालखंडातील नियतकालिकांच्या जेवढ्या संपादकांची माहिती उपलब्ध झाली, तेवढी अतिशय मेहनतीने संपादून दिली आहे. परिचय-विभागालाही पुरवणी जोडली असून अखेरपर्यंत उपलब्ध होईल तेवढी माहिती नोंदवून ठेवण्याची कोशीस करण्यात आल्याचे त्यावरून दिसते.

याशिवाय, आरंभी, या सूचीचे प्रवर्तक आणि प्रेरक शं. ग. दाते यांचे ' जीवन-दर्शन ' घडविले आहे. ३२ नियतकालिकांच्या मुखपृष्ठांची छायाचित्रे दिली आहेत. नियतकालिकांविषयी माहिती संकलित करणाऱ्या ' काही आधीच्या प्रयत्नां ' चा परिचय करून दिला आहे.

## ' ग्रंथ-प्रवेश '

प्रत्यक्ष सूचीच्या आरंभी संपादकांनी जो ग्रंथ-प्रवेश ' करून दिला आहे, तो या खंडाचा महत्त्वाचा विशेष आहे. यात या काळातील नियतकालिकांचा अभ्यास आहे. स्वतः संपादकांनी 'ग्रंथ-प्रवेशा'च्या आरंभी सार्थपणाने म्हटले आहे, ' प्रस्तुत वर्णन-सूची-मध्ये आणि संदर्भ-विभाग, परिशिष्ट--विभाग यांतून इतकी विविध प्रकारची माहिती एकत्र करून दिली आहे की, अनेकांना त्या त्या प्रकारच्या सामग्रीचे निरीक्षण करून आपल्याकडील नियतकालिक–विश्वावर अनेक निबंध–प्रबंध तयार करता येतील.' आणि त्याप्रमाणे नियतकालिकांच्या अभ्यासाच्या अनेक दिशा ग्रंथ-प्रवेशांत सूचित करून ठेवल्या आहेत; त्या दिशेने काही विवेचन केलेही आहे. संक्षेपाने संपादकांनी अनेक मुद्द्यांचा परामर्श घेतला आहे. घेतला आहे त्यापेक्षा अधिक सुचवले आहे. त्या दिशेने पुढे जायला अवसर आहे.

या प्रास्ताविकाचा मनोज्ञ विशेष हा आहे की, यात केवळ जड, रूक्ष तपशील नाही. तसा तो असता तरी ते अपेक्षितच झाले असते. पण संपादकांना या नियत-कालिकांमधील सचेतनत्व, त्यांचे व्यक्तिमत्त्व, त्यांतील विकसनशीलता जाणवली आहे, आणि त्याचा प्रत्यय ते वाचकालाही जाणवून देत आहेत.

या सर्व प्रस्तावनेत मराठी नियतकालिके, त्यातून मराठी मनाची वाङ्मयाभिरुचि, त्याची इतर सांस्कृतिक-वैज्ञानिक रुची यांचा शोध घेण्याचे सूत्र अंतर्हित आहे. समकालीन इतिहासाचे सूक्ष्म धागे-दोरे, मोलातोलाची व्यक्तिमत्त्वे आणि विविध व विचित्र परिस्थिति यांचे पैलू यांचा शोध नियतकालिकांतून घेता येतो. ती दृष्टीहि या प्रस्तावनेमागे आहे.

' ग्रंथ-प्रवेशां 'तील नियतकालिकांच्या अभ्यासांतर काढलेले कांही निष्कर्ष रूढ समजुतींना धक्का देणारे, आणि म्हणून चिंत्य आहेत. सामाजिक, वैचारिक परिवर्तनांतील महत्त्वाचा वाटा नियतकालिकांचा आहे असा एक मान्य समज आहे. पण संपादकांचा निष्कर्ष आहे तो–' मराठी वाचकाची दृष्टी अजूनही करमणूक-प्रधानच आहे. ...एकंदरीत विशिष्ट विषयांना वाहिलेली लोकप्रिय होण्यासारखी नियतकालिके आपल्याकडे वाढत नाहीत...आपल्या नियतकालिकांची समाजपरिवर्तनाला प्रेरणा देण्याची असमर्थता व घडत चाललेल्या समाजपरिवर्तनाची दखल घेण्याची अपात्रता यांचे स्वरूप ध्यानांत येईल. ' [ ग्रंथ-प्रवेश, पृ. १७–१८ ] . खास अगर प्राधान्याने देखील भाषाशास्त्राला वाहिलेले या कालांत एकही नियतकालिक नसावे आणि विज्ञानाला फक्त नावापुरता अवसर असावा हे शल्य लक्षांत आल्या-शिवाय रहात नाही. ही बाब मराठी भाषेतील वाङ्मयाला शुद्ध ज्ञानाच्या उपासनेबद्दल केवढा मोठा कंटाळा वा जणू अन्नद्वेष आहे याचे पुनः एकदा प्रत्यंतर आणून देते. ' [ ग्रंथ-प्रवेश. पृ. १९ ]. ही घटनासिद्ध वस्तुस्थिती असली, तरी तत्कालिन साक्षरतेच्या–शिक्षणप्रसाराच्या विचारा-विना, समकालीन परिस्थितीच्या विचाराविना ही मीमांसा पुरी होऊ शकणार नाही.

थोड्या अवकाशात खूप आशय साठवून ठेवायचा असल्याने ' ग्रंथ-प्रवेशा 'चे लेखन अतिशय सघन झाले आहे. पण खंड्या लेखनशैलीचा नमुना म्हणून ही शैलीही लक्षणीय आहेत. त्यांतील ' अधिक संवेदनाक्षम साप्ताहिकादि वृत्तपत्रे ' (पृ. १६ ) यांतील ' संवेदनाक्षम ' या विशेषणाचा वापर, ' शिक्षक व बालक या सुरक्षित वर्गांतील लोकप्रियता ' ( पृ. १७ ) यांतील ' सुरक्षित वर्ग ' हे नेमके वर्णन अशासारख्यांतून या शैलीच्या लेखनसौंदर्याचाही आल्हादकारक प्रत्यय येतो–जो सहसा अशा स्वरूपाच्या लेखनात आढळत नाही.

### विशेष

दाते यांच्या "मराठी-ग्रंथ-सूची" पेक्षा या सूचीचा एक महत्त्वाचा 'अधिक विशेष' आहे. कोणतेही पुस्तक प्रत्यक्ष बघितल्याशिवाय त्याची नोंद करावयाची नाही ही दाते यांची प्रतिज्ञा होती; आणि तिच्यासाठी त्यांनी अतोनात कष्ट घेतले. ते अनुकरणीय–आदर्शच होते. पण अशा प्रचंड संशोधनामध्ये त्यांच्याकडेही, त्यांना प्रत्यक्ष बघायला न मिळालेल्या पण ज्यांचे विश्वसनीय उल्लेख अन्यत्र मिळाले अशा अनेक पुस्तकांची नावे जमा झाली असली पाहिजेत. त्यांनी त्यांची नोंदही परिशिष्ट म्हणून करून ठेवली असती, तरी आज ती अगदी नामशेष झाल्यासारखी झाली आहेत, ती झाली नसती. ही उणीव या सूचीमध्ये दूर केली आहे. नियतकालिके प्रत्यक्ष बघण्याचा प्रचंड उद्योग तर केला आहेच, पण अशी प्रत्यक्ष बघायला न मिळालेली, पण ज्यांची विश्वसनीय माहिती अन्य आधारांवरून मिळाली त्यांचीही नोंद तशा आधारावर करून ठेविली आहे. पुढे कुणाला ती मिळाली तर मिळतीलहि. त्यांच्या शोधाचा मार्ग खुला राहिला आहे.

नियतकालिकांशी संबद्ध अशा इतर साधनांचा, पुस्तकादिकांचा उपयोग केल्याने ही सूची म्हणजे केवळ संकलन न राहता, तिचे अभ्यासमूल्य वाढले आहे.

माहितीचे संशोधन, संकलन, संपादन आणि त्यावरून अनुमान-विश्लेषण असे हे सर्वांगीण काम झाले आहे.

सूचीतील प्रत्येक नोंदीनोंदीमध्ये शक्य तेवढा काटेकोरपणा आहे, दक्षता आहे. 'प्रमाण संदर्भ-ग्रंथ' हे तिचे सर्वार्थाने समुचित वर्णन होईल. याद्या देताना, अनुक्रम ठरवताना सर्वत्र पद्धतशीरपणा, शास्त्रशुद्धता, विशिष्ट दृष्टी दिसेल. कामाचा वारकावा 'ग्रंथ-प्रवेशा' वरूनही दिसेल.

सूचीमध्ये थोड्या अवकाशात खूप माहिती भरलेली आहे. त्यात विखुरलेले माहितीचे कण एकत्र करून त्यातून अनेक दिशांनी अभ्यास करता येईल–करायला हवा. महाराष्ट्राचा वाङ्मयीन–सांस्कृतिक–सामाजिक–राजकीय इतिहास यात गुप्त आहे. तो प्रकट करायला हवा. मराठी नियतकालिकांमधील प्रेरणा, त्यांतील प्रवृत्ती, त्यांमधील कालसापेक्ष बदल आदींचा अभ्यास करता येईल. केवळ कोणकोणते विशेषांक निघाले याची माहिती संकलित केली तरी ती उद्बोधक होईल. अंक मागासणे, गाळणे, जोडअंक काढून खंड भरून काढणे यांसारख्या गोष्टींवरूनही काही प्रवृत्तींचा बोध होऊ शकेल. ही सर्व माहिती केवळ रूक्ष नाही. नीट बघितले तर त्यात रंजक माहितीही कितीतरी मिळते.

### काही दुरुस्ती–पुस्ती

अशी सूची संपूर्ण असल्याचे कधीच म्हणता येत नाही. ती नेहमीच संदर्भोपयोगी असते. वारंवार आधारासाठी पाहात असता, त्याचे विशेष जसे अधिक लक्षात येत जातात; तशा त्यातील काही त्रुटीही जाणवू लागतात. परंतु त्या सर्वाला मूलाधार या सूचीच्या प्रचंड कामाने पुरविला आहे. त्यात मागाहून भर पडत जाणे, त्याची पूर्तता होत जाणे हे स्वाभाविक आहे. माझ्या स्वतःच्या अभ्यासात मला ज्या काही त्रुटी, विसंगती आढळल्या किंवा जी अधिक माहिती मिळाली, ती या प्रचंड कामाला आपलीही एखादी वीट लागावी या भावनेने, त्रोटक रूपाने येथे नोंदवून ठेवली आहे. त्यातही सुधारणेला वाव असणे शक्य आहे. एवढ्या मोठ्या कामात अशा काही उणिवा, त्रुटी–राहू नयेत हे खरे असले तरी-राहणे अपरिहार्य आहे. साधनांचा अत्यंत अपुरेपणा, सर्व कामे मुळापासून संपादकांनाच करावी लागणे वगैरे नानाविध कारणे यामागे असतात. शोध घ्यावा तरी कुठे आणि किती!

**अंजलि:** षण्मासिक. सूचीत नोंद नाही. पहिला अंक १९५० मध्ये.

**अरुण:** मासिक. संपादक मो. ग रांगणेकर. वर्णन-विभागात रांगणेकरांच्या नावावर 'अरुणमाला' मासिक आहे. (पृ १०). परिशिष्ट विभागात रांगणेकरांवरील चरित्रटीपेत 'अरुणमाला' आणि 'अरुण' असा दोघांचा उल्लेख आहे. "सन १९२५ सालचे मराठी वाङ्मय" [१९२७] या पुस्तकात केवळ 'अरुण' असा उल्लेख आहे. यातून प्रसिद्ध झालेल्या "मी आणि माझे लेखन" लेखमालेच्या पुस्तकावृत्तीत 'अरुण' असाच उल्लेख आहे.

**ॐ वाङ्मय:** मासिक. [नासिक?] संपादक नाथ निफाडकर (सूचीत नोंद नाही. संदर्भ 'प्रतिभा' २८ ऑगस्ट १९३३, पृ. ७)

कन्याशिक्षकाच्या संपादिकेचे नाव सूचीत नाही. पण संपादिका म्हणून मिस्. आर. नवलकर यांचा उल्लेख मिळतो. ( " सन १९२५ सालचे वाङ्मय " ).

**कल्पना** या सूचीत नसलेल्या नियतकालिकाच्या १९४७ च्या दिवाळी अंकाचा उल्लेख "वाङ्मयीन समालोचन १९४७", ( पृ. ५५ ) मध्ये आहे.

**काव्यरत्नावलि :** ४२ वर्षे चालल्याचा ( आणि पुढील माहिती मिळत नसल्याचा ) येथे उल्लेख आहे. परंतु भ. श्री. पंडितांनी "संचय" या आपल्या लेख-संग्रहात [ १९६६ ] काव्यरत्नावलि जवळ जवळ सेहेचाळीस वर्षे चालल्याचा निर्देश केला आहे. ( पृ ७६ ). [ आणि गं. दे. खानोलकरांनी ' साहित्य सहकार '–मधील ' काव्यरत्नावलिकार ' या लेखात ( जून १९६२, पृ. ३ ) ते सतत पन्नास वर्षे चालवल्याचे म्हटले आहे ].

**चंद्रिका :** मासिक. सूच , पृ. ८६ वर ' संपादक कोल्हापूरचे कोणी काशीकर असे कळते ' असे विधान उद्धृत केले आहे. ना. म. भिडे यांनी ' सुभाषित व त्याचे विशेष ' लेखांक २ ( वि. ज्ञा. विस्तार, डिसें. १९२८ ) मध्ये एका काळी प्रसिद्ध असलेल्या ' चंद्रिका ' मासिकात ( संपादक के. स. काशीकर )···असा उल्लेख केला आहे. सूचीतील पृ. ८५-८६ वरील ' चंद्रिका ' आणि पृ. ४२९ वरील ( पहिले ) ' चंद्रिका ' हे दोन्ही उल्लेख एकाच मासिकाचे असावेत का ?

**तरुण शिपाई :** या नावाच्या मासिकाची नोंद पृ. ४३१ वर आली आहे. पण हे मासिक १९५० मधील. "केशवसुत : काही दृष्टिकोन" या मु. गो. देशपांडे यांच्या पुस्तकात ( १९६८ ) पृ. ६० वर पुढील माहिती आली आहे.—' ···मराठीत ' सिंहनाद ' आणि ' तरुण शिपाई ' या नावाची नियतकालिके प्रसिद्ध होत असत असे पुण्याच्या साल्वेशन आर्मीच्या कचेरीत चौकशी केल्यानंतर मला समजले. ' सिंहनाद ' १८८८ मध्ये प्रथम प्रसिद्ध होऊ लागले. ' नवा शिपाई '— आता ' तरुण शिपाई ' त्याच सुमारास प्रसिद्ध होऊ लागले असावे. ' पैकी ' सिंहनाद ' ची नोंद सूचीत आहे ( पृ. ४६२ ).

**बालिकादर्श :** सूचीत १९१७ ते १९१९ पर्यंतच्याच अंकांची नोंद आहे. परंतु १९२५ च्या सुमारासही ते असावे. ( संदर्भ: " सन १९२५ सालचे वाङ्मय " ).

**मन्दार :** सूचीत नसलेल्या या मासिकाचा उल्लेख ' साहित्य सहकार ' मासिकाच्या मे १९६९ च्या अंकातील माधव केशव काटदऱ्यांच्या ' माझ्या आठवणी ' त आला आहे. ( पृ. ११ )—' खेळगडी-खेरीज जाणत्या वाचकांसाठी म्हणून मनोरंजन मासिकाप्रमाणेच ' मन्दार ' नावाचे एक नमुनेदार मासिक चालू करण्याचा [ १९१२ चा सुमार ] त्यांचा ( बाळकृष्ण रावजी पालवणकरांचा ) विचार होता. ' हे मासिक निघाले की नाही याची पुढे माहिती नाही.

**मराठी नवजीवन :** सूचीत नोंद नाही. संदर्भ ' प्रमोद ' मासिक, जानेवारी १९२२, मलपृष्ठ २.

**विद्याकल्पतरु :** या मासिकाच्या माहितीत अंतर्गत विसंगती दिसते. त्याचे ३६ अंक निघून ५७६ पृष्ठे प्रसिद्ध झाल्याचे सूचीत म्हटले आहे. पण त्या आधीच, ' विशेष माहितीत ' पस्तीस अंक पुरे झाल्यावर कर्ता दिवंगत झाल्याच्या वृत्ताचा उल्लेख केला आहे. मग ३६ अंक आले कुठून ? या मासिकाचे ३५ अंक निघून ५६० पृष्ठांचा मजकूर प्रसिद्ध झाल्याची माहिती ब्रिटिश म्युझियममधील संग्रहाच्या आधारे प्रसिद्ध झाली आहे. [संदर्भ : ' विद्याकल्पतरु,' गं. दे. खानोलकर, मराठी संशोधन–पत्रिका, एप्रिल १९६९, पृ. १८६ ].

नियतकालिकाची माहिती देताना त्यातून त्या विशिष्ट नियतकालिकाचा दर्जा काय होता, त्या अर्थाने त्याचे प्रत्यक्षातील स्वरूप काय होते त्याचा बोध करून देता आला असता, त्याच्या अंतरंगपात्रतेवर अभिप्राय आला असता तर अधिक बरे झाले असते. नियतकालिकांना त्यांच्या संपादकांनी जाहीर केलेला उद्देश यात सांगितला खरा; पण तो प्रत्यक्षात किती फलद्रुप झाला, ते कळावे अशी अपेक्षा निर्माण होते. ' वाङ्मयविहार ', ' निबंध ' ' गोष्टी ' या सारखे शब्दप्रयोग ढोबळ असतात. त्यांतून यथार्थ बोध होत नाही. ही अपेक्षा सूचीतून करणे कदाचित अवाजवीही ठरेल. ते अधिक कालावधीचेही आहे. सूचीला मर्यादा असतात. या प्रकारच्या अभिप्रायाला जागाही कदाचित अधिक लागली असती. पण येथे दिलेली ' ब्रीदवाक्ये ' वायलाच हवी होती असे नाही. त्यातून नियतकालिकाच्या स्वरूपाचा बोध होतोच असे नाही. अनेकदा ब्रीदवाक्याचा नि नियतकालिकाचा स्वरूपाच्या काही संबंध नसतो ! येथे

अनेक सुभाषिते एकत्र वाचायला मिळतात; त्याने रंजकता वाढते. पण ते अशा सूचीचे साध्य नव्हे.

काही धोरणामुळे अनिवार्यपक्ष म्हणून काही गोष्टी पत्करान्या लागतात. त्यातली एक गोष्ट म्हणजे नवे शुद्धलेखन. प्रस्तावनादी मजकुरात ते रास्त आहे पण पुस्तके किंवा मासिके यांच्या नावाचे तरी नवशुद्धिकरण व्हावयाला नको होते. (उदा० "ज्ञानोदयाची पहिली शंभर वर्षे", 'मुलांचे मासिक'. ब्रीदवाक्यांचे नवशुद्धिकरण तर अगदी अप्रयुक्त होते. (उदा० 'ती ती पदे... पृ. ५१)

## परिशिष्ट विभाग

या कालखंडातील नियतकालिकांच्या संपादकांची त्रोटक चरित्र-टिपणे संपादकांनी 'परिशिष्ट विभागा'त संकलित केली आहेत. अशा कामाचा ज्यांना यत्किंचितही अनुभव आहे अशांनाच त्यातील प्रचंडपणा आणि बिकटपणा यांची कल्पना येऊ शकेल. अजूनही अशा कार्याविषयींची सार्वजनिक उदासीनता, त्याच्या दीर्घकालीन महत्त्वाचे अनाकलन, अज्ञान फार आहे. प्रथम अशा कार्याचे महत्त्व पटवून देण्याचीच आवश्यकता असते. अशा परिस्थितीत एवढी माहितीही गोळा करायला किती शिकस्त लागली, आणि मेहनत खर्ची पडली याचे निवेदन संपादकांनी 'प्राक्कथना'त केलेच आहे. इतिहासात खोल विस्मृत झालेल्या अनेक संपादकांची नावे, त्यांचे कर्तृत्व येथे प्रथम एकत्र नोंदविले गेले. भूतकाळातून अक्षरत्वात त्यांना उत्थापन मिळाले. तथापि या काळातील १५३६ संपादकांपैकी ८४९ संपादकांचीच (म्हणजे ५५-५६ टक्के) माहिती मिळवता आली. यावरून या बाबतीत अजून संशोधनाला बराच वाव आहे हे लक्षात येईल.

परिशिष्ट-विभागातीलही काही दुरुस्तीपुस्ती, काही धोरणविषयक विसंगती, वर्णन-विभाग आणि परिशिष्ट-विभाग यांतील काही नोंदीतील विसंगती या ठिकाणी अधिक संशोधनार्थ नोंदवून ठेवीत आहे.

अर्नाळकर बाबुराव सखाराम यांचे मूळचे नाव चव्हाण चंद्रकांत सखाराम

आ[अ]ळतेकर माधव दामोदर: यांचा सूचीत जन्मसन १८९० दिला आहे. तो बरोबर आहे. "Who's Who" मध्ये मात्र चुकीने १८८९ दिला आहे.

केळकर नरसिंह चिंतामण: वस्तुतः या सूचीत त्यांचे चरित्र-टिपण येण्याचे कारण नव्हते. कोणत्याही नियतकालिकाचे ते संपादक नव्हते. येथे त्यांचे चरित्र-टिपण आले आहे ते 'काव्यसंग्रहा'चे संपादक म्हणून. पण 'काव्यसंग्रहा'चे संपादक होते नारायण चिंतामण केळकर, नरसिंह चिंतामण नव्हे. परंतु 'वर्णन-विभागा'तच (मुद्रण चुकीने) 'ना. चिं.' ऐवजी 'न. चिं.' पडले (पृ. ५७); आणि तो चूक वाढून 'परिशिष्ट विभागा'त नारायण चिंतामणांचे चरित्र-टिपण यायचे, ते नरसिंह चिंतामणांचे आले!

खानोलकर गंगाधर देवराव: 'एम्. ए.' ही नोंद चुकीने झाली आहे.

जांभेकर बाळशास्त्री गंगाधर: परिशिष्ट विभागात 'दिग्दर्शन' चेही संपादक म्हणून नोंद आहे. परंतु वर्णन-विभागाच्या पुरवणीतच मुळातील माहितीत दुरुस्ती करून 'दिग्दर्शन' चे संपादक राघोबा जनार्दन गव्हाणकर असल्याचे नमूद केले आहे. (पृ. ४३२)

बुलासा मोती: मृत्यू १ अक्टोबर १९०१ असा दिला आहे. "अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवका"च्या चौथ्या खंडात हा दिनांक दिला आहे. परंतु समकालीन आणि म्हणून प्रमाण अशा 'केसरी'त हा दिनांक ४ नोव्हेंबर १९०० आहे. [संदर्भ "केसरी-प्रबोध"] आणि "प्रार्थनासमाजाचा इतिहास" मधील बुलासांच्या माहितीत (पृ. १३२) यालाच दुजोरा मिळतो.

भिडे बाळकृष्ण अनंत: 'खेळगडी' चे संपादक म्हणून येथे निर्देश आहे. पण त्या संबंधी साधार तपशील मिळत नाही.

रेळे विलासिनी क. आणि रेगे विलासिनी (पृ. २७९, ६१३) या दोन्ही व्यक्ती एकच नव्हेत ना? मुद्रणदोषाने 'ळे'–'गे' फरक झाला?

सांवारे रावजी त्रिंबक केशव: मृत्यू १८७१–७२ सुमार. [अधिक संदर्भ: मराठी संशोधन पत्रिका, एप्रिल १९६९, 'विद्याकल्पतरु'-गं. दे. खानोलकर.]

'ग्रंथ-प्रवेश' आणि 'परिशिष्ट-विभाग' यांतील विसंगती: 'ग्रंथ प्रवेश' पृ. ३५ वर 'वामन राधाकृष्ण' आणि 'कुमारी श्यामा' ही अशीच टोपण नावे दिसतात" असे म्हटले आहे. परिशिष्ट-विभागात वामन राधाकृष्ण आणि कुमारी श्यामा म्हणजे मर्चंट

वामन राधाकृष्ण अशी माहिती आहे. [ पृष्ठे अनुक्रमे ६१६, ६२६ ]

## काही सर्वसामान्य सूचना

प्रस्तुत सूचीचा हा प्रथम-खंड आहे. यापुढे अधिक महत्त्वाचे, नियतकालिकातील ज्ञानवाहक लेखांच्या सारग्राही सूचीचे काम व्हावयाचे आहे. ह्या दृष्टीने येथे काही सर्वसामान्य स्वरूपाच्या सूचना, तदनुषंगिक विचार नमूद करून ठेवणे युक्त ठरेल. अशी कामे पुन्हा पुन्हा होत नसतात. माणुसबळ, पैसा किंवा वेळ यांच्या अभावी त्यात कसलाही उणेपणा राहू नये. ते काम सावकाशीने झाले तरी चालेल, पण परिपूर्ण व्हावे. अर्थात अखेर काळ-काम-वेगाचा मेळ कसा घालावयाचा ते संपादकांनीच ठरवयाचे आहे. त्यांच्याखेरीज याची सुस्पष्ट जाणीव कुणाला असणार? लेखांचे सारांश देणे हे कामही सोपे नाही—सोपे काहीच नाही. लेखांचा अंतर्भाव जर पुस्तकात झाला असेल, तर त्याची तशी ससंदर्भ नोंद व्हावी. नियतकालिकापेक्षा पुस्तकाची उपलब्धी (तारतम्याने) अधिक सुलभ. ही सूचना जिकिरीची खरी; पण उपयुक्तता वाढवणारी आहे. (संपादकांकडून अधिक अपेक्षा करीत असू. पण या वाढत्या अपेक्षा त्यांनीच या चोख, काटेकोर कामाने उत्पन्न केल्या आहेत!)

प्रस्तुत सूचीमध्ये महाविद्यालयीन नियतकालिकांचा अंतर्भाव केला नाही हे एका दृष्टीने सयुक्तिकच आहे. विशिष्ट वर्गणीत जे कुणालाही मिळू शकते अशा सार्वजनिक प्रसारासाठी असणाऱ्या नियतकालिकांचाच विचार यात अभिप्रेत असावा हे ठीक आहे. तथापि अनेक प्रतिष्ठित, परंपराप्राप्त महाविद्यालयांची नियतकालिके वधितल्यास त्यातही कित्येक उत्तम लेख आलेले आढळून येतील. फर्ग्युसोनियन, परशुरामीय यासारख्या महाविद्यालयीन नियतकालिकांची साक्ष याबाबतीत पुरेशी आहे. अशा लेखांचीही नोंद होणे अभ्यासकाला आवश्यक आहे.

केवळ लेखांची सूची करून भागणार नाही. या पुढची पायरी म्हणजे या लेखांचे संग्रहरूपाने पुनर्मुद्रण होणे आवश्यक आहे. अनेक तऱ्हांनी हे संग्रह काढता येतील. (१) वि. ज्ञा. विस्तार, मनोरंजन यासारख्या एकेका नियतकालिकांतील वेचक साहित्याचे, वैचारिक लेख, कथा, कविता अशा विभागांने खंडशः पुनर्मुद्रण करता येईल. (२) एकेका विषयाचे कालखंडशः संकलन-संपादन करता येईल. उदा. १८७४ ते १९२० या काळांतील साहित्यतत्त्वविमर्शक लेख; समीक्षा-लेख, इत्यादी.

किती तरी प्रकारांनी नियतकालिकांचा अभ्यास व्हावयाला पाहिजे. येथे फक्त 'नियतकालिकां'ची सूची केलेली आहे. प्रत्येक कामाला, त्याच्या सांगतेसाठीच अटळपणे मर्यादा घालून घ्यावी लागते. पण एकेका नियतकालिकाच्या समग्र अभ्यासाबरोबरच 'करमणूक'-सारख्या साप्ताहिकाचा, किंवा ज्ञानप्रकाश-केसरीसारख्या एकेका नियतकालिकाचा समग्र अभ्यास व्हावयाला हवा आहे.

प्रस्तुत संपादक पुढील द्विखंडात्मक ज्ञानवाहक लेखांच्या सूचीत कथा-कवितादी ललित वाङ्मयाची नोंद करणार नाहीत असे दिसते. व्यावहारिक दृष्टीने ते बरोबरही आहे. (मात्र ज्ञानवाहक लेखांपेक्षा ललित वाङ्मय गौण असा विचार या पाठीमागे नसेल अशी अपेक्षा आहे.) तथापि त्यांचीही नोंद होणे मराठी साहित्याच्या अभ्यासासाठी आवश्यक आहे.

नियतकालिके हे फार मोठे भांडार आहे. सूची ही या भांडाराची किल्ली आहे. लेख नुसते एकत्र नोंदले जाणे पुरेसे नाही. ते लेख असणारी नियतकालिके अभ्यासकाला शक्य तर एके ठिकाणी, कमी सायासाने मिळाली पाहिजेत. त्यासाठी जसा सर्व ग्रंथांचा एके ठिकाणी संग्रह व्हावयास हवा, तसा नियतकालिकांचाही एखाद्या मध्यवर्ती, विश्वासपात्र केंद्रसंस्थेत संग्रह होणे, त्यांचे संरक्षण होणे आवश्यक आहे. अद्याप एकेका व्यक्तीकडे, किंवा ज्यांच्यात अशी नियतकालिके संरक्षिण्याची ताकद नाही अशा संस्थांकडे अशी नियतकालिके आहेत. त्यांनी दूरदृष्टीने अशा मध्यवर्ती संस्थेकडे आपला ठेवा द्यावा. न पेक्षा अशा सूचीचा खटाटोप निरर्थक ठरण्याचीच भीती.

## समारोप

आतापर्यंतच्या विवेचनातल्याप्रमाणे या प्रचंड सूची-कार्याचे महत्त्व निर्विवादपणे मान्य केल्यानंतरही, एक मूलभूत प्रश्न मनात येतोच. नियतकालिकांचा अभ्यास खरोखर एवढा महत्त्वाचा आहे का? जेवढे श्रम आणि वेळ ह्यात घालवावे, तेवढे फळ पदरी पडते का? नियत-कालिकांमागील मूलोद्देश लक्षात घेतला तर त्यांना मूल्य वर्तमानकालीनच आहे, त्यापेक्षां चिरंजीवी मूल्य त्यांना

संभवते का? या नियतकालिकांच्या संशोधनासाठी जेवढा वेळ खर्ची घालावा, तेवढाच वेळ उत्तम ग्रंथ वाचायला दिला तर अधिक श्रेय मिळते, बौद्धिक, मानसिक उंची वाढते. — अर्थात असे म्हणताना काही अल्पसंख्य नियतकालिकांमागील ध्येयनिष्ठ प्रेरणा, त्यांचे कार्य यांचे अवमूल्यन यत्किंचितही करावयाचे नाही — स्वतः संपादकांनीही मराठी नियतकालिकांच्या दर्जा संबंधी एकूण असमाधानाचेच उद्गार काढले आहेत

असे असले तरी समकालीन साधन म्हणून त्यांचे महत्त्व नाकारायचे नाही. नियतकालिकांतून ताज्या प्रतिक्रिया अक्षरबद्ध झालेल्या असतात; वर्तमानाचा जिवंत प्रवाह त्यातून वाहात असतो. इतिहासाचे साधन म्हणून, लोकाभिरुचीचा, वाङ्मयाभीरुचीचा इतिहास समजण्यासाठी म्हणून नियतकालिकांचे महत्त्व अबाधितच राहणार. ग्रंथ आणि नियतकालिके यांचे स्वरूप वेगळे, त्यांचे कार्य वेगळे, दोघांची गरज ही राहणारच. 'ग्रंथ-प्रवेशा' मध्ये संपादकांनी उद्धृत केलेले एक विधान या संदर्भात लक्षणीय आहे, "'वृत्तपत्रे' प्रश्नाला चालना देतात, 'नियतकालिके' त्याचा तपशीलवार पाठपुरावा करतात आणि 'पुस्तके' त्याची साधकबाधक चिकित्सा करतात." (पृ. १३) हाच फरक 'ग्रंथ-प्रवेशा'त आणखीही एके ठिकाणी संपादकांनी सांगितला आहे, 'ग्रंथ ही स्थिरविकसित घटना म्हटली तर नियतकालिक हे छोटे मोठे विकासक्षम व्यक्तिमत्त्व म्हणावे लागेल.' (पृ. ४०).

दुसरे, नियतकालिकातील सर्वच विचारधन, कल्पना-वैभव पुढे ग्रंथरूपाने संगृहीत होतेच असे नाही. विशेषतः आपल्याकडे अद्याप खूपसे असे धन नियतकालिकांत अडकून, विखरून राहिले आहे. त्यामुळेही नियत-कालिकांच्या संशोधनाला हे महत्त्व राहणारच.

यासाठी असे संशोधन व्हावयास हे हवेच. पुष्कळ मेहनत घ्यावी तेव्हा थोडे चांगले हाती लागते. पण या थोड्या चांगल्यासाठी ही फोले पाखडावी लागतात. कुणी तरी हे तत्काल फलदायी नसणारे पण दीर्घकालीन श्रेय जोडणारे कार्य करायलाच हवे. अशी सक्त मेहनतीची आणि सद्यःफलदायी नसणारी कामे सहसा कोणी अंगीकारीत नाही. तथापि अभ्यासक-संशोधकांना ही कामे पायाभूत असतात. अजूनही अशा उपयुक्त साधनग्रंथांचा अभाव असल्याने त्यांचे श्रम आणि वेळ या प्राथमिक कामातच जातात. पुढे निष्कर्षाप्रत पोचेपर्यंत त्यांचा दम आणि उमेद ओसरते – थकते. या प्राथमिक साधनपर गोष्टीच अद्याप न झाल्याने स्वतंत्र विवेचक शक्तीच्या संशोधकांना आपले श्रम आणि वेळ या उत्खननात खर्ची घालावे लागत आहेत. हा अपव्यय क्लेशकारक तर खराच. या अशा कामी श्रम आणि वेळ खर्ची घातला म्हणूनही संपादकांचे ऋणी राहिले पाहिजे.

अनेकदा अशा जातींची कामे करीत असताना निराशा येते. या एवढ्या कामाची किंमत आहे कुणाला? त्याचा उपयोग करतो कोण? कशासाठी काही थोड्या व्यक्तींनी आपली सर्व शक्ती, उमेद खर्ची घालून ही कामे करावीत? अभ्यासकांना तर त्यांचा नित्य उपयोग आहेच. पण विद्यमान नियतकालिकांच्या संचालक–संपादकांनी ही सूची अवश्य बघायला-चाळगायला हवी. पण ते या-बाबतीत पूर्ण बेफिकीर. पावसाळ्यातील छत्र्यांप्रमाणे उगवणाऱ्या या धंदेवाईक नियतकालिकांना काय याची गरज? पण या सूचीतून कळणारी मराठी नियतकालिकांची परंपरा, त्यांचे यशापयश, त्यांतील योजकता यांचा अभ्यास नव्या, काहीतरी करू इच्छिणाऱ्या नियतकालिकांना केवढा तरी बोधक होईल! या नियतकालिकांनी वार्षिक सूची जरी पद्धतशीरपणे दिल्या तरी केवढे काम होणार आहे. पण जिथे सरळ अनुक्रमणिका देण्याचीही गरज वाटत नाही, तिथे वार्षिक सूची देण्याचा उद्योग कोण करतो? या संपादकांनाच आपल्या नियतकालिकातील लेखनाला काही संरक्षणीय मूल्य आहे असे वाटत नसावे! महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेसारख्या, दीर्घकालीन अस्तित्व असणाऱ्या नियत-कालिकांनी अशा संपूर्ण कालखंडाच्या सूची बनविणेही किती तरी उपयुक्त ठरेल. मात्र अशी कामे केवळ जुजबी देखाव्याची होऊ नयेत. अज्ञाने उलट फसगत होते. चुकीच्या, अर्धवट कामापेक्षा न केलेले उत्तम!

दाते यांची "मराठी ग्रंथसूचि", प्रस्तुत नियत-कालिकांची सूची म्हणजे प्रचंड ग्रंथालये थोड्या अवकाशात हाताशी असणे. अशी कामे म्हणजे ज्ञानयज्ञ. जशी मोठमोठी धरणे दाखवतात, तशी ही कामे दाख-विली पाहिजेत, त्यांचा परिचय करून दिला पाहिजे, त्यांचा उपयोग कसा करावा हे शिकविले पाहिजे. दाते यांची ग्रंथसूची बघावी कशी हे ज्येष्ठ प्राध्यापकांनाही माहीत नसल्याचा अनुभव येतो!

लुप्त होऊ घातलेल्या साधन-साहित्याकडे लक्ष वेधण्याचे कार्य या सूचीने केले आहे. नियतकालिकांतील संचिताचा शोध घेण्याच्या नव्या युगाचे प्रवर्तन या कार्याने होईल अशी अपेक्षा आहे. मराठी कोश-परंपरेत वसणारे, ती परंपरा वाहती ठेवणारे, त्या परंपरेची प्रतिष्ठा वाढवणारे, आणि मराठी माणसाला अभिमान वाटावा असे हे काम झाले आहे. या सूचीमुळे निर्माण झालेल्या वाढत्या अपेक्षांनी अभ्यासक पुढील द्विखंडात्मक लेखसूचीकडे पाहात आहेत. या कार्यामागील प्रेरकशक्ती ग्रंथसूचिकार दाते. त्यांचे कृतज्ञतापूर्वक स्मरण, अभिवंदन आणि इतर दोघा संपादकांना पुनः पुन्हा धन्यवाद.

…परीक्षणापुरते सूचीचे काम हातावेगळे केले असले, तरी तिची सोबत संपलेली नाही. ती नेहमीच लागणारी आहे.…

— सु. रा. चुनेकर

• • •

## * पाऊलखुणा

* ' पाऊलखुणा ' ( काव्यसंग्रह ). वि. म. कुलकर्णी प्रकाशक. व्हीनस प्रकाशन पुणे २, पृष्ठसंख्या १३२, मूल्य पाच रुपये.

' पाऊलखुणा ' हा वि. म. कुलकर्णी यांच्या स्फुट कवितांचा चौथा संग्रह. १९६०-६६ या काळातील निवडक कविता यात संग्रहित केल्या आहेत. वि. म. हे गेली दोनअडीच तपे किंवहुना त्याहूनही अधिक काळ, काव्यलेखन करीत आहेत. काव्याबद्दलचा हा असा अखंड उत्साह जागविणारे जे थोडे कवी आहेत, त्यांत वि. म. चा प्राधान्याने अंतर्भाव होतो.

वि. म. किंवा त्यांच्या पिढीतील कवींपुढे जो आदर्श होता, तो रविकिरण किंवा तान्ने यांचा. रचनासौष्ठव, नादमाधुर्य, मांडणीचा आखीवपणा, प्रापंचिक वृत्तीची आळवण, निसर्गविषयक रोमँटिक आवड, दलितांचा कळवळा, राष्ट्रनेत्यांना अभिवादन, वगैरे सारखे या कवींचे विशेष पुढील पिढीतील होतकरू कवींना मार्गदर्शक झाले असल्यास नवल नाही. हा किता पुढे ठेवूनच पुढील पिढीतील अनेक कवींचे काव्यलेखन चालू होते.

परंतु मर्ढेकरयुगात या परिस्थितीवर जबरदस्त अघात झाला. एक नवाच काव्यप्रवाह सुरू झाला. या घटनेचा उपर्युक्त पिढीवर झालेला परिणाम विविध प्रकारचा आहे. स्तिमितता, धिक्कार, अनुनय, तडजोड अशा विविध मार्गांनी तो प्रकट झाल्याचे दिसते. कवितेच्या एकसंध प्रवाहाला यामुळे अनेक फाटे फुटले. मार्गभिन्नतेतून मतमतांतराचा गलबला सुरू झाला

वि. म. या कल्लोळात सामील झालेले दिसत नाहीत. या गोंधळाच्या परिस्थितीतही त्यांचे काव्यलेखन पूर्व-नियोजित दिशेने अविचलपणे चालले आढळते. या वाटचालीच्या अलीकडील काळातील काही ' पाऊलखुणा ' म्हणजेच प्रस्तुतचा काव्यसंग्रह. संथ, धिम्या चालीतील या वाट चालीने वि. म. ची विशिष्ट काव्यनिष्ठा उजळून निघते. काव्य हे त्यांच्या बाबतीत फावल्या वेळेचा एक ' उद्योग ' नसून ते त्यांचे जीवनमार्गातील ' पाथेय ' बनले आहे. त्याने त्यांचे मार्गक्रमण सुकर व सुखकर केले आहे. कवितेकडून त्यांची असलेली अपेक्षाही साधी, विनम्र अशीच आहे.

' माझे इनाम कवित्व
गावोगावी गोतावळा
थोरामोठ्यांच्या वंशाशी
माझा संबंध जोडला !
शारदेच्या महाद्वारी
मला मिळेल पायरी
रसिकांची पायधूळ
नित्य उधळेल शिरी ! '

' माझे इनाम कवित्व ' हा मथळा असलेल्या ' कमळवेल ' संग्रहातील या ओळी कवीच्या भावुक पण अनन्य अशा वाङ्मयप्रीतीवर प्रकाश टाकतात.

' पहाटवारा ' पासून ' पाऊलखुणा ' पर्यंतचा वि. मं. चा कोणताही काव्यसंग्रह चाळून पाहिला तरी प्रकर्षाने आणि पुनःपुन्हा एकाच विशिष्ट वृत्तीचे दर्शन घडते. ही वृत्ती एखाद्या प्रेषिताची, तत्त्ववेत्त्याची, क्रांतिकारकाची संस्कृतिटीकाकाराची वा सौंदर्यवेत्त्याची नाही तिची बांधिलकी आहे स्वतःच्या घरप्रपंचाशी. आम्ही कोण ? या प्रश्नाला ' आम्ही संसारी माणसे ' असे तिचे ठाम उत्तर आहे. यामुळे साहजिकच या ' संसारकरू 'ची ही वृत्ती प्रक्षोभा पेक्षा प्रशान्ततेची बेधुंदपणापेक्षा संयमाची भोक्ती बनली आहे. स्वतःच्या घरकुलात ती तृप्ततेने रमलेली आहे. तेथूनच तिच्या आलोकात जे जग येते ते

तिला पुरेसे वाटते. स्वतःच्या लहानशा खिडकीतून दिसणाऱ्या महान आकाशावर संतृप्तपणे हा 'जीव' जगतो. तेथून त्याच्या मिळणारे आश्वासन पुरेसे वाटते.

वि. म. च्या या संसार विश्वातील हा नायक संसार-सुखाच्या आस्वादनात रंगलेला आहे. घर, गृहिणी, गृहरत्ने, या भोवती त्याचे मन रुंजी घालते. प्रसन्न खेळकरपणे, क्वचित खोडकरपणे त्याचे चित्रण करते. 'घर देव आणि गगन,' 'उरले ते माझे मला,' 'शुभदा,' 'तू उरतेस,' 'वधू,' 'पहाटेच्या प्रहरात,' 'भर दुपारची वेळ,' 'नाते,' या सारख्या कविता एका हळव्या, सत्त्वशील, सोशिक, सहृदय, रसिक प्रापंचिकाचे' दर्शन घडवितात. यांतील मुलाबाळांबद्दलचा वत्सल, हळवा भाव तर विशेषच लक्षणीय आहे.

या संसारविश्वाची कक्षा अगदी स्वतःपुरती मर्यादित नसून जुन्या खानदानी कुटुंबाला शोभेशी विस्तृत आहे. आईवडील, लेकीमुली, सोयरेधायरे, शेजारीपाजारी, व्रतवैकल्ये, सणवार, देवधर्म, कुलाचार या साऱ्यांचे मिळून हे विश्व बनले आहे. त्याचे नागर जीवनापेक्षा ग्रामीण जीवनाशी जिव्हाळ्याचे नाते आहे. त्याची चाहूल वि. म. च्या सर्वच संग्रहातून येते, याही संग्रहात ती आहेच. 'वेशीवरील मारुती' 'पहाट तीं तशीच आहे' 'कृष्णाकाठी,' 'दर्शन,' 'नदी,' 'मित्रा,' इत्यादी कवितांना ग्रामीण मातीचा स्पर्श व आप्तस्वकीयांच्या हळुवार स्मृतींचा गंध आहे. वि. म. च्या कवितेतील ग्रामीण परिसर किंवा निसर्ग स्वतंत्रपणे उभा न राहता तो मानवी जीवनाशी निगडित झालेला असतो. 'निळ्या वाटेतून' 'श्रावण आला' 'पहाट तीं तशीच आहे' 'कृष्णाकाठी' 'त्या तशा पावसामध्ये' 'कार्तिकाच्या रात्री' 'पहाटेच्या प्रहरात' इत्यादी कविता या दृष्टीने पाहाव्यात.

या संसारिकाचे मन स्वतःच्या उंबरठ्यापल्याडच्या जगातील सुखदुःख उघड्या डोळ्यांनी पाहाते, त्यातील दुःखाने ते गहिवरतेही, पण या गहिवरालाही पुन्हा एका खास प्रापंचिक वृत्तीचे जाडजूड कवच असते, मर्यादा असतात; याचे प्रांजळ प्रकटीकरण 'घास' या कवितेत झाले आहे. भरल्या ताटावर भुकेजून बसलेल्या या प्रापंचिकाच्या कानावर कोण्या महाभागाच्या अन्नसत्याग्रहाची वार्ता येते, त्याना घास घेववत नाही. त्याची 'शहाणी बुद्धी' त्याला दुसऱ्याची उठाठेव न करण्याबद्दल बजावते, तरी पण त्याच्या 'भाषाळ्या' बुद्धीला ते पटत नाही. ती तडफडत राहाते. अडलेला हात ओठापर्यंत जात नाही; किंवा पानावरूनही उठवत नाही. शेवटी,

"मिळो माझ्या सर्व बांधवाना खाया
सुखात राहोत लेकरे नि आया
असो सर्वांवर प्रभो, तुझी छाया"

अशी प्रार्थना मनाने म्हटली जाते! पहिला घास काढून ठेवला जातो व 'देहाचे' जेवण पुढे होते! या कवितेत प्रकट झालेले हे मन सत्प्रवृत्त पण अगतिक अशा साऱ्याच मनांचे प्रतिनिधित्व करते.

या मनाला जीवनातील अनेक परीची दुःखे व स्वतःच्या मर्यादा यांची जाणीव येऊन अनेकदा ते अंतर्मुखही बनते, ते आत्मविश्लेषणास उद्युक्त होते, अधूनमधून स्वतःच्या व इतरांच्या दुबळेपणाबद्दलची खंतही बोलून दाखविते, उपरोध उपहासाचा सूरही काढते, ('नवल वाटते','आम्ही संसारी माणसे' 'जगवारे चालते आहे' इ.) पण हा उपरोध कधी उग्ररूप धारण करीत नाही. एका बाजूने स्वतःच्या मर्यादित सामर्थ्याच्या प्रामाणिक जाणिवेने व दुसऱ्या बाजूने महानुभावांच्या गौणगौरवाने ('कर्वे रोड,' 'धन्य त्यांचा जन्म दिन,' 'मरणालाही दुःख फुटावे,' 'स्मरण') तो परिवेष्टित होतो.

उपरोध, उपहास, वक्रोक्ती, विडंबन, वैफल्य, दंश, दाह या सारखी उग्र, विकट हत्यारे हा कवी कधी परजीत नाही. याचे आणखी एक महत्त्वाचे कारण म्हणजे या कवीचा देवविषयक असा एक विशिष्ट श्रद्धाभाव. हा श्रद्धाभाव किंवा आशावाद हा वि. म. च्या कवितेचा एक स्थायी भाग आहे. या संग्रहातील कितीतरी कवितांना तो सहजपणे ओंटगून राहिला आहे. निसर्ग म्हणजे प्रभूची प्रसन्न सृष्टी, श्रावणारंभ म्हणजे देव गोकुळी येण्याचा काळ, अपत्यजन्म म्हणजे घरी होणारे बालरूप परब्रह्माचे आगमन असे या कवीला वाटते.

"भोगिली दुःखे तयाची
ना निशाणी ठेविली
भोग संपे भोगुनीया
हीच भाषा राहिली..."

अनुक्रमणिका

मानवी दुनियेत येथे
देव माते भेटला,
रंगुनी नाना परींनी
पोटी-उरी जो राहिला।"

अशा प्रकारची वृत्ती कवीत रुजलेली असल्याने एका मर्यादेपलीकडे ती त्याला शोकाकुल करू शकत नाही. किंवा त्याच्या मूलभूत आशावादला तडा जाऊ देत नाही. ही श्रद्धा एक प्रकारे पारंपारिकच असली तरी प्रामाणिक आहे. दुर्मिळही म्हणता येईल. वि. म. 'प्रसाद रामायण' सारखे काव्य लिहू शकले, याचे हेही एक कारण असावे. या संग्रहातील प्रारंभीच्या 'समई' कवितेतच या वृत्तीचा सुगावा लागतो. आणि 'माझ्या जिवा!', 'जगवारे चालले आहे!', 'वरोवर काय नेणार सांग', 'एक घर', 'हे पुरे गा', 'काकड आरती' 'दर्शन', 'देव, घर आणि गगन', 'देव कोठे–देव कोठे–' इ. सारख्या कवितातून त्याचे प्रत्यंतर येते. प्रपंच आणि परमार्थाची युती वारकरी संप्रदायात आढळत असल्यामुळेच की काय काही वेळा त्या प्रकारची परिभाषा वि. मं. च्या कवितेत उमटते व तीतून 'सांभाळा ही वीणा' सारखी उत्कट, उदात्त, करुण कविता उभी राहाते. वि. म. च्या वृत्तिविशेषांचे सारे वळ या कवितेत एकवटलेले आढळते.

'सांभाळा ही वीणा' सारख्या संस्मरणीय वाटणाऱ्या या संग्रहातील आणखी काही कविता म्हणजे 'वेशीवरील मारुती', 'वरोवर काय नेणार सांग', 'एक घर', 'गंगाजळ', 'पायधूळ', 'कावड', 'असे असे कसे झाले', 'सूर्य पश्चिमेला गेला' या साऱ्याच कवितांना उदात्त – कारुण्याची किनार आहे. वि. मं. च्या पूर्वीच्या कवितासंग्रहातून जाणवणारी बहिर्मुखता हलुहळू कमी होत चालल्याचे या संग्रहात जाणवते. पूर्वीच्या 'हिरव्या' रंगात आता 'भगवी' छटा यामुळेच मिसळू लागली असावी. आपली कविता आपल्या वयावरोवर वाढली असे कवी तांचे सांगतात. वि. मं. च्या वावतीतही तेच म्हणावे लागेल.

त्यांच्या कवितेतील आशयावावतचा हा अनुभव त्यांच्या अविष्काराच्या वावतीतही येतो. पूर्वीच्या मानाने तो अधिक प्रौढ व पक्व होत चालल्याचे आढळते. आंतरबाह्य विकासाच्या या 'पाऊलखुणा' त्यांच्या पुढील वाटचालीवद्दलची उत्सुकता वाढवीत राहतात.

गो. म. कुलकर्णी

• • •

## स्मृतिधन

लेखक– शं. नी. चाफेकर, मौज प्रकाशन मुंबई; पृष्ठे २५२; मूल्य पंधरा रुपये.

मराठी रंगभूमीवरील काही यशस्वी व लोकप्रिय नटांनी आपली आत्मचरित्रे प्रसिद्ध करून स्वतःविषयी आणि तत्कालीन रंगभूमीच्या कार्यासंबंधी बरीच माहिती उपलब्ध करून दिली आहे. त्याचप्रमाणे मराठी व इतर रंगभूमीवर प्रमुख स्त्रीनट म्हणून काम करणारे शं. श्री. तथा नानासाहेब चाफेकर यांनी स्वतःच्या आयुष्यातील नानाविध स्मृती हळुवार मनाने 'स्मृतिधन' या पुस्तकात कथन केल्या आहेत.

नानासाहेबांचा जन्म १८९६ मध्ये २० जानेवारीस झाला आणि त्यांचे देहावसान पुण्यात आकस्मिकपणे १५ जानेवारी १९६९ रोजी झाले त्यांच्या ७३ वर्षातील सुखदुःखांच्या, आशानिराशांच्या, मानापमानांच्या, धैर्य व भीरुपणाच्या आठवणी त्यांनी निःसंकोच मनाने सांगितल्या आहेत.

इ. स. १९४० च्या जानेवारीत नाट्यव्यवसाय सोडीपर्यंतच्या कालातील नानाविध स्थित्यंतरांची हकीकत त्यातील वारकाव्यांसह देण्यासाठी पुस्तकाची १८० पृष्ठे खर्ची पडली आहेत. केशवराव भोसल्यांना नानासाहेव नाट्यगुरू मानीत असल्यामुळे, केशवरावांची गायक नट म्हणून श्रेष्ठता, त्यांची व्यवहार दक्षता, त्यांचा खुला स्वभाव, ललित कलादर्श व गंधर्व नाटक मंडळी यांच्या झालेल्या संयुक्त 'मानापमान' व 'सौभद्र' या नाटकांतील त्यांच्या धैर्यधर व अर्जुन या भूमिकांचे यश व महत्त्व, त्यांची गायकी, नाट्यव्यवसायावद्दलचा त्यांचा जाज्वल्य अभिमान, आणि त्यांच्या अंगच्या इतरही गुणावगुणांचे वर्णन चापेकरांनी सोदाहरण व मोठ्या तन्मयतेने केले आहे. केशवरावांचे अवघ्या ३१ च्या वर्षी दिनांक ४।१०।१९२१ ला अकाली निधन झाल्यामुळे त्यांच्या नाटकमंडळीची व नाट्यकलेची तर मोठीच हानी झाली. त्याचबरोबर चापेकरांचेही अपरमित नुकसान झाले यात शंका नाही. केशवरावांचा सहवास त्यांना जर जास्त कालपर्यंत लाभला असता तर त्यांना पुष्कळ शिकता येऊन, त्यांचा भाग्योदयही झाला असता!

भोसल्यांच्या निधनानंतर चापेकर ललित कलादर्शमंडळीचे एक भागीदार झाले खरे, परंतु ती परिस्थिती

लवकरच संपुष्टात आली. नाट्यव्यवसायाच्या या कालात नानासाहेब फाटक, बापूराव पेंढारकर, गणपतराव बोडस, अप्पासाहेब टिपणीस, अंतोबा कुलकर्णी, बाबासाहेब वेडेकर, भाऊराव जाधव, गणपतराव देवासकर, गोहरबाई, हिराबाई इत्यादी नटनटी; मामा वरेरकर, वन्याबापू कमतनूरकर, वीर वामनराव जोशी, भालजी पेंढारकर इत्यादी नाटककार यांच्या सहवासातल्या, तसेच किर्लोस्कर संगीत मंडळी, गंधर्व नाटक मंडळी, नवीन नाट्यसंस्था, कोल्हापूर दरबारचा आश्रय इत्यादिबाबतच्या स्मृतीही त्यांनी मोठ्या जिव्हाळ्याने वर्णिल्या आहेत. त्यांनी स्वतः केलेल्या स्त्रीपुरुष भूमिकांची सविस्तर माहिती आणि निरनिराळ्या भूमिकांबाबतची त्यांची मते व मीमांसा त्यांनी चिकित्सक पद्धतीने मांडली आहेत.

१९४० नंतर उपजीविकेकरिता फोटोग्राफर बनून, ओडियन रेकॉर्डस् कंपनी, जयश्री फिल्म कंपनी व शेवटी आकाशवाणी इत्यादी संस्थांतून त्यांना नोकरी करावी लागली.

त्यांचे वडील तात्या, मातोश्री माई, थोरले बंधू बापुसाहेब व प्रथम पत्नी यांच्या निधनांची दुःखद हकीगत आणि त्यांच्या निधनसमयी नानासाहेबांना त्यांच्याजवळ असणे शक्य झाले नाही, ही दुःखद तर घटना यांची वर्णने जशी अंतःकरणाला वेदना देतात, तद्वतच त्यांचे सन्मित्र व लोकमान्य टिळकांचे द्वितीय चिरंजीव श्रीधरपंत यांच्या आत्महत्येची हकीगत मनाला चटका लावून जाते.

नानासाहेबांचे आयुष्य परिस्थितीशी झगडण्यात आणि आर्थिक स्वास्थ्य लाभण्यासाठी केलेल्या धडपडींत गेले. नाट्यकलेची सेवा करण्यासाठी नाट्यसंस्था उभारावी व तिला आर्थिक स्थैर्य प्राप्त करून द्यावे यासाठी त्यांनी आटोकाट प्रामाणिक प्रयत्न केले, परंतु त्यात त्याना यश आले नाही. कोर्टात 'नादारी' घेण्याचीही पाळी त्यांच्यावर आली. ह्या सर्व अपयशांची चिकित्सक मीमांसा त्यानी 'अपयशाचे बीज' या प्रकरणात पृष्ठे १९३ ते १९६ यावर स्पष्टपणे केली आहे, ती नाट्यसंस्थाना आणि कलावंताना खचितच मार्गदर्शक होईल.

नानासाहेबांचे जीवन अगदीच अपयशी नव्हते. रंगभूमीच्या एकनिष्ठ सेवेचे बीज होऊन त्याना मराठी नाट्यसंमेलनाचे अध्यक्षपद लाभले. तसेच त्यांच्या ह्या 'स्मृतिधन' ग्रंथास महाराष्ट्र सरकारने धनपारितोषिक देऊन गौरविले. त्यांच्या द्वितीय पत्नीने स्वतःच्या शारीरिक दुर्बलतेकडे दुर्लक्ष करून त्यांच्या संसारात त्यांना त्यागपूर्वक समरसतेने साथ दिली. ह्या गोष्टी त्यांच्या भाग्याचीच साक्ष देतात. माहितीपूर्ण, मनोरंजक आणि मार्गदर्शक असे हे 'स्मृतिधन' त्यांनी आपल्या पत्नीस कृतज्ञतापूर्वक अर्पण केले आहे, हे योग्यच होय! या स्मृतिधनाने रंगभूमीविषयक मराठी वाङ्मयात चांगली भर घालून ते खासच समृद्ध केले आहे!

न. का. घारपुरे

● ● ●

## साभार - स्वीकार

**ऐतिहासिक पोवाडे अथवा मराठ्यांचा काव्यमय इतिहास :** संपादक व संशोधक — य. न. केळकर, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे ३०; १५ रु.

**शीखपंथदर्शन,** ईश्वरसिंग ठाकूर, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ. पुणे ३०; १० रु.

**जन हे वोळतु जेथे** (कादंबरी) : शरच्चंद्र मुक्तिबोध, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; १० रु.

**महाराष्ट्राचा भागवतधर्म : ज्ञानदेव आणि नामदेव :** शं. दा. पेंडसे, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे ३०; १० रु.

**नक्षलवारी ते दरबारी :** चंद्रशेखर, साहित्यसंबंध प्रभात रस्ता पुणे ४; ६ रु.

**मृदंगी** (कविता) : द्वारकानाथ शेंडे, मांडवी प्रकाशन, अस्नोडर (गोवा); ३ रु.

**गीतनवनाथ :** वि. गो. कुलकर्णी, ११।१३९ लोकमान्य नगर, पुणे ९; ४॥ रु.

**राष्ट्रपति गिरी :** अनुवादक अ. ह. लिमये; प्रकाशक व्हीनस बुक स्टॉल, पुणे ३०; ५ रु.

# शब्दवेध

१. गोरज : 'संध्याकाळ' ह्याअर्थी हा शब्द लग्नमुहूर्त देतांना वापरण्याची पद्धत आहे. हा शब्द मराठीत केव्हापासून रूढ झाला ह्याची कल्पना नाही. महाराष्ट्र शब्दकोशात 'गोरज' किंवा 'गोधूल' मुहूर्त हे शब्द 'संध्याकाळ' ह्याअर्थी दिले आहेत.[1] ज्ञानेश्वरीत 'गोरज' शब्द नाही. परंतु 'गोधुलुक' हा शब्द संध्याकाळ ह्या-अर्थी आला आहे.[2] मोनिअर विलिअम्सच्या संस्कृत कोशातही हे शब्द नाहीत. आपटे यांच्या नव्या सुधारित संस्कृत कोशात 'गोधूलिः' शब्द आहे. अर्थ असा दिला आहे : 'Dust of cows' the time of sunset or evening twinight ( so called because cows which generally return home at about sunset, raise up clouds of dust by their treaeding on the earth ). आपटे यांच्या कोशांत संदर्भ दिला नाही.

'गोरज' किंवा 'गोधूल' ह्या शब्दांचा 'संध्याकाळ' ह्या अर्थी होणाऱ्या उपयोगाविषयी वर दिलेले स्पष्टीकरण ठीक वाटते.

अशाच प्रकारचा Boututo हा सामासिक शब्द 'संध्याकाळ' ह्या अर्थी ग्रीक भाषेत आहे. ह्या शब्दातील पूर्वपद bou व संस्कृत गो हे समन्युत्पन्न शब्द आहेत. दुसरे पद tuto हे ग्रीक धातु tuo 'सोडविणे' ह्यापासून साधीत असत. तेव्हा boututo म्हणजे ज्यावेळी शेतकरी बैलाला नांगरापासून सोडवतो ती वेळ म्हणजेच संध्याकाळ असे ह्या शब्दाचे स्पष्टीकरण मानण्यात येई. परंतु प्रा. Thieme यांच्या मते हे स्पष्टीकरण स्वीकारण्यात काही अडचणी आहेत. एक अडचण अशी की ज्या काळच्या ग्रीक वाङ्मयात हा शब्द आढळतो त्या काळच्या ग्रीकांना कुरणात चरणारा बैल जास्त परिचयाचा होता, शेत नांगरणारा नव्हे. म्हणून प्रा. Thieme यांच्या मते tuto हा शब्द tuo ह्या धातूपासून साधावयाचा नसून संस्कृत धातू रु ( रवति ) 'आवाज करणे, ओरडणे' ह्याशी समन्युत्पन्न म्हणून मानता येण्याजोग्या ग्रीक धातूपासून साधायला हवा. असे केले असता boututo ह्याचा अर्थ 'गायीं'नी ओरडण्याची, हंबरण्याची वेळ, संध्याकाळ' असा होईल. संध्याकाळी चरून गायी घरी परत येतात तेव्हा त्यांचे स्तन दुधाने भरलेले असतात. त्यावेळचे त्यांचे हंबरणे सर्वांच्या परिचयाचे आहे.[3]

इंडोयुरोपीयन भाषा बोलणाऱ्या एका समाजाला संध्याकाळचे वैशिष्ट्य गायींच्या खुरांनी उडविलेल्या धुळीत दिसले, दुसऱ्या समाजाला ते त्यांच्या हंबरण्यात आढळले.

**२. स्वच्छ राखणे, ठेवणे :** हल्ली पुणे शहरात रस्त्यावर काही ठिकाणी 'आपले शहर स्वच्छ राखा' अशा पाट्या लावलेल्या आढळतात. ही पाटी मी प्रथम वाचली तेव्हा 'स्वच्छ राखा' हा वाक्प्रचार काहीसा निराळा वाटला. मान्य मराठी वाक्प्रचाराप्रमाणे 'आपले शहर स्वच्छ ठेवा' अशी पाटी असावी असे वाटले.

सुमारे तीस वर्षांपूर्वी गुजराथेतून ( बडोद्याहून ) पुण्यास आलो तेव्हा माझ्या तोंडी 'स्वच्छ राखणे' असाच प्रयोग होता. परंतु इथे आल्यावर लक्षात आले की इथल्या बोलण्याचालण्यात 'स्वच्छ ठेवणे' हा प्रयोग संमत आहे. तेव्हापासून मीही 'स्वच्छ ठेवणे' हा प्रयोग वापरू लागलो माझ्या बोलीतला पूर्वीचा 'स्वच्छ राखणे' हा वाक्प्रचार गुजराथीच्या प्रभावामुळे बडोद्यात असताना माझ्या तोंडी रुळला असावा. गुजराथीत 'चोख्खुं राखवुं' असे म्हणतात. आता पुण्यातील मराठी भाषिकांनाही 'आपले शहर स्वच्छ राखा' अशी पाटी वाचून काही चमत्कारिक वाटत नसेल तर तोच वाक्प्रचार इथे मान्यता पावला आहे हे उघड आहे. इथल्या मराठी भाषेत गेल्या तीस वर्षांत हा एक फरक घडून आल्याचे दिसते.

म. अ. मेहेंदळे ( डेक्कन कॉलेज, पुणे ६ )

---

१. मराठी उत्पत्तिकोशात हे दोन्ही शब्द नाहीत.

२. श्री. वेलिंगकर ज्ञानेश्वरीचे शब्द भांडार ह्या पुस्तकात संदर्भ १८. १०७९ आहे. डॉ. पानसे यांनी तो १८·१०८६ असल्याचे सांगितले. कुंटे पणशीकर (व साखरे) आवृत्तीत तो १०८५ आहे. तिथे 'गोधळुक' असा पाठ आढळतो. मुंबईराज्य-शिक्षणखाते आवृत्तीत टीपात पाठभेद 'गोधळुक' व 'गोधळुक' असे दिले आहेत.

3. P. Thieme : Die itemat der nidoger-manischen Gemeinrsprache, पृष्ठे ३४–३५.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या वर्ष ४३, अंक १६६ आणि १६७ ह्यामधल्या 'शब्दवेध' ह्या सदरातल्या काही टिपणांना अनुलक्षून :

शब्दांच्या वापरासंबंधी चोखंदळपणा, शब्दार्थाच्या सूक्ष्म छटांची जाणीव, हे भाषाभिरुची जिवंत असलेल्या समाजाचे एक लक्षण आहे. आणि ही जाणीव वेगवेगळ्या रीतींनी कशी प्रकट होत असते हे सांगताना डॉ. मु. ग. पानसे ह्यांनी 'नेत्रदीपक' ह्या शब्दाचे उदाहरण दिले आहे. आणि म्हटले आहे, 'नेत्रदीपक' हा शब्द चटकन लोकप्रिय होतो पण काही कालाने त्यांची पिछेहाट होते.

'नेत्रदीपक' ह्या शब्दापुरतेच सांगायचे झाले तर त्या शब्दाची पिछेहाट झालेली नाही. तो चटकन लोकप्रिय झाला आणि अजूनही लोकप्रिय आहे. इतकेच नव्हे तर प्रतिष्ठा पावून सर्रास वापरला जात आहे. "नेत्रदीपक" हा शब्द सुमारे तीस वर्षांपूर्वी श्री. प्रभाकर पाध्ये ह्यांनी प्रथम वापरला. हा शब्द अर्थदृष्ट्या 'शुद्ध' नाही, 'दीपक' शब्दाचा अर्थ 'दिपवणारा' होत नाही वगैरे आक्षेप त्याच वेळी त्या शब्दावर घेण्यात आले. आक्षेप श्री. पाध्यांना अमान्य होते असे नाही. पण त्यांची भूमिका अशी की, 'डोळे दिपवणारा' असे त्यांना म्हणायचे होते. 'नेत्रदीपक' ह्या शब्दातून वाचकांना त्या अर्थाचा बोध होत होता. शब्दांचा उद्देश अर्थ ध्वनित करणे हा आहे; आणि 'नेत्रदीपक' ह्या शब्दाने तो उद्देश साधला होता. पण एवढ्यावर श्री. पाध्यांना स्वस्थ राहवले नाही. त्यांनी श्री. गो. कृ. मोडक ह्यांच्याकडे कौल मागितला तो त्यांनी त्याच्या बाजूने दिला. अशा रीतीने गो. कृ. मोडकांचा आशीर्वाद मिळून "नेत्रदीपक" शब्द पंक्तिपावन झाला. तेव्हापासून आजतागायत तो शब्द प्रतिष्ठेने वावरत आहे. सामान्य लेखक तर तो वापरतातच पण ज्यांना भाषाज्ञान, शब्दज्ञान, शैलीचे ज्ञान आहे, असेही लेखक तो वापरतात. 'संस्कृत हा माझा अभ्यासाचा विषय नाही' असे डॉ. सौ. इरावतीबाई म्हणत असल्या तरी त्यांना भाषाज्ञान नाही किंवा शब्दज्ञान नाही असे कोणी म्हणणार नाही. त्यांनी 'नेत्रदीपक' हा शब्द वापरला आहे. श्री. पां. वा. गाडगीळ हेही नित्य वृत्तपत्रात घाईचे लेखन करीत असूनसुद्धा भाषेच्या वापराबाबत चोखंदळ आहेत. निष्काळजीपणाने भाषा वापरली आहे असे त्यांच्या लेखनात सहसा आढळणार नाही. त्यांनीही 'नेत्रदीपक' शब्द वापरला आहे. (ह्या दोघांच्याही लेखनात हा शब्द आढळला तेव्हा मी अडखळलो. पण त्या शब्दावर टिपण लिहावे लागेल ही त्यावेळी कल्पना नसल्यामुळे त्याची नोंद करून ठेवली नाही.) आणखी एका आघाडीच्या लेखकाने हा शब्द वापरल्याचे एक ताजे उदाहरण 'सोव्हिएट देश' मासिकाच्या जून १९६९ च्या अंकात आहे. 'सोव्हिएट देश'च्या वाचकांच्या समोर प्रा. अनंत काणेकर ह्यांनी केलेल्या एका भाषणाचा वृत्तांत ह्या अंकात प्रसिद्ध झाला आहे. त्यातले पहिलेच वाक्य आहे. "गेल्या पन्नास वर्षांत सोव्हिएट संघराज्याने जीवनाच्या सर्व क्षेत्रात **'नेत्रदीपक'** प्रगती केली आहे." अशा परिस्थितीत आकाशवाणीवरून नुकत्याच केलेल्या एका भाषणात महाराष्ट्राचे मुख्यमंत्री श्री. वसंतराव नाईक ह्यांनीही 'नेत्रदीपक' शब्द वापरला तर त्यात नवल नाही.

तीस वर्षांपूर्वी प्रथम वापरला गेलेला 'नेत्रदीपक' हा शब्द, आरंभी म्हटल्याप्रमाणे, आज देखील वापरला जात आहे आणि वापरला जात राहील अशीच लक्षणे आहेत. श्री. प्रभाकर पाध्यांनी अगदी अलीकडे आणखी एक शब्दप्रयोग केला आहे त्याचीही चर्चा इथेच करणे योग्य होईल. कारण तोही रूढ होण्याची शक्यता आहे. 'मांडवी' मासिकाच्या एप्रिल १९६९ च्या अंकात मर्ढेकरांच्या 'पिपांत मेले ओल्या उंदिर' ह्या कवितेचे विश्लेषण आणि रसग्रहण करणारा श्री. पाध्ये ह्यांचा एक लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यात एका ठिकाणी (पृ. ३०) ते म्हणतात, 'कवितेची रचना गुळगुळित असली पाहिजे, **गोड गोड मधुमिलिंदासारखी असली पाहिजे** अशी जी पूर्वी समजूत होती तिलाही ह्या कवितेत धक्का बसतो.' ह्यातल्या गोड मधुमिलिंद चा अर्थ काय? 'मधु' गोड गोड असतो. पण 'मिलिंद' म्हणजे 'भ्रमर' हा गोडगोड कसा? आणि 'मधुमिलिंद' ह्या सामासिक शब्दात प्राधान्य 'मिलिंद' ला आहे 'मधु' ला नाही. तेव्हा 'गोड गोड मधुमिलिंद' त्याचा काही अर्थच होत नाही. पण ह्या सामासिक शब्दातली सगळीच व्यंजने मृदू असल्यामुळे त्या संबंध शब्दाला एक प्रकारचे नादमाधुर्य आहे. म्हणून तो सगळा शब्दच 'गोड गोड' आहे. तेव्हा

ह्यापुढे 'गोड गोड मधुमिलिंद' ह्याचे प्रयोगांतर होऊन 'मधुमिलिंदासारखा गोड गोड' असा शब्दप्रयोग रुढ होणे अशक्य नाही.

'स्लँग' शब्द येतात आणि जातात असे म्हणता येईल. पण जे शब्द कार्यसाधक आहेत असे लेखकांना आणि वाचकांना वाटते ते पंडितमान्य झाले नाहीत म्हणून प्रतिष्ठा पावणार नाहीत किंवा रुढ होणार नाहीत असे म्हणता येत नाही.

म. सा. पत्रिकेच्या वर्ष ४३, अंक १६७ ह्यात प्रा. रा. श्री. जोग ह्यांनी 'आधुनिक' आणि 'अर्वाचीन' ह्या दोन शब्दांच्या अर्थासंबंधी चर्चा करून इंग्रजीतल्या modern ह्या शब्दासाठी 'अर्वाचीन' आणि contemporary ह्या शब्दासाठी 'आधुनिक' असे मराठी पर्याय सुचविले आहेत. ह्यापैकी contemporary हा शब्द अजिबात सोडून द्यावा लागेल. कारण त्याचा अर्थ "समकालीन" "belonging to the same time" इतकाच आहे. अमुक कालातील असा नाही. त्यांचा "आजकालचा" किंवा "लेखकाच्या-बोलणाऱ्याचा समकालीन" असा अर्थ तसा संदर्भ असला तरच होईल. "शिवाजी आणि रामदास समकालीन होते. शिवाजी आणि ज्ञानेश्वर नव्हते." असे आपण म्हणतो. दोन घटना एका कालात घडणे किंवा दोन माणसे एका कालात अस्तित्वात असणे एवढेच त्या शब्दाने सूचित होते. आता राहिला "modern" हा शब्द त्याला "आधुनिक" हा पर्याय वापरावा की "अर्वाचीन" हा प्रश्न राहतो. त्याचा विचार करताना recent आणि new ह्या शब्दांचाही विचार करावा लागेल. कोशांमध्ये modern, recent आणि new हे तिन्ही शब्द एकमेकांचे पर्याय म्हणून देण्यात येतात. पण त्यांच्या अर्थच्छटात भेद आहे. recent हा शब्द नुसता कालसापेक्ष आहे. त्याचा कोशातला अर्थ not long past, lately begun असा आहे. (modern ही आहे.) पण new आणि modern ह्या शब्दांतून कालसापेक्षते बरोबरच काही गुणही व्यक्त होतात. गेल्या महायुद्धाच्या कालात Penguin New Writing ह्या नावाची पुस्तके प्रकाशित होत असत. त्यातले लेखन कालदृष्ट्या नवे होतेच पण आराम आणि अभिव्यक्ती ह्या दृष्टींनीही ते "नवे" म्हणजे त्यापूर्वीच्या साहित्यापेक्षा "वेगळे" होते. (निदान ते तसे आहे असे त्या संपादकांना वाटे.) New शब्दांच्या अर्थात–पूर्वी नसलेले, "पूर्वीपेक्षा वेगळे", (not existing before, different) असे अर्थ आहेत ते गुण सापेक्ष आहेत. New Criticism संबंधीही हेच म्हणता येईल. आपल्याकडे "नवकथा" "नवकविता." "नवनाट्य" ह्यात "नव" ह्या शब्दाने हेच सूचित होते. Modern ह्या शब्दाचा एक अर्थ "If or pertaining to the recent times" असा आहे. Modern शब्दाचे मूळ modo= just now असे आहे. म्हणजे "आधुनिक," (आजचे) हेच पर्याय modern ला योग्य ठरेल. पण हाही अर्थ कालसापेक्षच झाला. modern शब्दाला एक गुणसापेक्ष अर्थही आहे आणि तोच महत्त्वाचा आहे. तो " of, pertaining to characteristic of contemporary styles of art, lilerature, music etc that reject traditionally accepted sanctitied forms and emphasize individual experimentation and sendibitity "( Random House Dictionary )" असा आहे. परंपरेने स्वीकारले गेलेले किंवा पवित्र मानले गेलेले अभिव्यक्ती प्रकार अव्हेरणे आणि वैयक्तिक प्रयोग आणि संवेदनशीलता ह्यांवर भर देणे हे modern ह्या शब्दाने सूचित केल्या जाणाऱ्या प्रवृत्तीचे लक्षण आहे. केशवसुत हे "आधुनिक" मराठी कवितेचे जनक आहेत असे आपण म्हणतो तेव्हा "आधुनिक" ह्या शब्दाने आपल्याला हीच म्हणजे परंपरा अव्हेरणारी आणि स्वतंत्र अभिव्यक्ती आणि संवेदनशीलता ह्यांवर भर देणारी प्रवृत्ती अभिप्रेत असते. Modernity किंवा "आधुनिकता" हा साहित्य कला क्षेत्रातला एक दृष्टिकोण, एक प्रवृत्ती आहे. ही प्रवृत्ती वेगवेगळ्या रुपांनी प्राचीन ग्रीक कालापासून आजपर्यंत वाङ्मयेतिहासाच्या वेगवेगळ्या टप्प्याटप्प्यांवर दिसून येते. एका प्रवृत्ति-पद्धतीनुसार वाङ्मयनिर्मिती होत राहिल्यानंतर तिच्यात एक प्रकारची सांकेतिकता, नीर्जीविता येते ती त्या "आधुनिकते"मुळे जाते आणि त्याला नवे चैतन्य प्राप्त होते. Recent New. आणि Modern ह्या तीन शब्दांच्या वेगवेगळ्या अर्थछटा लक्षात घेता Recent साठी अर्वाचीन New साठी "नव", "नवीन" आणि Modern साठी "आधुनिक" हे पर्याय योजणे योग्य ठरेल.

मराठीच्या लेखनासंबंधी वाङ्मयमहामंडळाने काही नियम घालून दिले आहेत. त्यानुसार लिहिण्याचे प्रयत्न

चालले आहेत. पण शब्दांचे निष्काळजी उच्चार आणि भाषेचा निष्काळजी वापर ह्यांना आळा कोणी आणि कसा घालायचा ?

"अलका", "साधना", "सुषमा", "जनता" इत्यादी शब्दांचे उच्चार सर्रास "अल्का", "साध्ना" "सुष्मा", "जन्ता" असे केले जातात. त्यांची इंग्रजी लिप्यंतरेही हेच चुकीचे उच्चार दर्शविणारी असतात. रेडिओवरून किंवा इतरत्र भाषणे करताना चांगले शिकलेले लोक "जीवनाचा" "बालकाचा" "तरणोपाय" ह्या शब्दांचे उच्चार "जीवनाचा" "बाल्काचा" "तरुणोपाय" असे करतात. नामांकित लेखक, संमेलनाध्यक्ष झालेले विद्वान, मराठीचे प्राध्यापक असे मातब्बर लोक "वैशिष्ट्य" हा शब्द "वैशिष्ठ्य" असा लिहितात आणि उच्चारतात. एका प्रसिद्ध नियतकालिकातल्या एका लेखात "पिंपळाच्या प्रशस्त पाराखाली लोक विश्रांती घेत पडले होते." असे एक वाक्य परवाच वाचले.

शब्दांचे उच्चार. वाक्यातल्या शब्दावरचे आघात. भाषेचा वापर ह्या संबंधीचे संस्कार लहानपणीच एक घरात तरी होतात किंवा शाळेत तरी. किंवा दोन्ही ठिकाणी. पण आता शिक्षण पसरत पसरत घरापर्यंत आणि शाळापर्यंत पोचले आहे की असंख्य मुला-मुलींवर ह्या दोहोंपैकी कोणत्याही ठिकाणी हे संस्कार होऊ शकत नाहीत. विद्यार्थी कोणत्या घरातून यावेत ह्यावर नियंत्रण घालता येणार नाही आणि घालणे न्याय्यही नाही पण विद्यार्थ्यांना कोणी कसे शिकवावे ह्यावर नियंत्रण घालता आले पाहिजे. आणि घातले पाहिजे. किंवा दुसरा मार्ग म्हणजे उच्चारात होणारे हे बदल मराठीच्या प्रकृतीला धरूनच होत आहेत असे म्हणून त्याचे स्वागत केले पाहिजे.

रा. भि. जोशी

● ● ●

अनुक्रमणिका

# विनंती

परिषदेच्या संग्रही काही पुस्तकांच्या व पत्रिकेच्या अंकांच्या जादा प्रती आहेत. त्यांची यादी पुढे दिलेली आहे. ज्यांना ही पुस्तके वा अंक विकत हवे असतील त्यांनी कार्यालयाकडे पत्रव्यवहार करावा. —चिटणीस.

१ **वेदप्रकाश** — श्रीधरशास्त्री पाठक.
२ **सर रामकृष्ण भांडारकर चरित्र** — कर्नाटकी.
३ **गणपतराव चरित्र** — ल. ना. जोशी.
४ **गोमांतक** — महाराष्ट्र भाट.
५ **रेंदाळकरांची कविता** — द्वि. खंड.
६ **काल** ( कविता )—रेणापूरकर.
७ **अभिनव काव्यमाला भाग १ ते ३** संपादक न. चिं. केळकर
८ **रसतरंगिणी** — शं. दा. पेंडसे.
९ **तापीतीर** — कवितासंग्रह.
१० **विनायकाची कविता.**
११ **साहित्यसुवर्ण** — संपादक रा. कृ. लागू.
१२ **हिंदु कायद्यांत स्त्रियांचे स्थान** — गजेंद्रगडकर.
१३ **जातिप्रस्तार आणि तद्‌गुणिते** — लिमये.
१४ **कालिदास** — मिराशी.
१५ **ज्ञानेश्वरी हृदय** — वासुदेव.
१६ **बालकवींची समग्र कविता.**
१७ **मराठी कविता ( १९२०–'५० ).**
१८ **धर्ममीमांसा** — शं. वा. दीक्षित.
१९ **प्रयत्नांती परमेश्वर** — नवले.
२० **संगीत पुनरागमन** — सी. पां. जोशी.
२१ **संगीत कृष्णकारस्थान** — नी. चिं. गद्रे.
२२ **भूदान** ( नाटक ) — कोठीवाले.
२३ **सुंदर मठ** ( नाटक )—दीक्षित.
२४ **सेवेचा सागर** — वियाणी.
२५ **५ कवि** — संपादक राजाध्यक्ष.
२६ **राजा शिवाजी** — कुंटे.
२७ **कवि माधव यांची कविता** — मा. के. काटदरे.
२८ **प्रभा** — रविकिरण मंडळ.
२९ **मधुसंभार** — विरागी.
३० **अग्निपराग** — पोवळे.
३१ **पावित्र्यविडंबनाचा वाद** — ग. वा. कवीश्वर.
३२ **नारायणराव पेशवे वध** ( काव्य )—कानिटकर.
३३ **कै. हरिभाऊ लिमये** — संपादक श्री. रा. शर्मा.
३४ **ज्ञानोपासना व भारतीयांचे कर्तव्य**—वनहट्टी
३५ **राजनीतीची मूलतत्त्वे** — पटवर्धन, कर्वे.
३६ **रशियाचा सर्वांगीण सर्वोदय** —के. गो. गोखले.
३७ **विष्णु गोविंद विजापूरकर** — रा. गो. कानडे.
३८ **हळवे भिंग** — य. द. भावे.
३९ **शिंपले आणि मोती** — अनंत काणेकर.
४० **मनाचे संकल्प** — म. ना. अदवंत.
४१ **साहित्य-तोरण** — संपादक–भिडे व देव.
४२ **एकावळी** — वनहट्टी.
४३ **साहित्याचा ध्रुवतारा** — रा. शं. वाळिंबे.
४४ **ब्रह्मी मंडळींचे ब्रह्मपुराण** — टिकेकर.
४५ **मराठी शाकुंतल** — लक्ष्मणशास्त्री लेले.
४६ **मोळी** — कुसुमावती देशपांडे.
४७ **तुकारामचरित्र** — पांगारकर.
४८ **लेंभे यांची कविता.**
४९ **स्मरणसाखळी** — कमलाबाई देशपांडे.
५० **फुलांचे अश्रु** — सी. म. बापट.
५१ **सावली** — सूर्यकांत खांडेकर.

अनुक्रमणिका

५२ मधुमाधव — शं. वा. चव्हाण.
५३ भावपुष्पे — य. खं कुलकर्णी.
५४ दूधसागर — वा. भ. बोरकर.
५५ विसर्जन — वि. म. कुलकर्णी.
५६ यशोधन — यशवंत.
५७ युगायुगांचे सहप्रवासी — मनमोहन.
५८ स्फूर्तिनिनाद — काव्यविहारी.
५९ उन्मेष आणि उद्रेक — भ. श्री. पंडित.
६० प्रतिबिंब — वा. कृ. परांजपे.
६१ सुवास आणि रस — भ. श्री. पंडित.
६२ आंबराई — गिरीश.
६३ गरिबांची गोष्ट — मायदेव.
६४ निरंजन माधवांची कविता.
६५ श्रीरामायण कथा — त्र्यं. ग. बापट.
६६ महाभारताचा उपसंहार — चिं. वि. वैद्य.
६७ ज्ञानेश्वरांची प्रभावळ — पांगारकर.
६८ महाराष्ट्र सारस्वत भाग १ व २
६९ चंद्रप्रकाश — भालचंद्र खांडेकर.
७० ज्ञानेश्वरी सर्वस्व — न. चिं. केळकर.
७१ इतिहासाचार्य राजवाडे — साने गुरुजी.
७२ तुकारामांचे अभंग — ( सरकारी प्रकाशन )
७३ महाराष्ट्र सांवत्सरिक — श्री. म. माटे.
७४ हरि नारायण आपटे — वेणूताई पानसे.
७५ आगरकर व्यक्ति व विचार — वि. स. खांडेकर.

• • •

## महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

### शिल्लक असलेले अंक

| वर्ष | अंक क्र. | साल |
|---|---|---|
| १० | ४० | १९३७. |
| १८ | ७३–७७ | १९४५. |
| १९ | ७९ | १९४६. |
| २०–२१ | ८० ते ८८ | १९४७–४८. |
| २२ | ९१ | १९४९. |
| २२ | ९३ | १९५०. |
| २३ | ९५–९६ | १९५०. |
| २४ | ९९–१०० | १९५२. |
| २५ | १०२ | १९५२. |
| २५ | १०४–११३ | १९५३–५५. |
| २९–३३ | ११६–१३६ | १९५६–६१. |
| ३४ | १३८–१३९ | १९६१–६२. |
| ३५ | १४२–१४४ | १९६२–६३. |
| ३६ | १४६–१४७ | १९६३. |
| ३७ | १४९ | १९६४. |
| ३८–३९ | १५२–१५५ | १९६५. |
| ४० | १५७–१५९ | १९६६. |
| ४१–४४ | १६२–१६७ | १९६७–६९. |

# परिषद वार्ता

चिटणिसांकडून

**( एप्रिल ते नोव्हेंबर १९६९ अखेर )**

**स्मृतिदिन :** गेल्या सहासात महिन्यांत पूर्वप्रथेप्रमाणे परिषदेतर्फे चार स्मृतिदिन साजरे करण्यात आले. त्यांचा तपशील असा : १० एप्रिल : **ज्ञानकोशकार केतकर :** सकाळी कमला नेहरू उद्यानात केतकर यांच्या स्मारकाला पुष्पांजली व सायंकाळी परिषदेत म. म. प्रा. द. वा. पोतदार यांचे ' उच्च ज्ञानसाधना ' या विषयावर व्याख्यान. १३ एप्रिल : **बाळासाहेब पंतप्रतिनिधी :** श्री. रोहिणी भाटे यांचे ' नृत्य आणि अभिनय ' या विषयावर व्याख्यान. २८ एप्रिल : **बा. सी. मर्ढेकर :** प्रा. म. द. हातकणंगलेकर ( विलिंग्डन कॉलेज, सांगली ) यांचे ' साहित्यातील सौंदर्यकल्पना ' या विषयावर व्याख्यान. २० जुलै : **वा. म. जोशी :** प्राचार्य मे. पुं. रेगे ( कीर्ती कॉलेज, मुंबई ) यांचे ' वामनरावांचा नीतिशास्त्रप्रवेश ' या विषयावर व्याख्यान.

**कै. टेंबे व्याख्यानमाला :** कोल्हापूरचे श्री. टेंबेबंधू यांच्या देणगीतून परिषदेतर्फे प्रतिवर्षी कै. गोविंदराव टेंबे व्याख्यानमाला आयोजित केली जाते. यंदा मालेचे १० वे वर्ष होते. या वर्षी ( दि. १८, १९ व २० जुलै ) सुप्रसिद्ध नाट्यदिग्दर्शक श्री. प्रभाकर गुप्ते यांची 'अभिनयाचा ऐतिहासिक विकास ' या विषयावर मालेत तीन व्याख्याने झाली.

**साहित्यचर्चा मंडळ :** मंडळातर्फे एकूण ७ विषयांवर टिपणे वाचली गेली. त्यांचा तपशील असा—

| दिनांक | टिपणवाचक | विषय |
|---|---|---|
| २४ एप्रिल | डॉ. प्र. ल. गावडे | ' यज्ञ ' कादंबरीच्या निमित्ताने |
| ५ जून | डॉ. भालचंद्र फडके | दिलीप चित्रे यांची कथा |
| ३ जुलै | डॉ. मु. श्री. कानडे | संगीत नाटकाची लोकप्रियता |
| २८ ऑगस्ट | प्रा. गं. ना. जोगळेकर | कवी यशवन्तरचित ' छत्रपति शिवराय ' महाकाव्य |
| ३ ऑक्टोबर | प्रा. चंद्रशेखर बर्वे | पोपटी पीस: पुंडलिकांची कथा. |
| १६ ऑक्टोबर | श्री. बाळ ज. पंडित | क्रिकेटसामन्यांचे मराठी वृत्तान्तकथन |
| २० नोव्हेंबर | प्रि. ह. कि. तोडमल | कथेचे वाङ्मयीन मूल्य |

**आचार्य अत्रे दुखवटासभा :** आचार्य प्र. के. अत्रे यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी दि. २० जूनला परिषदेतर्फे देवी रमाबाई सभागृहात प्रकट सभा घेण्यात आली, म. म. प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या या सभेत प्रा. श्री. ना. बनहट्टी, डॉ. रा. शं. वाळिंबे, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. गोपीनाथ तळवलकर, श्री. ग. ल. ठोकळ, प्रा. भीमराव कुलकर्णी, प्रि. मनोहर अळतेकर यांची भाषणे झाली. सभेच्या शेवटी अर्धा मिनिट उभे राहून सभेने दुखवटा ठराव संमत केला.

**लेखकमंडळ :** मंडळातर्फे पुढील कार्यक्रम झाले : ' मी आणि माझे संपादक ' या विषयावर १२ एप्रिलला चर्चा. या चर्चेत श्री. वि. वि. बोकील, प्रा. बाळ गाडगीळ, प्रा. श्री. वा. रानडे, श्री. ग. ल. ठोकळ, प्रा. प्रभाकर तामणे, श्री श्री. अ. जोशी, श्री. ह. मो. मराठे, श्री. शंकर पाटील, इत्यादींनी आपल्या सान्निध्यात आलेल्या काही संपादकांच्या आठवणी सांगितल्या. यापुढील आठवड्यात ' आमची मासिके : आमचे लेखक ' या विषयावर काही संपादकांनी आपले अनुभव सांगितले. श्री मुकुंदराव किर्लोस्कर, श्री. दत्तप्रसन्न काटदरे, श्री. म. म. केळकर, श्री. ग म. माजगावकर, इत्यादींनी चर्चेत भाग घेतला. २६ एप्रिलला श्री. विजय तेंडूलकर-लिखित ' रात्र ' या एकांकिकेचे वाचन झाले. श्री. माधव वझे यांनी ही एकांकिका दिग्दर्शित केली होती. श्री. मधुकर जोशी व श्री. कल्पना भालेराव यांनी तिचे वाचन केले. १० मे रोजी ' साहित्याची अलीकडची दिशा : समज आणि गैरसमज ' या विषयावर चर्चा झाली.

अनुक्रमणिका

चर्चेत प्रथम श्री. शाम मोकाशी यांनी टिपण वाचले व नंतर प्रा. दि. के. वेडेकर, श्री. प्रभाकर पाध्ये, श्री. दुर्गा भागवत, प्रा. सरोज कुलकर्णी इत्यादींनी आपले विचार मांडले. ७ जूनला ' साहित्य हा संपूर्ण वेळेचा व्यवसाय ' या विषयावर चर्चा झाली. श्री. गो. नी. दांडेकर, श्री. शं. ना. नवरे, श्री. ना. ग. गोरे, श्री. ग. वा. वेहेरे, श्री. दि. वा. मोकाशी, श्री. श्रीपाद जोशी इत्यादींनी या वेळी आपापली मते मांडली. २९ जूनला आचार्य अत्रे यांना लेखकमंडळातर्फे श्रद्धांजली वाहण्यात आली. या वेळी प्रा. द. मा. मिरासदार, प्रा. दि. के. बेडेकर, प्रा. गं. ना. जोगळेकर, प्रा. भीमराव कुलकर्णी, श्री. ज. जोशी, श्री. वसंत वैद्य, पंडित अनंत कुलकर्णी प्रा. विद्याधर पुंडलिक, श्री. श. वि. जोगळेकर इत्यादींनी आचार्य अत्रे यांच्यासंबंधी विविध आठवणी सांगितल्या. २ ऑगस्टच्या बैठकीत श्री. ना. ग. गोरे यांनी दिल्लीतील राजकीय घटनांबाबत बरीच उद्बोधक-भेदक माहिती सांगितली. प्रा. ना. सी. फडके यांना ७५ वर्षे पूर्ण झाल्याबद्दल त्यांचे अभीष्टचिंतन करण्यासाठी १४ सप्टेंबरला लेखकांची बैठक भरली होती. या प्रसंगी श्री. अप्पासाहेबांच्या समवेत त्यांच्या साहित्य-निर्मिती-बद्दल गप्पागोष्टी झाल्या. श्री. मुकुंदराव किर्लोस्कर, डॉ. अनुराधा पोतदार, प्रा. व. दि. कुलकर्णी, प्रा. स. शि. भावे, प्रा. गं. ना. जोगळेकर, श्री. अंजलि फडके, श्री. वि. ग. कानिटकर, श्री. श्री. ज. जोशी इत्यादींनी काही प्रश्न विचारून गप्पागोष्टीत रंग भरला.

लेखकमंडळींच्या या उपक्रमांत अनौपचारिकपणे गप्पागोष्टी होत असतात. उपक्रम एकंदरीने यशस्वी होत आहे. प्रा. विद्याधर पुंडलिक, श्री. वि. ग. कानिटकर व श्री. वि. शं. पारगावकर या तिघांचा मंडळाच्या कार्यक्रमांच्या संयोजनात फार सहकार्य लाभत असते.

**सभा :** परिषदेच्या नियामक व वार्षिक साधारण सभांच्या बैठकी २७ जुलैला प्रा. श्री. ना. बनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली भरल्या होत्या. या बैठकीतून ६८–६९ चे कार्यवृत्त, ६८–६९ चे जमाखर्चपत्रक व ताळेबंदपत्रक, १९६९–७० चा अर्थसंकल्प यांना संमती देण्यात आली. दि. २६ जुलैला नियामक मंडळाच्या विशेष बैठकीत कार्यकारी मंडळाने सादर केलेला घटनादुरुस्तीचा खर्डा संमत करण्यात आला. या दुरुस्त खर्ड्यास २१ सप्टेंबर रोजी भरलेल्या साधारण सभेच्या विशेष बैठकीत मान्यता देण्यात आली. अंतिम स्वरूपात मान्य झालेली घटना ' पत्रिके ' च्या चालू ( १६९ च्या ) अंकात छापली आहे. परिषदेच्या येत्या फेब्रुवारी-मार्चमध्ये होणाऱ्या त्रैवार्षिक निवडणुका नवीन घटनेनुसार होणार आहेत.

• • •

# हीरक-महोत्सव

परिषदेचा हीरक-महोत्सव १९७० जानेवारीच्या शेवटच्या आठवड्यात किंवा फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्यात करण्याचे निश्चित झाले आहे.

या निमित्ताने परिषदेने खालील तीन महत्त्वाचे ग्रंथ प्रकाशित करण्याचे ठरविले आहे.

( १ ) परिषदेतर्फे भरविल्या गेलेल्या साहित्य-संमेलनाच्या सर्व अध्यक्षांच्या भाषणांचा संग्रह.
( २ ) महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेतील लेखांची सूची.
( ३ ) महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या गेल्या ६० वर्षांचा इतिहास.

याशिवाय हीरक-महोत्सवाच्या वेळी एक स्मरणिका प्रसिद्ध करण्यात येणार असून तिच्यामध्ये जाहिराती-बरोबरच परिषदेच्या कार्याचा संक्षिप्त आढावा, परिषदे-संबंधीच्या काही हृद्य आठवणी, पदाधिकारी व संमेलना-ध्यक्षांची छायाचित्रे व परिषदेच्या शाखा व संलग्न संस्था यांचे परिचय देण्यात येणार आहे.

परिषदेच्या ग्रंथप्रसिद्धीस महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळाने आर्थिक साहाय्य देऊन उपकृत केले आहे. तसेच हीरक महोत्सवासाठी पुणे महानगरपालिकेने टिळकरस्त्यावर नवीन इमारतीसाठी भूमी देण्याची योजना नगरपालिकेच्या विचाराधीन आहे.

महाराष्ट्र राज्य शिक्षण व समाजकल्याण खात्याकडून हीरक-महोत्सवासाठी दहा हजार व पुणे जिल्हा परिषदेकडून पाच हजार रुपयांची मदत मंजूर करण्यात आली आहे.

याशिवाय कित्येक सन्माननीय सद्गृहस्थांनी देणग्या दिल्या असून त्यांची नावे स्मरणिकेत प्रसिद्ध करण्यात येतील.

महाराष्ट्र साहित्य परिषद ही महाराष्ट्रातील साहित्य-विषयक कार्यात लक्ष घालणारी आद्य संस्था असून ती भक्कम पायांवर उभी राहावी यासाठी देणग्यांच्या रूपाने मदत करावी, असे आवाहन करण्यात येत आहे.

ग. ल. ठोकळ　　रा. शं. वाळिंबे
मो. रा. वाळंबे　　कार्याध्यक्ष
द. बा. डावरे　　भीमराव कुलकर्णी
चिटणीस.　　चिटणीस, हीरक-महोत्सव

• • •

# महाराष्ट्र साहित्य परिषद
# प्रकाशने

.................

१ मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभावअखेर )
● कै. बा. अ. भिडे ●

२ महाराष्ट्र साहित्य-परिषद इतिहास
● द. वा. पोतदार ●

३ संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुती ( द्वितीयावृत्ती ) ३ रु.
● गं. बा. सरदार ●

४ द्रौपदी स्वयंवर ( अवचितसुतकाशीकृत ) ५ रु.
● कै. वा. दा. गोखले ●

५ शास्त्रीय परिभाषा कोश ५ रु.
● आपटे—जोशी ●

६ साहित्य समीर ( गद्य-पद्यवेचे ) २॥ रु.

७ साहित्य-प्रासाद ( गद्यवेचे ) २॥ रु.

८ साहित्य-कलश ( पद्यवेचे ) ३ रु.

९ साहित्य-चिंतामणी ( गद्यवेचे ) ३ रु.

१० साहित्य-पराग ( पद्यवेचे ) २॥ रु.

११ लेखनविषयक नियम ( महामंडळाचे ) २० पैसे

१२ मराठी वाङ्मयाचा इतिहास ( खंड ४ ) १५ रु.
● संपादक : रा. श्री. जोग ●

R. N. 6398 / 57



प्रकाशक व मालक म. सा. परिषदेतर्फे : श्री. मो. रा. वाळंबे, चिटणीस, म. सा. परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०.
मुद्रक : द. वा. आंबेकर, आर्यभूषण मुद्रणालय, ९१५।१ शिवाजीनगर, गोखले मार्ग, पुणे ४.



अनुक्रमणिका